# SELECTIONS FROM THE SATARA RAJAS' AND THE PESHWAS' DIARIES.

# VIII

## SAWAI MADHAVRAV PESHWA

### VOLUME III.

PREPARED BY

*The late Rao Bahadur Ganesh Chimṇāji Vād, B. A.*

NATIVE ASSISTANT TO THE COMMISSIONER C. D.

EDITED BY

KASHINATH BALKRISHNA MARATHE, B. A, L. L. B.

PUBLISHED BY

THE POONA DECCAN VERNACULAR TRANSLATION SOCIETY

WITH THE PERMISSION OF THE GOVERNMENT

OF BOMBAY.

1911

PRINTED BY

*K. R. Gondhalekar "Jagaddhitechhu Press," Poona City,*



Price 2½ Rupees.

सातारकर महाराज व पेशवे ह्यांची रोजनिशी

भाग ८ वा.

# सवाई माधवराव पेशवे

( निवडक उतारे )

अंक ३ रा.




रावबहादूर गणेश चिमणाजी वाड बी. ए.

माजी नेटिव्ह असिस्टंट निसबत कमिशनर मध्यभाग

ह्यांनीं निवड करून काढली

काशीनाथ बाळकृष्ण मराठे बी. ए. एल्. एल्. बी.

ह्यांनीं छापण्याकरितां तयार केली.



डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी—पुणें.

हिनें

मुंबई सरकारच्या परवानगीनें छापून प्रसिध्द केली.

सन १९११

के. रा. गोंधळेकर यांच्या जगद्धितेच्छु छापखान्यांत छापिली.

किंमत २॥ रुपये.

# अनुक्रमणिका.

# सवाई माधवराव पेशवे

# यांची रोजनिशी.

## ६ इतर मुलकी नोकर व त्यांचा मुशाहिरा.

८१९–( १ ) परगणे इंदापूर येथील फडणिसी बाळाजी कृष्ण यांजकडून दूर करून
अर्बा सबैन भास्कर हरी यांस सांगोन, वेतन सालीना रुपये २०० दोनशें रुपये
मया व अलफ करार केले असेत, तरी मशारनिल्हेचे हातून फडणिसीचें कामकाज
रजब २ घेऊन, सदरहूप्रमाणें वेतन पावीत जाणें ह्मणून, गोपाळ भगवंत कमाविसदार परगणे मजकूर यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

८२०–( ९ ) सर्वोत्तम शंकर यांजकडे सरसुभा होता, तो दूर करून, सालमजकुरा-
अर्बा सबैन पासून बाबूराव बल्लाळ यांजकडे सांगितला असे, तरी महालानिहायचे
मया व अलफ जमाबंदीचा वगैरे बंदोबस्त मशारनिल्हे करून देतील, त्याप्रमाणें
रमजान ३० वर्तणूक करणें ह्मणोन, कमाविसदारांचे नांवें छ. ९ रजब. सनदा.

११ कित्ता.

१ नारो बल्लाळ कमाविसदार, सरकार हांडे व परगणे हर्दै.

१ राघो नारायण कमाविसदार, परगणे नाशीक.

१ श्रीपत जिवाजी कमाविसदार परगणे वणदिंडोरी.

१ विठ्ठल गणेश कमाविसदार कजबे खेड व कडूस.

---

## VI OTHER REVENUE OFFICERS AND THEIR REMUNERATION.

( 819 ) Bàḷàji Krishṇa was deprived of the office of Faḍnis of Parganá
A. D. 1773-74 Indápur, worth Rupees 200 a year, and the office was conferred on Bhàskar Hari.

( 820 ) Báburao Ballàḷ was appointed to the post of Sirsubhà in succession to Sarwotam Shankar, and orders were issued
A. D. 1773-74 to the Kamàvisdàrs of Parganás Nàsik, Dindori, Pimpalner etc. to give effect to the settlement of the jamà-

१ खंडो गणेश कमाविसदार मौजे कोकमठाण व कसबे संवत्सर व मौजे मरकळ.

१ येशवंतराव कृष्ण कमाविसदार मौजे पांडुरली व मोकासा सिन्नर.

१ बाजी गोविंद कमाविसदार, मौजे आपटी.

१ अमृतराव वासुदेव कमाविसदार जकात सरकार संगमनेर.

१ परगणे सिन्नर निजबत अंताजी महादेव व गंगाधर राम.

१ नारो गोविंद कमाविसदार परगणे कुंभारी.

१ रघुनाथ रामचंद्र कमाविसदार बाबती सरदेशमुखी तर्फ देपूर.

११

५ किता कमाविसदार महालानिहाय यांचे नांवें कीं, घासदाणा व पेशकसी, व दिवाणदस्तुरी, वगैरे सरसुभाचीं कलमें असतील तीं सुदामतप्रमाणें सरसुभा देत जाणें ह्मणून.

१ गोविंद हरी कमाविसदार प्रांत बागलाण.

१ हरी बल्लाळ कमाविसदार परगणे पिंपळनेर.

१ कृष्णाजी विश्वनाथ कमाविसदार परगणे भामेर.

१ बाजीराऊ आपाजी कमाविसदार परगणे लोहनेर, वाखारी वोतुरपालें.

१ भिकाजी कृष्ण कमाविसदार परगणे दहिवल यांस.

५

१ अमृतराव बांडे यांचे नांवें सनद कीं, परगणे वरसें, व उमरपाटें.

तुम्हांकडे सरंजामास आहे तेथील दिवाण दस्तुरी वगैरे सरसुभ्याचीं कलमें असतील तीं सुदामतप्रमाणें सरसुभा देत जाणें ह्मणोन. सनद १.

रसानगी यादी.

८२१–( ११ ) गोविंद बल्लाळ यांस प्रांत राजपुरी येथील कुल कारभार सांगोन पाठविले आहेत, त्यांस तैनाती सन सबा सितैनांत करार केल्या त्याप्रमाणें.

अर्बा सबैन मया व अलफ रमजान ३०

---

bandi of the mahâls that might be made by him, and to pay him the dues of the office such as Ghàs Dànà, Peshkasi, Dasturi etc.

(821) Govind Ballâḷ was sent to Prànt Ràjpuri to do duty as Kuḷkàrbhàri on annual Tainát of Rupees 250 and 30 seers of oil for lighting purposes; and the following instructions were issued to Govindrao Chimàji Mánkar:—

A. D. 1773-74

नक्त सालीना मोईन          तेल दिवटीस दरमहा
निवळ २५० रुपये.          वजन ८८२॥ पक्कें.

एकूण अडीचशें रुपये नक्त सालीना, व दिवटीस तेल दरमहा वजन पक्के अडीच शेर करार केलें असे, तरी प्रांत मजकूर पैकीं पावीत जाणें याखेरीज. कलमें.

१ कुलकारभार मशारनिल्हेनीं करावा. तुम्हीं यांचे हातून घ्यावा. बखेडा करूं नये. इतर कारकुनांनीं यांचे रजातलबेंत रहावें. किल्याचे चवकी पाहऱ्याचे बंदोबस्त तुम्हीं करून शिका मोर्तब करीत जावें. कलम.

१ मखलासी करणें ती यांणीं करावी. त्याप्रमाणें फडणीस, मजमदार व चिटणीस यांणीं लिहावें. कदाचित एक वेळ मखलासी चुकली, तरी फडनीस, मजमदार व चिटणीस बहुत दिवसांचे माहितगार आहेत, त्यांणीं मशारनिल्हेस समजाऊन सांगोन, यांचे हातून नीट करवावें. मखलासींत चुकले तरी तसेंच लाटून मग यांचे पदरीं वेडेपण आणावें असें करूं नये. निष्कपटपणें वर्तणूक करून सरकारकामावर लक्ष धरावें. कलम.

१ निकामी माणूस असेल त्यापैकीं पन्नास माणूस दूर करून त्याचे ऐवजीं मशारनिल्हे यांनीं आपले निसबतीचे चांगले कसबी ठेऊन पेशजींचे नेमणुकीप्रमाणें सरकारचाकरी करावी. कलम.

१ रयतेकडे ज्याचें कर्ज असेल, तें सर्व यांनीं निवडोन सरसुभा समजवावें, तेथून विल्हे होईल त्याप्रमाणें करावें. कलम.

१ दरकदारांकडे, व कारकुनांकडे, व मक्तेदारांकडे, प्रांत मजकूरचे गांव खोतीस आहेत. त्या गांवीं मक्तेयांची बेरीज भरून जाजती कूस असेल ती खोतांनीं भरून द्यावी. तो ऐवज हुजूर समजवावा. कलम.

---

(1) the whole management should be entrusted to him (Govind Ballál), and the clerks should serve under his orders; but orders about the guarding of forts should be issued by the Mànkar;

(2) all orders, when approved by Govind should be written by the Mujamdár, the Chiṭnis and the Faḍnis; if any such order be wrong, it should be the duty of the Mujamdár, the Chiṭnis and the Faḍnis, who are experienced officers of Government to point out the error and to get it corrected; they should not allow a wrong order to pass merely because it had been approved by the Kulkárbhàri, and thereby hold him up to ridicule; they should serve him loyally keeping the interests of the public service in view;.

१ सालाबादची कमावीस जमेस आहे, त्याशिवाय मशारनिल्हेंनीं साधून देतों ह्मणोन कबूल केलें त्याचीं. कलमें.

१ खंड गुन्हेगारी.

१ रावते महार, इस्तकबील.

१ पेंढेयाचा खर्च होऊन बाकी राहतील त्याचे फरोक्ताचा ऐवज.

---

३

एकूण तीन कलमें वगैरे कमावीस मिळोन दहा हजार रुपये साधतील, तो ऐवज मशारनिल्हेपासून पेशजीं रसद सरकारांत घेतली आहे, त्याचे रकर्जी लिहावें, ह्मणोन सन सबा सितैनांत कसर होऊन सुभ्यास गेले; आणि चवकशी करून पंधरा हजार सहाशें रुपयांचीं यादी मशारनिल्हेंनीं आणून समजाविली, त्याचे रुजवातीस हल्लीं हुजरून विष्णु अनंत व भिकाजी केशव पाठविले आहेत, त्यांचे गुजारतीनें रुजुवातमुळें कलमें खरीं होतील, त्यांपैकीं यांजपासून सरकारांत रसद सन सीत व सबा सितैनांत दुसालांत दहा हजार तीनशें सदुसष्ट रुपये घेतले. त्यांपैकीं हुजूरून वगैरे पांच हजार चारशें सवा ब्याण्णव रुपये दोन आणे रदकर्जी ऐवज पावला आहे, तो सरकारांत घेऊन बाकी ऐवज अठ्ठेचाळीसशें साडे चवऱ्याहात्तर रुपये दोन आणे यांचा देणें राहिला आहे, तो रद्दकर्जी द्यावा. दहा हजारांहून जास्ती ऐवज राहिला तो सरकारांत जमा करावा. दहा हजारांस कमी ऐवज जहाला तर यांचे देण्यांत वजा करावा. सरकारांतून देऊं नये. त्याप्रमाणें बोलून चालून करार केला असे, येणेंप्रमाणें. कलम.

६

एकूण सहा कलमें करार केलीं असेत, तरी सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, गोविंदराव चिमाजी माणकर यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

---

(3) he should be allowed to replace 50 useless men by good working hands of his selection;

(4) he should ascertain the debts due from the ryots and report the same to the Sirsubhá, and should abide by his orders;

(5) the difference between the amounts fixed to be levied from Darakdárs, Kárkuns and farmers, holding Khoti villages in farm, and the amounts actually recovered by them from the villages should be credited to Government. etc. etc.

## नारो आपाजीच्या रोजकीर्दीपैकीं.

८२२–( ६४ ) हरि भिकाजी यांची असामी दप्तरदारीची तालुके कावनई येथें आहे, त्यास मशारनिल्हे लिहिणार चांगले नाहीं. याजकरितां गोपाळ धोंडदेव माजी कमाविसदार यांणीं आपले कारकिर्दींत सालगुदस्तांचे बेहेड्यास मुबदला कारकून ठेऊन बेहेड्याचे नेमणुकीप्रमाणें वेतन द्यावें; ह्मणोन, कलम लिहून घेतलें आहे. त्यास पेशजींप्रमाणें हरी भिकाजी यांजपासून लिहिण्याचें कामकाज घेऊन, बेहेड्यास नेमणूक रुपये २०० दोनशें आहे. त्याप्रमाणें वेतन पावीत जाणें. हे लिहिणार चांगले नसल्यास यांजपासून लिहिणार गुमास्ता घेऊन, यांची असामी यांजकडे चालवणें ह्मणोन, परशराम त्रिंबक, तालुके मजकूर, यांचे नांवें छ. ६ रबिलाखर.

खमस सबैन मया व अलफ जमादिलाकर २९.

सनद १.

रसानगी यादी.

८२३–( ७५ ) आपाजी गणेश यांचे नांवें सनद कीं, परगणा बिरमगांव, तालुके अमदाबाद, येथील दफ्तरदारीची असामी तीर्थ[स्व]रूप कैलासवासी नानासाहेब यांणीं वेदमूर्ति राजश्री कृष्णंभट पाटणकर यांस दिल्ही, त्यांणीं आपले तर्फेनें त्रिंबक हरी कारकून यांचे नांवें सरकारची सनद घेऊन असामीवर पाठविलें, त्यास असामीचें वेतन करारप्रमाणें भटजींस त्रिंबक हरी देत गेले. आलीकडे मशारनिल्हे वेतन द्यावयास घालघसर करूं लागले, सबब भटजींनीं असामी राजश्री विठ्ठलराव मोरेश्वर गोळे यांचे स्वाधीन करून वेतन घेत आले. त्रिंबक हरी मृत्य पावले. त्यांचे पुत्र भिवराव त्रिंबक यांणीं सालगुदस्तां गैरवाका आपली असामी असें समजाऊन ताकीद पत्र घेतलें आहे, त्यास हल्लीं चौकशीकरतां भटजींची असामी, सबब त्यांचे पुत्र अंताजी कृष्ण पाटणकर यांचे नांवें परगणा मजकूरची दफ्तरदारीची असामी पेशजींप्रमाणें करार करून दिल्ही असे, तरी यांचे तर्फेनें कारकून येईल त्याचे हातून दफ्तर-

खमस सबैन मया व अलफ जमादिलाखर २९

---

## FROM NÂRO APPÂJI'S DIARY.

( 822 ) The office of the Daftardár of Tàluká Kàwanai belonged to Hari Bhikáji, and it was represented that he was not a good writer. It was ordered that if that was the case, a substitute should be taken from him for duty, but that he should not be deprived of his office.

A. D. 1774-75

( 823 ) The office of Daftardár in Pargaṇá Biramgaon in Tàlukà Ahamdábád was conferred on Krishṇabhat Pâtaṇkar by Nánásaheb Peshwa. Krishṇabhaṭ appointed a substitute to do duty for him. The substitute after some years refused to pay to Krishṇabhaṭ the salary of the offiice, viz. Rs. 300, as agreed

A. D. 1774-75

दारींचें कामकाज घेऊन वेतनाची नेमणूक बेहब्यास रुपये ३०० तीनशें आहे, त्याप्रमाणें देत जाणें. गुदस्तां भिवराव त्रिंबक यांणीं सरकारचें ताकीदपत्र नेल्यावरी वेतनापैकीं ऐवज घेत [ला अस] त्यास माघारे घेऊन भटजींस पावता करणें ह्मणून. सनद १.

रसानगी, सनद पुरंधर छ. २५

८२४–( १२३ ) तालुके करनाळा, प्रांत कल्याण, येथील मजमू जगन्नाथ नारायण यांजकडे आहे, त्यास गांवगन्ना चिठ्ठी महालींहून होत्ये; त्याजवर मजमूचें निशाण होत नाहीं, ह्मणोन मशारनिल्हेनीं विदित केलें; त्याजवरून हे सनद सादर केली असे, तरी महालींहून चिठ्ठी होईल त्याजवर मजमदाराचें निशाण करवीत जाणें; व जमाबंदीचें वगैरे कामकाज यांचे इतल्यानें करीत जाणें. दुसरे महालीं कारकुनी दोहों चोहों महालीं मजमदारास पावत असेल, त्याप्रमाणें तुह्मीं यांस देत जाणें ह्मणोन. सनदा.

खमस सबैन मया व अलफ जिल्काद २०

१ श्रीधर नारायण सरखोत तालुके मजकूर यांस.

१ रामराव त्रिंबक यांस कीं, श्रीधर नारायण सरखोत तालुके मजकूर यांस तुह्मीं ताकीद करून सदर्हूप्रमाणें चालवणें ह्मणोन.

रसानगी यादी.

———

२

८२५–( १२५ ) तालुके राजमाची येथील फडणिसी अंताजी केशव यांजकडे होती, त्यास सालमजकुरीं दरकदारांकडे कर्जाचा ऐवज करार केला, त्यास फडणिसी त्यांजकडून दूर करून सालमजकुरापासून जनार्दन बल्लाळ निसबत नारो रघुनाथ सिदोरे यांस अवल सालापासून सांगितली असे, तरी यांचे हातें तालुके मजकूर येथील फडणिसीचें कामकाज पेशजींप्रमाणें घेऊन बेहेब्याचे नेमणुकेप्रमाणें पाववीत जाणें ह्मणोन, रामराव नारायण यांचे नांवें. सनद १.

खमस सबैन मया व अलफ मोहरम ६

रसानगी यादी.

---

upon. Krishnabhat therefore appointed another substitute. Orders were issued to accept service from the second substitute and to disburse the salary as usual.

( 824 ) On the complaint of Jagannáth Náráyan, the Mujamdár of Táluká Karnálá, it was directed that all orders issued to the village from the mahál should bear Jagannáth Náráyan's mark of attestation, and that all jamábandi work should be done in consultation with him.

A. D. 1774-75

( 825 ) The Fadnis of Rájmáchi, Antáji Keshav, having refused to advance money, as other Darakdárs did, was deprived of his office, and it was conferred on another person.

A. D. 1774-75

८२६--( १९१ ) सदाशिव कृष्ण फडणीस परगणे नाशिक, यांचे नांवें खत लिहून दिलें कीं, तुम्हांकडे फडणिसीचे दरकसंमंधें कर्जाचा ऐवज करार केला, त्याचा भरणा सरकारांत येणेंप्रमाणें. रुपये.

खमस सबैन मया व अलफ रबिलाखर ५

१४०८ शके १६९६ जयनाम संवत्सरे, भरणा फाल्गुनमासीं.

२३८ वद्य नवमी ९

२०० वद्य १० दशमी.

९७० वद्य ११ एकादशी.

१४०८

२५९२ शके १६९७, मन्मथनाम संवत्सरे, चैत्रमासीं भरणा.

५९२। शुद्ध १ प्रतिपदा.

३६९॥ शुद्ध १३ त्रयोदशी.

१६३०। वद्य १ प्रतिपदा.

२५९२

४०००

एकूण चार हजार रुपये सदरहूप्रमाणें सरकारांत कर्ज घेतलें आहे. त्यासी, व्याज दर माहे दरसदे रुपया एकोत्रा शिरस्तेप्रमाणें करार केलें असे: व्याजसुद्धां हिशेब करून ऐवज पेस्तर दिल्हा जाईल म्हणून छ. २७ सफर. खत १.

रसानगी यादी.

## जनार्दन आपाजीच्या रोजकीर्दीपैकीं.

८२७--( २४५ ) परगणे रायपूर येथील जमावंदी वगैरे चवकशी तुम्हांकडे सांगितली असे, तरी जमाबंदीची वगैरे चवकशी करून बंदोबस्त करून देणें म्हणोन, नारो कृष्ण सरसुभेदार प्रांत खानदेश यांस. सनद १.

सीत सबैन मया व अलफ रमजान ३०

---

( 826 ) A receipt was given for Rupees 4,000 received from Sadáshiva Krishṇa Phaḍnis on account of a loan advanced by him to Government in connection with his offiice of Faḍnis; the amount, it is stated, would be returned in future. The rate of interest on the loan was one rupee per month per cent.

A. D- 1774-75

( 827) Náro Krishṇa Sirsubhedàr of Pargaṇà Khándesh was directed

आपाजी गोविंद कमाविसदार, परगणे मजकूर यांस सनद कीं, नारो कृष्ण बंदोबस्त करून देतील त्याप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन. १

―――

२

दोन सनदा दिल्या असेत. छ. १७ साबान. परवानगी रूबरू.

८२८--( २८९ ) तालुके रेवदंडा येथील कारकून असामी ६ लिहिण्याचे उपयोगीं नाहींत, यास्तव त्यांस दूर करून त्यांचे ऐवजीं चार असामी सन सल्लास सबैनांत जदीद करार करून दिल्या, त्यांपैकीं केसो नारायण लिहिण्याचे उपयोगीं नाहींत, याजकरितां मशारनिल्हेंस सालमजकुरीं सरसुभाहून दूर करून पेशजीं सदरहू असामी सहा दूर जाहल्या, त्यांत लिहिणार चांगले आहेत सबब त्या असामी.

सीत सबैन मया व अलफ रबिलाखर १५

१ गणेश यादव. १ बाळाजी केशव.

एकूण दोन असामी पेशजींप्रमाणें सरसुभाहून करून देऊन पत्र दिल्हें आहे, त्याप्रमाणें करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी सरसुभ्याचे पत्राप्रमाणें केसो नारायण यांस दूर करून सदरहू दोन असामींजवळून चाकरी घेऊन नेमणुकेप्रमाणें वेतन पावीत जाणें ह्मणोन, आनंदराव शिंदे यांचे नांवें छ. ९ रबिलावल. सनद १.

रसानगी यादी.

८२९--( २९३ ) पुण्यांत जप्तीचीं घरें सरकारांत आलीं आहेत, तीं भाड्यानें लाऊन ऐवज जमा करावयास तुह्मांस आज्ञा केली असे, तरी जीं घरें जप्तीचीं असतील, तीं भाड्यानें लाऊन ऐवज येईल तो सरकारांत जमा करणें ह्मणोन, महादाजी बल्लाळ कारकून शिलेदार यांचे नांवें छ. १५ रबिलाखर. सनद १.

सीत सबैन मया व अलफ रबिलाखर १५

रसानगी यादी.

---

A. D. 1775-76 to settle the jamàbandi and manage the Pargaṇà of Ráyapur.

( 828 ) Six Kárkuns of Táluká Rewadaṇḍà being unfit for clerical duties were removed, and four new men were entertained in their place; one of these four men being found to be useless was dismissed by the Subhà, and two men were entertained in his place. The appintments were approved.

A. D. 1775-76

( 829 ) Many houses in Poona having been attached and having thus come into the possession of Government, a Kárkun was appointed to arrange about letting them on hire and recovering the rent.

A. D. 1775-76

८३० (२९६) वासुदेव बल्लाळ यांस तर्फ सौंदळ प्रांत राजापूर निसबत सुभा

सीत सबैन मया व अलफ रबिलाखर १५

आरमार विजेदुर्ग येथील हवाला सालमजकुरापासोन सरसुभाहून सांगितला, त्याप्रमाणें हुजुरून करार केला असे, तरी मशारनिल्हेपासून तर्फ मजकूर येथील हवाल्याचें कामकाज घेत जाणें. हवाल्यासंमधें कलमें पेशजीं सरसुभाहून करार करून दिलीं आहेत त्याप्रमाणें. कलमें.

हवाल्यासंमधें रसद पांच हजार रुपये करार केली आहे त्याचा भरणा आरमाराकडे मशारनिल्हेंनीं एक महिन्यानीं करावा. सदरहू ऐवजास व्याज एकोत्रा शिरस्तेप्रमाणें करार केलें असे. व्याज व मुद्दल मिळोन ऐवज मशारनिल्हेस पावला पाहिजे, त्यास दरसाल एक हजार रुपये महालाचे ऐवजीं द्यावयाची नेमणूक करून दिल्ही असे, तरी देत जाणें. कलम १.

महालाचें कामकाज करणें तें हवालदारांनीं कुल अखत्यारीनें करावें. सुभाहून महालीं गांवगन्ना परभारा रोखा करूं नये. जें करणें व लिहिणें तें हवालदारास लिहित जाणें. न्यायमनसुबी चिठ्ठी मसाला करणें तो हवालदारांनीं करित जावा. यांत हर वतनाची मनसुबी पडली, तरी हवालदारानें वाजवी निवडून सुभा समजाऊन फडशा करून घेत जावा. कलम १.

फडफर्मास, व वेठ बेगार सालाबाद-

हवालदाराची नेमणूक सालीना रुपये.

२०० हवालदार यास मोईन सालीना खेरीज शिरस्ता अवलसालापासून. रुपये.

२५ खेरीज मुशाहिरा खर्चाची नेमणूक आरमाराकडे आहे, त्यापैकीं महालाकडे नेमणूक करून दिल्ही. रुपये.

२० कागदबहा व शाईशिरें.

५ रोषनाई तेल बद्दल रुपये.

२५

२२५

एकूण सवा दोनशें रुपये सालीना नेमणूक करून दिल्ही असे, पाववीत जाणें. कलम १.

महालाचे लिहिण्यास कारकून व वसुलास प्यादे नेहमीं पाहिजेत, त्यास आरमाराचे बेहड्यास नेमणूक आहे त्याप्रमाणें असामी.

(830) The office of Havála of Tàlukà Saundal in Prânt Rájápur in charge of the naval department of Vijayádurga was conferred on Wásudev Ballál by the Sirsubhá.

A. D. 1775-76

The appointment was approved. The following were some of the instructions issued for the guidance of the officer:—

(1) he should as agreed upon advance a loan of Rs. 5,000 to Government;

प्रमाणें आरमाराकडे पावत आहे, त्याचा रोखा हवालदाराकडे करावा. हवालदारानें गांवगन्ना सालाबादप्रमाणें रोखे करून फड-फर्मास वगैरे सुभाकडे पाववीत जावी; व शाकार सालाबादप्रमाणें दास्तानीं जमा करित जावा. कलम १.

महालचे बंदोबस्तास मोर्तब महालाचें चालीचें करून देणें. कलम १.

१ कारकून मेहमीं लिहिण्यास.
१५ प्यादे.
१० बारमाही.
५ आठमाही.
———
१५
———
१६

एकूण सोळा असामी सदरहूप्रमाणें नेमून देणें. कलम १.

महालाचा हिशेब हवालदार यांणीं महालीं करून एकंदर ताळेबंद नख्ती व ऐनजिनसी आकारून सुभाची मखलासी करून घेऊन तपसीलवार हिशेब सुभास द्यावा. कलम १.

एकूण सात कलमें करार करून दिल्हीं असत, तरी सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें म्हणोन, आनंदराव धुळप यांचे नांवें. सनद १.

छ. १२ मोहरम, रसानगी याद.

८३१–( ३४४ ) बोरघाट, व कातळदरा, व हिंदुळा, व मांजर सुभा, व राजमाची या घाटांस चौकशीबद्दल हुजुरून पिलाजी विठ्ठल कारकून निसबत हुजूर हशम व प्यादे पाठविले आहेत. हे खालून कागद येतील व वरून खालीं कागद लोकांस जातील, त्याची चौकशी करतील. त्यांस

सबा सबैन मया व अलफ रमजान २९

( 2 ) his annual salary should be Rupees 200;

( 3 ) the duties of the mahál should be carried on under his sole authority: the Subhà should not make any requisition whatever on the villages except through him;

( 4 ) any adjudication regarding an important judicial dispute in connection with a Watan should after inquiry be referred by the Havâldár to the Subhà: other disputes should be disposed of by him;

( 831 ) A Kárkun and some peons were sent to the following passes, Borghát-Kátaldarà, Hindula, Manjarsubha and Rájmáchi to examine private letters passing between

A. D. 1776-77

करूं देणें ह्मणोन, रामराव नारायण तालुके राजमाची यांचे नांवें छ. १७ रजब परवानगी राजश्री बाळाजी जनार्दन. सनद १.

८३२–( ३८६ ) महालानिहाय प्रांत खानदेश येथील सालमजकुरीं जमाबंदी करावयाची, त्यास कमाल सालाचे अन्वयें चौकशी करून आकार करावयाची आज्ञा राजश्री नारो कृष्ण सरसुभेदार, प्रांत मजकूर यांस केली असे, ते तुम्हांस लिहितील त्याप्रमाणें वर्तणूक करून त्यांचे इतल्यालेरीज तुह्मीं जमाबंदीचा ठराव न करणें ह्मणोन कमाविसदारांचे नांवें. सनदा.

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २९

१ परगणे जलोद निसबत काशीनाथ नारायण.

१ परगणे राजदेहर निसबत व्यंकटराव बल्लाळ.

१ परगणे रायपूर निसबत संकराजी मोरराव.

१ परगणे चाळीसगांव निसबत संकराजी विरेश्वर.

१ परगणे बेटावद निसबत कृष्णाजी बल्लाळ.

१ परगणे रावेर निसबत रामाजी बापूजी.

१ परगणे नां(द)गांव निसबत विश्वासराव रामचंद्र, व दामोदर गोविंद.

१ परगणे बोदवाड निसबत विश्वासराव रामचंद्र.

१ परगणे पिंपळोद निसबत पांडुरंग कमलाकर व केशवराव जगन्नाथ.

१ परगणे मुघिभामगड निसबत माधवराव कृष्ण.

१ परगणे बोरनार निसबत गोपाळ बल्लाळ.

१ परगणे आशेर निसबत केशवराव जगन्नाथ.

१ परगणे चोपडें निसबत गोपाळराव हरी.

१ परगणे पाचोरें निसबत विनायक रघुनाथ.

१ परगणे वरणगांव निसबत विनायक रघुनाथ.

१ परगणे डांगरी दिंमत ठोके.

१ परगणे बहाळ व परगणे बोरनार निसबत रामचंद्र पवार.

१ कसबे साकोरें, परगणे माणिकपुंज, निसबत बाबूराव रामचंद्र दिंमत चिंतो विठ्ठल.

---

people above and below the Gháts. The officer of Rájmáchi was directed to permit them to carry on the examination. This order was issued under instructions from Báláji Janardan.

(832) The officers of the various Mahals were informed that Náro

२ देशमुख व देशपांडे परगणे वरणगांव, व परगणे पाचोरें यांसी.

---

२०

रसानगी यादी, छ. २१ सवाल.

८३३–( ३९८ ) प्रांत बेलापूर येथील हशमनिसी शामजी राम यांजकडे होती, त्यास

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २९ — ते मृत्यु पावले, त्यांचे पोटीं पुत्र नाहीं, सबब त्यांचे बंधु अंताजी राम यांचे नांवें करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी मशारनिल्हेचे हातून हशमनिसीचें कामकाज घेऊन बेहेड्याचे नेमणूकप्रमाणें वेतन पावीत जाणें ह्मणोन, बाजी गंगाधर यांचे नांवें छ. १८ जिल्हेज. सनद. १

रसानगी याद.

८३४–( ४६६ ) महादजी शिंदे यांचे नांवें पत्र कीं, प्रांत माळवा येथील बाबती

समान सबैन मया व अलफ जमादिलावल २६ — सरदेशमुखीची मजमू पेशजींपासून बापूजी लक्ष्मण यांचेकडे आहे, त्याप्रमाणें चालत असतां आलीकडे वेतनाचा ऐवज मशारनिल्हेस पावत नाहीं, ह्मणोन विदित जालें. त्यावरून हें पत्र तुह्मांस लिहिलें असे, तरी मजमूची असामी सुदामतप्रमाणें मशारनिल्हेकडे चालऊन वेतनाचा ऐवज राहिला असेल, तो झाडीयानसीं देणें ह्मणोन, मशारनिल्हेचे नांवें. सनद १.

चिटणिसी.

८३५–( ५१४ ) गंगाधर नारायण कानिटकर यांणीं हुजूर विदित केलें. परगणे

समान सबैन मया व अलफ सवाल ३० — रायपूर प्रांत बुंदेलखंड येथील खंडणी पेशजींपासून सरकारांतून आपणांकडे आहे, त्यास फडणिसीचे कामावर आपले तर्फेनें पूर्वी विठ्ठल गोपाळ यांसी पाठविलें होतें. त्यास सालगुदस्त सन सबा सबैनांत

---

A. D. 1776-77 — Krishna Sir Subhá was instructedto make inquiries and settle the Jamábandi and that they shouldact according to his instructions.

( 833 ) Shâmji Rám, Hasabnis of Parganá Belápur, having died without male issue, the office was given to his brother Antáji Rám. — A. D. 1776-77

( 834 ) The office of Majmu of Pránt Málvá belonged to Bápuji Laxaman. He complained that he had not received his remuneration for some time. Orders were issued to Mahádji Scindia to continue the office to Bápuji as before, and to pay him his salary with arrears. — A. D. 1777-78

( 835 ) The office of the Fadnis of Parganá Ráypur in Pránt Bundelkhand belonged to Gangàdhar Nàràyan Kànitkar. He sent Bàpuji Appáji to officate on his behalf. The — A. D. 1777-78

त्यास दूर करून बापूजी आपाजी यांस महालीं पाठविलें. ते तेथें जाऊन सहा महिनें बसले; परंतु फडणिसीचे कामाकाजाचा दाखला मामलेदार देत नाहीं, त्याविशीं आज्ञा जाली पाहिजे ह्मणून, त्याजवरून हें पत्र तुह्मांस लिहिलें असे, तरी मशारनिल्हेनीं आपले तर्फेचे गुमस्ते बापूजी आपाजी पाठविले आहेत. यांचे हातें परगणे मजकूर येथील फडणिसीचें कामकाज, कैदकानू, सुदामतप्रमाणें घेऊन पेशजींचे सनदेप्रमाणें वेतन पाठवित जाणें. येविशींचा बोभाट येऊं न देणें ह्मणोन, बाळाजी गोविंद, प्रांत बुंदेलखंड, यांचे नांवें चिटणीसी छ. २७ साबान. पत्र १.

८३६–( ) सदाशिव गोविंद यांचे नांवें मजमूची असामी होती. त्यास मशारनिल्हे त्रिवर्ग बंधू एक जागां होते तेव्हां, सुरळीतच होतें. आलीकडे विभक्त जाहले. असामी सदाशिव गोविंद आपणांकडेसच घेऊं लागले बंधूस यथाविभागें असामीचा ऐवज द्यावा तो न देत, सबब असामी दूर करून चिंतामण हरी फडके यांजकडे सांगितली असे, मशारनिल्हे यांणीं तिराहित कारकून असामी ठेवावा; आणि त्यास थोडें बहुत वेतन करून, बोलीप्रमाणें त्यास ऐवज द्यावा. बाकी वेतनापैकीं ऐवज राहील तो त्रिवर्ग बंधूंस यथाविभागें बरोबर वांटून द्यावा. असामी त्रिवर्गाची. येणेंप्रमाणें यादीवर करार असे.

समान सबैन मया व अलफ जिल्काद १०

८३७–( ५६१ ) जगन्नाथ महादेव फडणीस, तर्फ अशेर, यांणीं हुजूर विदित केलें कीं, आम्हीं निराळें भोजन करतों, त्यास भोजनखर्चाचा ऐवज देत नाहीं. त्याची नेमणूक करून दिल्ही पाहिजे ह्मणोन, त्याजवरून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी तुह्मांकडे भोजनखर्चाची नेम-

समान सबैन मया व अलफ जमादिलावल २

---

Mámlatadár, however, refused to entrust the duties of Fadnis to him. Gangádhar Náráyaṇ having complained to the Hujur, orders were issued to the Mámalatdár to allow Bápuji to carry on his duties and to give no cause for further complaint.

( 836 ) The office of Májmu belonged to Sadáshiv Govind. He had two brothers who were separated from him. Sadáshiv, who was the officiator, appropriated all the proceeds of the office instead of sharing them with his brothers. The office was therefore made over to Chintámaṇ Hari with instructions to appoint a person to do the duty on a moderate salary, and to divide the remaining proceeds among the three brothers.

A. D. 1777-78

( 837 ) Jagannáth Mahádev, Fadnis of Turf Asher, complained that he received no food expenses though he dined separately (from the Mámalatdár). The Mámalatdár was ordered

A. D. 1777-78

णूक आहे त्यास मशारनिल्हे निराळें भोजन करितात, त्यांस खर्चाचा आजमास पाहून भोजनखर्चाचे नेमणुकेपैकीं ऐवज त्यांस देत जाणें ह्मणोन, केशवराव जगन्नाथ यांचे नांवें.

सनद १.

रसानगी यादी.

८३८–( ६१८ ) तालुकेहाय येथील चौकशीस सर्वोत्तम शंकर यांस पाठविले आहेत, तर तालुक्यांचे लोकांची पाहणी करून, वाईट माणूस दूर करतील. त्यांस रुकाएत करून त्याचे ऐवजीं नेमणुकेंत जदीद लोक व गोलंदाज व जे जालंदाज ठेवतील, त्यांस ठेवणें; व जकीऱ्यापैकीं तोफांचे फर्म्याचे गोळे असतील, ते ठेऊन, गैर फर्म्याचे राहतील ते दिगर तालुकीयास देवितील, त्यांस देणें ह्मणोन.

समानीन मया व अलफ रजब १४

सनदा.

१ गंगाधर गोविंद तालुके विजयदुर्ग यांस.
१ आनंदराव धुलप सुभा आरमार विजयदुर्ग यांस.
१ कृष्णाजी विश्वनाथ तालुके अंजणवेल यांस.
१ बाळाजी गणेश, तालुके देवगड यांस.
१ महिपतराव कृष्ण तालुके रत्नागिरी यांस.
१ रघुनाथ सदाशिव, तालुके रायगड यांस.
१ मोरो बापूजी तालुके सुवर्णदुर्ग यांस.
१ आनंदराव शिंदे तालुके रेवदंडा यांस.

—

८

आठ सनदा, रसानगी यादी.

८३९–( ६१९ ) कोंकण प्रांतें तालुकेहायचे बंदोबस्तास हुजूरुन सर्वोत्तम शंकर

to pay him a reasonable amount out of the grant allotted to him for food expenses.

( 838 ) Sarvotam Shankar was deputed to inspect certain Tálukás in the Konkan, including the Táluká in charge of the naval department. The Mámalatdárs were directed to remove all Government servants whom he might deem unfit, to entertain new persons of his selection in their places, and to send to other Tàlukas under his direction any cannon balls which might be found to fall short of the standard size.

A. D. 1779-80

( 839 ) The Mámalatdárs were further directed to allow Sarwotam.

समानीन मया व अलफ रजब १५ — यांस पाठविले आहेत, त्यांस तालुकेयांचा बंदोबस्त कोणे रीतीचा आहे तो समजोन यथास्थित बंदोबस्त करावयाची.

जंगी सामान शिलकेस असेल तें पाहून मरामत करावयाचें व कांहीं नवें घ्यावयाचें नेमितील त्याप्रमाणें घेऊन व तयार करावयाचें तें करून, शिलकेस ठेवणें; व तालुकेयाचे गलबताची तयारी व दागदोजी सांगतील त्याप्रमाणें करणें. कलम १.

लोकांचे रोज़मरे तटले असतील ते समजोन त्यांपैकीं हल्लीं द्यावयाचे नेमतील, त्याप्रमाणें लोकांचे वाटणीस ऐवज तूर्त देणें; व कांहीं सरदार दुसऱ्या सुभ्यास पाठवितील, व त्या सुभ्याकडून या सुभ्यास ठेवितील. कलम १

शिलकेस जिन्नस आहे तो पाहून जाजती कांहीं घ्यावयाचा, व मरामत करावयाचा, नेमतील त्याप्रमाणें करणें; कलम १.

तोफांचे गाड्यांची व दारूची मरामत, व तोफांचे काने भरावयाचे, व जेजाला, व बंदुखांचा साज करावयास सांगतील त्याप्रमाणें करणें. कलम १.

प्रांतांतील वस्तीचे लोक हत्यारबंद असतील, त्यांचा झाडा काढून जामीन घेणें. कलम १

एकूण सदरील पांच कलमें वगैरे जे चौकशी मशारनिल्हे करितील ते समजावणें; व जो कागदपत्र मागतील तो देणें; व तर्तूद करावयास तुम्हांस सांगतील, त्याप्रमाणें वर्तणूक करणें. म्हणोन तालुकेहाये येथील मामलेदारांस वगैरे चिटणिसी सदरहू अनवयाचीं पत्रें.

१ बाळाजी गणेश, तालुके देवगड, यांस पत्र.
१ गंगाधर गोविंद, तालुके विजयदुर्ग यांस.
१ आनंदराव धुलप, सुभा आरमार, विजयदुर्ग, यांस पत्र,
१ महिपतराव कृष्ण, तालुके रत्नागिरी, यांस पत्र.
१ कृष्णाजी विश्वनाथ, तालुके अंजणवेल, यांस.
१ मोरो बापूजी, तालुके सुवर्णदुर्ग, यांस पत्र.
१ रघुनाथ सदाशिव, तालुके रायगड, यांस पत्र.
१ अनंदराव शिंदे, तालुके रेवदंडा, यांस पत्र.

---

८

A. D. 1779-80 — rao to examine the stores and to repair such of them as might be useful. Boats, guns, and cannons were to be repaired under his instructions. Security was ordered to be taken from all residents in the province possessing arms.

८४०—( ६६२ ) गणेश बल्लाळ कारकून निसबत चिंतामण हरी मुंबईस बातमीचे कामास आहेत; सबब त्यांजकडे दोन महागिऱ्या भरून गवत व एक महागिरीभर लांकडें देविलीं असे, तरी तालुके बेलापूरपैकीं सदरील लिहिल्याप्रमाणें त्यांजकडे पाठऊन देणें ह्मणोन, कृष्णाजी नारायण यांचे नांवें. सनद १.

समानीन मया व अलफ जिल्हेज २६

रसानगी, गणेश हरी दिंमत चिंतामण हरी.

८४१—( ८३४ ) प्रांत कोंकण येथील सरसुभा जिवाजी गोपाळ यांजकडे सालमजकुरापासोन सांगितला असे, तरी तुह्मीं माहालीं मुलकीं, व किल्ले जातचा बंदोबस्त मशारनिल्हेचे विचारें करीत जाणें. यांचे इतल्याशिवाय कांहीं न करणें. हे सरकारचे आज्ञेप्रमाणें बंदोबस्त यथास्थित करितील ह्मणोन चिटणिसी. पत्रें.

अर्बा समानीन मया व अलफ रविलाखर ३

किल्ले जात, सुद्धां तालुके.

१ प्रांत कल्याणभिंवडी, निसबत गोविंद राम.
१ प्रांत बेलापूर, निसबत अंताजी महादेव.
१ प्रांत राजपुरी, निसबत गोविंदराम, व चिमाजी माणकर.
१ तालुके अवचितगड, निसबत गणेश बल्लाळ व हरी गणेश.
१ मामले कोहज, निसबत गोविंदराव आबाजी.
१ तालुके उंदेरी, निसबत महादाजी कृष्ण.
१ तालुके रेवदंडा, निसबत अनंदराव शिंदे.
१ किल्ले माहूली, निसबत दुर्गोजी शिंदे.
१ किल्ले विकटगड व किल्ले कर्नाळा, निसबत सदाशिव राम दिंमत अनंदराव राम.
१ तालुके बीरवाडी, निसबत गणेश बल्लाळ, व हरी गणेश.
१ तालुके सुवर्णदुर्ग, निसबत मोरो बापूजी.
१ तालुके अंजणवेल, निसबत त्रिंबक कृष्ण.
१ तालुके नेरल, निसबत हरी लक्ष्मण.

---

( 840 ) Krishnaji Narayen was directed to send two boats laden with grass & one with firewood to Ganesh Ballal karkun of Chintaman Hari at Bombay.

A. D. 1779-80

( 841 ) Jiwáji Gopàl was appointed Sirsubhá of the Konkaṇ, and the officers of the various Tálukás were directed to abide by his orders in revenue matters, as well as in matters connected with the administration of forts; in fact, to do nothing without his advice.

A. D. 1783-84

१ तालुके रत्नागिरी निसबत महिपतराव कृष्ण.
१ तालुके विजयदुर्ग निसबत गंगाधर गोविंद.
१ तालुके देवगड निसबत चिमणाजी रामचंद्र.

९ मा(हा)ली मुलकी तालुके.

१ परगणे साकर्से निसबत भास्कर लक्ष्मण.
१ तर्फ आठगांव निसबत मोरो गोविंद.
२ जकात प्रांत कल्याणभिंवडी निसबत बापूजी गणेश, व उद्धो दादाजी. पत्र १.
जकात तालुके रेवदंडा व बंदर रोहें व अष्टमी १.
२
१ आरमार विजयदुर्ग निसबत अनंदराव धुलप.
१ देशमुखी प्रांत वसई निसबत अनंदराव भिकाजी.
१ देशमुखी तालुके रेवदंडा, व तालुके उंदेरी निसबत महादाजी लक्ष्मण.
१ देशमुखी प्रांत राजपुरी, निसबत येसाजी रामचंद्र.
१ देशमुखी प्रांत बाळापूर, व आठगांव निसबत कृष्णाजी बल्लाळ.

२५

पंचवीस चिटणिसी पत्रें दिल्हीं असेत.

८४२-( ८३८ ) तालुके अंजणवेल येथील सरहवाला लक्ष्मण बल्लाळ याजकडे आहे येविशीं. कलमें.

अर्बा समानीन मया व अलफ जमादिलावल ४

(842) The duties of the office of SirHawáldár of Táluká Anjanwel were prescribed as follows:—

A. D. 1784-85

(1) the SirHaváldár should be one of the officers sent to settle the jamábandi of the Táluká, or to make any inquiry connected with it;
(2) no revenue or account matter should be disposed of without the advice of the Haváldár;
(3) recommendations for letting out lands at reduced rents should be received through him;
(4) he should assist the judge in deciding cases.



3106

जमाबंदी तालुके मजकूरची जिराइती व बागाइती व नक्की करावयाची, त्यास कारकून नेमावयाचे वेळेस सरहवालदार देखील नेमावे. कमजाजती जाहल्यास चौकशी करणें तेव्हां कारकून पाठवाल त्यांत सरहवालदार यासही पाठऊन चौकशी करावी. सर हवालदाराच्या इतल्याखेरीज जमाबंदीचें व हिशेबाचें काम करूं नये. कलम १.

शिस्ती नक्की गल्याची, व कारसाहोणें, ते हंगामशीर सरहवालदार यांणीं सुभा सांगोन, शिस्ती करवाव्या, आणि जिकडील तिकडे सुभाहून रवाना कराव्या. कलम १.

तालुके मजकुरीं इस्ताव्याचे वगैरे कौलपत्रें मुलकी देणें, त्यास सरहवालदार यांणीं सुभा रदबदल करून देवीत जावें. कलम १.

तालुके मजकूरचे दादी फिर्यादी येतील त्यांची मनसुबी न्यायाधिशाकडे नेमून देणें. त्यांत सरहवालदार यांसही नेमावें. जो निश्चय होईल तो सुभा समजाऊन विल्हेस लावावें. कलम १.

सरहवालदार यांचे निसबतीस शिपाई असामी दोन पेशजींपासून आहेत, त्याप्रमाणें शिबंदीचे नेमणुकेपैकीं सदरील दोन असामी नेमून देणें. कलम १.

सदरहूप्रमाणें पांच कलमें करार करून दिल्हीं आहेत, त्याप्रमाणें सरहवालदाराचे हातून कामकाज घेत जाणें ह्मणोन, त्रिंबक कृष्ण यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

८४३–( ८६६ ) क्षेत्र पंचवटी, परगणे नाशिक, येथें गावांतील रस्ते झाडावयास हलालखोर असामी १ एक ठेवावयाचा करून, त्यास नेमणूक सालीना रुपये ३० द्यावयाचे करार केले असेत, तर परगणे मजकूर पैकीं सदरील तीस रुपये गंगाधरराव भिकाजी रास्ते, यांजकडे देत जाणें ह्मणोन, पांडुरंग धोंडाजी कमाविसदार, परगणे मजकूर, यांचे नांवें. सनद १.

खमस समानीन मया व अलफ सफर ५

रसानगी याद.

८४४–( ९५८ ) क्षेत्र पंढरपूर येथें सन्यासी करपात्री भिक्षेकरितां फिरतात, व ब्राह्मण सोंवळे श्री देवदर्शनास येतात, व भीमा स्नानें करून घरांस जातात; व माधोकरी ब्राह्मण मागतात, त्यांस गल्लींत उष्टया पत्रावळी व केरकुश्चीत जागा होऊन विटाळ होतात, याजकरितां गल्या झाडून

समान समानीन मया व अलफ जिल्काद २९

---

(843) A sweeper was entertained for cleansing the streets of Nâsik on a salary of Rs. 30 a year.

A. D. 1784-85

(844) The streets of Pandharpur being dirty and strewn with leaves used as plates for food, Sannyáshis who went out to beg for food, and Brahmins who came to worship

A. D. 1787-88

निर्मळ राखण्याची आज्ञा तुम्हांस केली असे, तरी क्षेत्र मजकूरच्या गल्या हलालखोराकडून झाडऊन निर्मळ राखणें. घर पाहून दरमहा एक दोन पैसेप्रमाणें हलालखोरास देवीत जाणें; आणि गल्या चांगल्या राखणें ह्मणोन, चिंतो रामचंद्र कमाविसदार क्षेत्र मजकूर दिंमत परशराम रामचंद्र यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

८४५–( ९७१ ) तुह्मांजवळ पारसनिसीचे कामास पारसी लिहिणार पाहिजे, याजकरितां काजी महमद कारकून शिलेदार निसबत भगवंतराव नारायण पारसनीस, यांस पाठविले आहेत. तरी यांजपासून पारसनिसीचें कामकाज घेत जाऊन, हे तुह्मांजवळ पोहचतील तेव्हांपासून यास रोजमरा एकमाही रुपये ३५ पसतीस रुपये देविले असेत. पावते करीत जाणें ह्मणोन, अलीबाहाद्दर यांचे नांवें. सनद १.

समान समानीन मया व अलफ साबान १०

परवानगी रूबरू.

८४६–( ९७८ ) कारकून निसबत दफ्तर यांचे तांदूळ वगैरे जिन्नस, खेरीज फिरंगाण कोंकणांतून हरएक घाटें व गला देशांतून खरेदी करून एक खेप पुण्यास आणितील, त्यांस आणूं देणें. जकातीचा तगादा न करणें ह्मणोन सालगुदस्तांप्रमाणें सालमजकुरीं. दस्तकें.

तिसा समानीन मया व अलफ सफर १

| चालतें दफ्तर. | दस्तकें. | तांदूळ वगैरे. | बैलसर. |
|---|---|---|---|
| महादाजी बल्लाळ | २ | ५ | ६० |
| हरी बल्लाळ फडके | ३ | ३० | ३०० |

the deity and returned from bathing were polluted by contact with the unclean things. The Kamávisdár was directed to entertain sweepers and to see that the roads were kept clean. He was authorized to cause every house-owner to pay, according to his circumstances, one or two pice to the sweeper every month.

( 845 ) A person knowing Persian being required for carrying on the duties of the office of Párasnis under Ali Bahádoor, Kàji Mahamad Kárkun Silledar, was appointed to the place.

A. D. 1787-88

( 846 ) A list is given of the Kàrkuns employed in the Daftar Department at Poona to whom passes were granted exempting from octroi grain imported by them into Poona.

A. D. 1788-89

| | | | |
|---|---|---|---|
| गोविंदराव बाजी | १ | ५ | ५० |
| त्रिंबक लक्ष्मण शिधये | ३ | ३८ | ५५ |
| पांडुरंग कृष्ण गोडबोले | २ | ३० | ३०० |
| त्रिंबकराव नारायण | २ | ५ | ५० |
| परचुरे नारो अनंत मृत्य पावले, सबब पुत्राचे नांवें सालमजकुरीं. | | | |
| भास्कर विश्वनाथ सोहनी | १ | १ | १० |
| बाबूराव केशव ठाकूर | ५ | १३ | १७० |
| मोरो बापूजी फडके | ३ | १८ | १८० |
| गणेश राम बापट | १ | १ | १० |
| महादाजी रघुनाथ कारकून शिलेदार | १ | १ | १० |
| कोन्हेर राम कारकून शिलेदार | १ | १ | १० |
| बाळाजी राम लेले | २ | ८॥ | ८५ |
| गंगाधर बाबाजी जोशी | १ | २ | २० |
| बगाजी रघुनाथ फलटणास न्यावयाचे | १ | २ | २० |
| रामचंद्र गोविंद पेंडसे | १ | १ | १० |
| गोपाळ कृष्ण बिवलकर | १ | २ | २० |
| आपाजी राम सदावर्ती | १ | १ | १० |
| आपाजी विठ्ठल लागू, मशारनिल्हे मृत्यु पावले, सबब त्रिंबक आपाजी पुत्र. | १ | २ | २० |
| त्रिंबक विठ्ठल जोशी | १ | १ | १० |
| नारो शिवराम चक्रदेव | २ | ३ | ३० |
| महादाजी आबाजी विध्वंस | १ | १ | १० |
| लक्ष्मण बाबाजी करंदीकर | १ | १ | १० |
| बाळाजी महादेव मोघे | १ | १ | १० |
| शिवराम शंकर जोशी | १ | १ | १० |
| बाजी नारायण आगाशे | १ | १ | १० |
| कृष्णाजी चिंतामण सोहनी | १ | १ | १० |
| भिकाजी नारायण पाळंदे | २ | १० | १०० |
| मोरो लक्ष्मण, लक्ष्मण केशव वाडीकर यांचे पुत्र | २ | ३ | ३० |

| | | |
|---|---|---|
| गोविंद मल्हार, मल्हार बल्लाळ भडभडे १ | २ | २० |
| मृत्यु पावले सबब पुत्राचे नांवें. | | |
| केसो विश्वनाथ टिळक १ | २ | २० |
| महादाजी बल्लाळ साठे १ | ५ | ५० |
| मोरो रामचंद्र देवधर १ | ४ | ४० |
| दामोदर गोविंद १ | ५ | ५० |
| रामचंद्र गोपाळ करकरे १ | ३ | ३० |
| गोविंद हरी देवधर १ | २ | २० |
| दिनकर नारायण करंदीकर १ | १ | १० |
| मोरो जनार्दन भट १ | २ | २० |
| नारो कृष्ण ओक. १ | १ | १० |
| गोविंद महादेव जोशी १ | १ | १० |
| राघो अनंत गोखले १ | १ | १० |
| गोपाळ अनंत अभ्यंकर १ | २॥ | २५ |
| कृष्णाजी हरी भोगले १ | १ | १० |
| बाजी रघुनाथ भावे १ | १ | १० |
| महादाजी नारायण अभ्यंकर १ | १ | १० |
| जगन्नाथ बल्लाळ गानू १ | १. | १० |
| बाबूराव जनार्दन गोडबोले १ | १ | १० |
| आबाजी त्रिंबक जोगळेकर १ | १॥ | १५ |
| आबाजी धोंडदेव साठे १ | १ | १० |
| आनंदराव गोपाळ १ | ५ | ५० |
| वासुदेव त्रिंबक आचवल १ | १ | १० |
| नारो कृष्ण गद्रे १ | २ | २० |
| विसाजी बहिरव ढवळे १ | २ | २० |
| विसाजी नारायण वाडदेकर १ | २ | २० |
| बाळाजी सदाशिव करमरकर १ | १ | १० |
| बाळाजी हरी ढवळे १ | १ | १० |
| विनायक मोरेश्वर मेहेंदळे १ | २॥ | २५ |
| महादाजी नारायण बापट १ | १ | १० |
| नारो कृष्ण भातखंडे १ | १ | १० |
| रुद्राजी नारायण करमरकर १ | २ | २० |

| | | | |
|---|---|---|---|
| धोंडो बल्लाळ लेले | १ | १ | १० |
| बाबूराव अनंत करमरकर | १ | २ | २० |
| कृष्णाजी गणेश पेंडसे | २ | ५ | ५० |
| नारो महादेव जोशी | १ | १ | १० |
| महादाजी विश्वनाथ दातार | १ | १ | १० |
| भास्कर बल्लाळ जोशी | १ | १ | १० |
| गोविंद राम आपटे | १ | २ | २० |
| सदाशिव बल्लाळ भिडे | १ | २ | २० |
| कृष्णाजी तुकदेव गोडबोले | १ | २ | २० |
| महादाजी बाबूराव लिमये | १ | २ | २० |
| मल्हार राम बापट | १ | ३ | ३० |
| सदाशिव महादेव शेवडे | १ | २ | २० |
| रामचंद्र हरी ढवळे | १ | ३ | ३० |
| बाजी अनंत पंडित | १ | १ | १० |
| धोंडो केशव काळे | १ | १ | १० |
| लक्ष्मण बल्लाळ सहस्रबुद्धे | १ | १॥ | १५ |
| कृष्णाजी राम चोळकर | १ | १ | १० |
| बाळाजी बापूजी केळकर | १ | २ | २० |
| सदाशिव अनंत अभ्यंकर | १ | १ | १० |
| गंगाधर महादेव परचुरे | १ | १॥ | १५ |
| मल्हार लक्ष्मण वैद्य | १ | २ | २० |
| आबाजी बल्लाळ आगाशे | १ | २ | २० |
| मोरो महादेव गपचूप | १ | १॥ | १५ |
| दिनकर अनंत | १ | ५ | ५० |
| चिमणाजी बाबाजी | १ | १॥ | १५ |
| नारो रामचंद्र काळे | १ | १ | १० |
| शिवराम बल्लाळ | १ | १ | १० |
| मोरो विष्णू गुणे | १ | १ | १० |
| रामचंद्र बल्लाल शेवडे | १ | १ | १० |
| भगवंत आनंदराव | १ | १ | १० |
| बाळाजी रघुनाथ वेलणकर | १ | १ | १० |
| नारो राम कारकून शिलेदार | १ | १ | १० |

| | | | |
|---|---|---|---|
| महादाजी विश्वनाथ लिमये | १ | २ | २० |
| त्रिंबक शंकर सोहनी | १ | १॥ | १५ |
| बाळाजी नारायण शेवडे | १ | २॥ | २५ |
| आबाजी भिकाजी फडके | १ | १ | १० |
| सदाशिव नारायण अभ्यंकर | १ | १ | १० |
| गणेश बल्लाळ हडप | १ | १॥ | १५ |
| अंताजी विश्वनाथ खांडेकर | १ | १ | १० |
| त्रिंबक महादेव जोशी | १ | १ | १० |
| रामाजी बल्लाळ जोशी | १ | १ | १० |
| हरी नारायण कोलटकर | १ | १ | १० |
| मोरो हरी करंदीकर | १ | २॥ | २५ |
| मोरो कृष्ण दाभोळकर | १ | १॥ | १५ |
| बाळाजी रघुनाथ जोशी | १ | १ | १० |
| बाळाजी सदाशिव वैशंपायन | १ | २ | २० |
| दादो बल्लाळ आचवल | १ | १ | १० |
| खंडेराव सुंदर | २ | ७ | ७० |
| रंगो नारायण यांचे पुत्र निळो रंगनाथ करमरकर निसबत दफ्तर पोतनिसी | १ | १ | १० |
| बाळाजी नारायण वैद्य | १ | १॥ | १५ |
| महादाजी गोविंद | १ | १ | १० |
| केसो जगन्नाथ | १ | ·॥· | ५ |
| त्रिंबक नारायण भावे | १ | १ | १० |
| हरी बाबाजी वैद्य | १ | १॥ | १५ |
| सदाशिव शामराज निसबत जिराईतखाना हल्लीं बाळाजी सदाशीव पुत्र यांचे नांवें | १ | १ | १० |
| राघो कृष्ण गोकटे | १ | १ | १० |
| रामचंद्र नारायण | १ | १ | १० |
| आबाजी हरी | १ | १ | १० |
| बापूजी महादेव | १ | ·॥· | ५ |
| आबाजी विश्वनाथ | १ | ·॥· | ५ |
| मोरो नारायण | १ | १ | १० |

| | | | |
|---|---|---|---|
| शिदो सदाशिव | १ | १ | १० |
| शिवराम बल्लाळ | १ | ·॥· | ५ |
| भालचंद्र विनायक | १ | ·॥· | ५ |
| अंताजी महादेव | १ | ·॥· | ५ |
| लक्ष्मण गणेश गोगटे | १ | १ | १० |
| शिवराम विश्वनाथ सोवनी | १ | २ | २० |
| महिपतराव हरी | १ | २ | २० |
| नारो लक्ष्मण | १ | ३ | ३० |
| भगवंत गंगाधर मौजे माळशिरस येथें आणितील | १ | १॥ | १५ |
| सदाशिव नारायण पांगारकर | १ | १ | १० |
| बाळकृष्ण बाबाजी वैद्य | १ | १॥ | १५ |
| गोपाळ महादेव | १ | १ | ११ |
| विठ्ठल मोरेश्वर | १ | २ | २० |
| विसाजी राम भाटवडेकर | १ | २ | २० |
| | १५४ | ३६५॥ | ३३८० |

एकूण तीनशें साडे पासष्ट खंडी गल्ला एकूण बैल सर तीन हजार तीनशें ऐशीं यांची दस्तकें एकशें चोपन्न दिल्हीं असेत.

८४७–( १०७९ ) निळो लक्ष्मण कारकून यांचे तीर्थरूप लक्ष्मण कृष्ण, परगणे मजकुरीं असामीवर जात होते, ते वाटेस मारले गेले. चिरंजीव लहान याजकरितां असामीवर गुमास्ता ठेविला आहे, त्यास परगणे मजकूरचे आजमासास गुमास्ते याचे हातून कामकाज घेऊं नये. जातीनिशीं चाकरीवर असतील त्यास वेतन द्यावें, म्हणून शेरा लिहिला आहे, त्यावरून वेतन देत नाहीं म्हणून हुजूर विदित जालें, त्यास याचे तीर्थरूप मारले गेले. भशारनिल्हे लहान,

अर्बा तिसैन मया व अलफ मोहोरम ७

(847) In the budget of Parganá Aruṇ &c it was a standing order that substitutes should not be allowed to work for permanent officers, and that the salaries should be paid to the officers themselves if actually serving. An exemption to this rule was allowed on the ground that the officer appointed was killed while proceeding to join his appointment and that his son was too young to carry on the duties of his father's office.

A. D. 1793-94

यांजकरितां गुमास्त्यानें चाकरी केली आहे; सबब मागील सालचें वेतन राहिलें तें नेमणुकेप्रमाणें देणें; व पुढें निळो लक्ष्मण यांचे हातून चाकरी घेऊन आजमासास वेतनाची नेमणूक केली आहे, त्याप्रमाणें देत जाणें म्हणून, नारो चिमणाजी कमाविसदार परगणे अरूण वगैरे महाल यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

८४८–( १०९४ ) गंगाधर बापूजी शिधये यांस प्रांत बुंदेलखंड पैकीं नवा मुलुक सरकारांत आला आहे, त्यापैकीं पन्नास हजार रुपयांचे महालची दरकी असामी मोईन सालीना रुपये अडीचशें करार करून नेमून द्यावयाची आज्ञा केली असे, तरी प्रांत मजकूर येथें सदरहू आकाराच्या महालीं असामी नेमून देणें ह्मणोन, अली बहाद्दर यांचे नांवें. सनद १.

अर्बा तिसैन मया व अलफ जमादिलावल २०

रसानगी यादी.

८४९–( ११०९ ) प्रांत कर्नाटक येथील सरसुभा मोरो बापूजी यांजकडे सालमजकुरीं सांगितला असे, तरी माली, व मुलकी, व किल्ले जातसुद्धां बंदोबस्त मशारनिल्हेचे विचारें करित जाणें. यांचे इतल्याशिवाय न करणें हे सरकारआज्ञेप्रमाणें बंदोबस्त करितील ह्मणोन, मामलेदार, व कमाविसदार यांचे नांवें चिटणिसी. पत्रें.

अर्बा तिसैन मया व अलफ साबान २६

५ तालुकेहाय येथील मामलेदार यांस कीं, माली व मुलकी व किल्ले जातसुद्धां बंदोबस्ताविशीं. पत्रें.

१ तालुके मुदकवी, निसबत माधवराव कृष्ण.
१ तालुके नवलगुंद, देखील सरदेसगत निसबत गोविंद भिकाजी.
१ तालुके गदग, निसबत आनंदराव रामचंद्र.
१ तालुके धारवाड, निसबत बाळाराव येशवंत.
१ तालुके कितूर, निसबत महादाजी खंडेराव.

(848) Ali Bahàddar was directed to give Gangádhar Bápuji Sidhaye an office worth Rs. 50,000 in some mahál of the territory of Pránt Bundelkhand, lately acquired by Government.

A. D. 1793-94

(849) Móró Bápuji was appointed Sirsubhá of Karnátak, and the Mámalatdárs were directed to act under his instructions in all revenue and fort matters and to do nothing without consulting him.

A. D. 1793-94

१० महालानिहाय येथील मामलेदार, व कमाविसदार यांस कीं, माली, व मुलकी, व ठाणींसुद्धां बंदोबस्ताविशीं.

१ परगणे जुनी हुबळी, निसबत मोरो बापूजी.
१ परगणे खानापूर, निसबत परशराम रामचंद्र.
१ फुटगांव बारीपलीकडील परगणे मनोळी, निसबत सदाशिव कृष्ण.
१ परगणे सोंडुरपालें, निसबत वेंकटराव घोरपडे.
१ तर्पे तेगूर, निसबत नरसो मेलगीर.
१ देसगत परगणे गदग वगैरे बाबत, डंबलकर निसबत रघुनाथराव नीळकंठ.
१ परगणे बंकापुर, निसबत गोविंद सखदेव.
१ परगणे होनगुंद, निसबत माधवराव कृष्ण दिंमत तोफखाना.
१ परगणे जालीहाळ वगैरे, निसबत आनंदराव भिकाजी.
१ मौजे सूळ मामले तोरगल, निसबत बापूजी रामचंद्र.

१०

१ किल्ले धारवाड निसबत बापूजी शिंदे यांस कीं, माली, व मुलकी, व किल्ले मजकूर सुद्धां बंदोबस्ताविशीं.

१ तालुके सावनूर, निसबत भास्कर सखदेव यांस कीं, तालुके मजकूर येथील माली, व मुलकी, व किल्ले जातसुद्धां बंदोबस्ताविशीं महाल.

१ परगणे गुत्तल.
१ परगणे अडूर.
१ परगणे केरूर बुदरूख.
१ परगणे तीनवल्ली.
१ परगणे कोड.
१ परगणे केरूरखुर्द.
१ परगणे रटेहळ्ळी.
१ परगणे हवसहट्टी.
१ परगणे कुपेलूर.
१ परगणे शींगांव.
१ परगणे ऐरणी.
१ परगणे कागनेळा
१ परगणे निडसंगी
१ परगणे हानगल.

१ परगणे मासूर.
१ परगणे राणेबेन्नूर.
१ पेठ हांवेरी.
१ परगणे कारडगी.
१ कसबे मोरब.
१ कसबे अण्णिगिरी.
१ तालुके उगरगोळ वगैरे गांव, व किल्ले परसगड.
१ कसबे हलगेरी.
१ देसगत संवस्थान हावनूर.

२३

१७

८५० —Gives the salaries and allowances of the various officers in the different Daftars at Poona. The **चालते दप्तर, एक बेरजी दप्तर, निसबत पोतनिसी दप्तर, निसबत फरासखाना, निसबत मजमदारखाना, निसबत वांकनीस.**

रोजकीर्द छ. ५ रबिलाखर सुरसन खमस सबैन मया व अल्लफ, रवा मुदगीचे पोटांत देणं कारकून निसबत दप्तर यांस सन अर्बा सबैनची मोईन रसानगी पट.

| खात्याचें नांव. | इसमाचें नांव. | नक्त. | | | | कापड. | | | एकूण | जास्ती स्वारी हिंदुस्थान. | | | | | एकंदर |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | ऐन. | दिवट्या आफ्तागिरी | पालखी | एकूण | आंख. | रुपये. | एकूण. | | नक्त, | दिवट्या आफ्तागिरी. | कापड | एकूण | पैा करार | |
| निसबत चालते दप्तर. | अंताजी बल्लाळ गुरुजी. | ४५० | १२१ | ० | ५७१ | १०० | ४० | ६११ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| | महादाजी बल्लाळ गुरुजी. | ४०० | १२१ | ११८८ | १७०९ | १०० | ४० | १७४९ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| | हरी बल्लाळ फडके. | ३०० | १२१ | ११८८ | १६०९ | ७५ | ३० | १६३९ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| | बाबूराव केशव ठाकूर | ५०० | १२१ | ० | ६२१ | १५० | ६० | ६८१ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |

| | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | पैकीं भाताचे रुपये ११३॥ वजा जातां बाकी ५६७॥ | | | | | | | |
| | नारो गंगाधर पाळंदे. | ४०० | ११५ | ११८८ | १७०३ | १०० | ४० | १४७३ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| | महादाजी विष्णु गपचूप. | ४५० | १२१ | ० | ५७१ | १०० | ४० | ६११ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| | नारो अनंत परचुरे. | ३०० | १३२ | ११८८ | १६२० | ७५ | ३० | १६५० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| | बाळाजी राम लेले. | ३०० | ५५ | ० | ३५५ | ५० | २० | ३७५ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| | लक्ष्मण नारायण सिधये. | ३०० | १२१ | ० | ४२१ | ५० | २० | ४४१ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| | कृष्णाजी गणेश पेंडसे. | ७०० | १२१ | ० | ८२१ | १५० | ६० | ८८१ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| | | | | | | | | पैकीं सेत सनद रुपये १०० वजा | | | | | | | |

| | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | जातां ७८१ | | | | | | | |
| सदाशिव अनंत अभ्यंकर. | २५० | १२१ | ० | ३७१ | ५० | २० | ३९१ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| कृष्णाजी महादेव गोडबोले. | ४०० | १७६ | ० | ५७६ | १०० | ४० | ६१६ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| गोपाळ रामचंद्र परचुरे. | २७५ | ५५ | ० | ३३० | ७५ | ३० | ३६० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| आपाजी चिमणाजी गोंधळेकर. | ३५० | ६६ | ० | ४१६ | १०० | ४० | ४५६ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| महादाजी नारायण जोशी. | ३०० | ११० | ० | ४१० | ५० | २० | ४३० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| बगाजी रघुनाथ | ३०० | १२१ | ० | ४२१. | १२५ | ५० | ४७१ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| बाजी गोविंद जोशी. | ६०० | १२१ | १००० | १७२१ | २०० | ८० | १८०१ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| गोविंद राम आपटे. | ३०० | ५५ | ० | ३५५ | ७५ | ३० | ३८५ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| विसाजी गणेश दातार. | ३०० | ० | ० | ३०० | ७५ | ३० | ३३० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| कृष्णाजी गोविंद आपटे. | ३०० | ० | ० | ३०० | १०० | ४० | ३४० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| बाजी अनंत पंडित. | ३०० | ० | ० | ३०० | ७५ | ३० | ३३० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| चिंतो शिवाजी सोवनी. | ३५० | ० | ० | ३५० | ७५ | ३० | ३८० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |

| | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| कृष्णाजी राम चोळकर. | २५० | ० | ० | २५० | ६० | २४ | २७४ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| वासुदेव राम चोळकर. | ३०५ | ० | ० | ३०५ | ० | ० | ३०५ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| लक्ष्मण बल्लाळ सहस्रबुद्धे. | ३०० | ० | ० | ३०० | ७५ | ३० | ३३० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| कृष्णाजी तुकदेव गोडबोले. | ३०० | ० | ० | ३०० | ५० | २० | ३२० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| सदाशिव नारायण सिधये. | २५० | ० | ० | २५० | ५० | २० | २७० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| सदाशिव बल्लाळ भिडे. | ३०० | ० | ० | ३०० | ० | ० | ३०० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| बाबाजी महादेव भट. | ३२५ | ० | ० | ३२५ | ६० | २४ | ३४९ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| विनायक मोरेश्वर. | ३५० | ० | ० | ३५० | १०० | ४० | ३९० | ० | १५० | १२१ | २० | २९१ | १९६ | ५८६ |
| बाळाजी हरी ढवळे. | ४०० | ० | ० | ४०० | १०० | ४० | ४४० | ० | १०० | १२१ | २० | २४१ | १७१ | ६११ |
| भगवंत अनंदराव. | ४०० | ० | ० | ० | ० | ० | ४०० | ० | १०० पैकीं करार २५ | १२१ | ६० पैकीं करार ४० | २८१ | १८६ | ५८६ |
| शिवराम विश्वनाथ. | ३०० | ० | ० | ३०० | ७५ | ३० | ३३० पैकीं गैरहजेरी | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |

| | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | वजा ४० बाकी २९० | | | | | | | |
| बाळाजी बापुजी केळकर. | ३०० | ० | ० | ३०० | १०० | ४० | ३४० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| मल्हार राम बापट. | ३०० | ० | ० | ३०० | ७५ | ३० | ३३० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| महादाजी बाबूराव लिमये. | ५०० | ० | ० | ५०० | ७५ | ३० | ५३० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| आबाजी कृष्ण विद्वांस. | २५० | ० | ० | २५० | ४० | १६ | २६६ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| भास्कर विश्वनाथ सोवनी. | २५० | ० | ० | २५० | ५० | २० | २७० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| शिवराम शंकर जोशी. | ३५० | ० | ० | ३५० | १०० | ४० | ३९० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| खंडो राम बापट. | २७५ | ० | ० | २७५ | ५० | २० | २९५ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| नारो राम आगाशे. | ३०० | ० | ० | ३०० | ५० | २० | ३२० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| महादाजी नारायण परचुरे. | १५० | ० | ० | १५० | ७५ | ३० | १८० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| रामचंद्र गोविंद पेंडसे. | २५० | ० | ० | २५० | ५० | २० | २७० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |

८६५ ( १०७४ )–अबदूल सलाम वल्लद अहमदुल्ला व शेख हिंमत वल्लद शेर

सलास तिसैन मया व अलफ सवाल २३

महंमद देशमूख व देशपांडे, परगणे उंडणगांव, व देशमूख, तर्फ हवेली, परगणे शेंदुरणी, व तर्फ तोंडापूर, परगणे जामनेर, शके १७१४ परिधावीनाम संवत्छरे यांचे नांवें निवाडपत्र करून दिल्हें कीं, तुमचा व शेख अबदुल रहीम वल्लद अबदुल जबर याचा सदरील वतनाचे विभागाविशीं कजिया लागोन, मनमुबी सरकारांत पडली; त्याजवरून तुह्मीं व त्यांणीं तकरीत लेहून दिल्यावर दोघांपासून जामीन घेऊन पुरशिसांचीं उत्तरें लेहून घेतलीं, त्यास तुमचे तकरीरेंतील अनवय जे आमचा वडील मूळ पुरुष ठाकूर कामाजी यांणीं मवासी करून वतन मेळविलें. त्यांचे पोटीं चौघे बेटे जाहले. त्यास ठाकूर कामाजी मयत जाहल्यावर पादशाहा यांणीं चौघा बेट्यांस धरून नेऊन अशीरच्या किल्यावर कैदेंत ठेविलें; आणि वतन जफ्त केलें. त्यास, बंदांत तिघे मयत जाहले. पाहूजी एक राहिला. त्यास पादशाहांनीं नेऊन, मुसलमान करून, सदरील देशमूख व देशपांडेपण, व मोकदम्या देऊन, वतनाचा फर्मान करून दिल्हा; आणि मौजे शेलवड वगैरे येथील जाहगीर दिल्ही. तेव्हां हे गांवास येऊन वतनें चालऊं लागले. त्याचे लग्नाची बायको गोदरी, पिंपरीकर गायकवाड याची लेक होती. तिचे पोटीं ‘ अमाजुल्ला ’ जाला. त्याची अवलाद आह्मी, व कंचनी रखेली होती, तिचे पोटीं ‘ करिमुल्ला ’ जाहला; व महाले रजपूत यांची लेक घरांत घातली. तिचा निका जाहाला नाहीं. तिचे पोटीं रहिमुल्ला जाहला. त्यास पाहूजी ऊर्फ अबदुल सलाम यांणीं आपले हीन हयातींत दरोबस्त वतनाचा आपले व काजीचे मोहोरेनिशीं देहायनामा करून, आमचे निपणजे, व पणजे अमाजुल्ला यांजवळ दिल्हा. नंतर ते फोत जाहाले. त्याजवर बिगर निकावाली लेक रहिमुल्ला व कंचनीचा करिमुल्ला होता. त्यांचे अन्नावस्त्राचे बेगमीस पाटिलकीचा एक एक गांव नेमून देऊन दरोबस्त वतन आमचे हवालीं केलें. त्याजवर रहीमुल्लाचें कुटुंब वाढलें. एकया गांवावर अन्नवस्त्र न चाले, याजकरितां त्यांणीं आमचे आज्याजवळ बजीदी केली. त्याजवरून ऊंडणगांव परगणियापैकीं आठ गांवचे देशमुखीचा रुसूम नेमून दिल्हा. त्याप्रमाणें त्याजकडे भोगवटा चालत असतां अबदुल रहीम याचा बाप अबदुल जबर आह्मांशीं वतनाचे वांटणीविशीं कजिया करून, मोगलाईत इनसाफास गेले. तेथें खोटे होऊन फारखती, व बेदावा आपले सहीमोहोरेनिशीं लेहून, अमाजुल्लास दिल्हा. त्याप्रमाणें वतनाचा भोगवटा पहिल्यापासून चालत आल्याप्रमाणें चालत असतां, हल्लीं अबदुल जबर याचा लेक अबदुल रहीम वतनाचे वांटणीविशी कजिया करून सरकारांत फिर्याद आला आहे ह्मणोन; व अबदुल रहीम याचे लिहिण्यांतील मजकूर कीं पाहूजीच्या बायका लग्नाच्या दोन. थोरलीची अवलाद अबदुल सलाम, व शेख हिंमत; व धाकटीची अवलाद आह्मी आहों. आह्मांस वतनाचा वांटा असावा; ह्मणोन आमचा बाप

(865) This is a decision in a dispute relating to a Deshmukhi

अबदुल जबर मोगलाईत नवाब निजाम अलीखान बाहादूर यांजकडे फिर्याद होऊन पंचाईत शहर औरंगाबाद येथील सुभ्यावर नेमून घेतली. तेथें आह्मी कागदपत्र दाखऊन खरे जाहलों असतां, वाद्यांनीं पैका खर्च करून जबरदस्तीनें आमचे बापापासून बेदावा फारखती घेतली. त्याजवर आपण सरकारांत फिर्याद आलों. त्यास पाहुजीचे वेळेचा देहायनामा ते दाखवितात, तो खोटा आहे, ह्मणोन, याप्रमाणें हरदुजणांनीं लेहुन देऊन वर्तणुकेस जामीन दिल्यावर आपलाले साधनांचे कागदपत्र दाखविले. त्याजवरून पंचाईतमतें मनास आणितां पाहुजींची लग्नाची बायको एक याप्रमाणें देहायनाम्यांत लिहिलें आहे. वतनाचा भोगावटाही लग्नाचे बायकोचे अवलादीकडे चालत आहे. वरकड वतनदार पडोशी यांणीं सुरत महजर अबदुल सलाम व शेख हिंमत यास लेहून दिल्हा आहे. त्यांत देहायनाम्याप्रमाणेंच अर्थ आहे; व औरंगाबादेस आम्हीं कागदपत्र दाखऊन खरे जाहालों, असें अबदूल रहीम यांच्या लिहिण्यांत आहे. त्यास कागदपत्र मागतां आपणाजवळ नाहीं. होते ते मनसुबीं पुरवीच गेले म्हणोन लेहून देतो. तेव्हां कागदपत्र दाखविले असें लिहिलें तें खोटें. उगाच खिसा लिहिला तो प्रमाण काय ? देहायनामा खोटा म्हणोन लिहितो त्याची चौकशी करितां देहायनामा काजी जलाल उंडणगांवकर व पाहुजी यांचे मोहरेनिशीं आहे. त्यास आजपावेतों एकशें एकूण वन्नास वर्षें जाहलीं. मोहरांतील अक्षरें स्पष्ट वाचत नाहींत. सबब मोकाबल्यास दुसरे कागद त्या कालचे त्या मोहरेचे आणविले. ते अबदुल सलाम व शेख हिंमत यांणीं आणून दाखविले. त्यांवरून देहायनामा खरा ठरला. पैठणास निमेचा ठराव होऊन कराराची याद मान्यतेची करून दिल्ही त्या यादीची नक्कल व अबदुल सलाम यांणीं रहीमुल्लास निमेचें वतनाविशीं लेहून दिल्हें, त्या कागदाची नक्कल एकूण दोन नकला त्याणें दाखविल्या. त्याच्या असला दाखविणें म्हणोन, पुरशीस करितां असला नाहीं. ऐसे पुरशिशीचें उत्तर लेहून देतो; व दुसरे कागद दाखविले तेही मनसुबीचे उपयोगीं साधनें बलोत्तर ( बलवत्तर ? ) पडलीं नाहीं. याजवरून सारांश पाहतां पाहूजीनें देहायनामा करून ठेविला त्यास आज तागाईत एकशें एकूण वन्नास वर्षें जाहलीं; व त्याप्रमाणें भोगवटाही तुम्हांकडेसच चालिला. यांचे दाखल्याचे कागद उंडणगांवकर परगणियाचे पाटलाचा राजीनामा, व दिवाण सुखानंद याचे मोहरेचा महजर, व अमीरबेगखा याचा कौल, व पिलाजी जाधवराव याचें पत्र, व अजीमुद्दौला, सुभा औरंगाबाद, यांजपाशीं पाटील कुळकर्णी यांणीं महजर करून दिल्हा तो, व अबदुल जबर याचे यजीतखत, व जिवाजी रघुनाथ वकील सरकार याचा कौल, व पंचायतीचा सुरत महजर, वं औरंगाबादेचे सुभ्याची सनद, व हलीं सरकारांत शाहिदीनामा तुमचे पडोशीचे जमीदार पंचांनीं पाठविला तो, व देहायनाम्याचे दाखल्यास तुम्हीं

---

A. D. 1792-93. Watan in Parganá Undangam, & Parganá Shendurni; it is mentioned that the original holder of the watan was

पत्रें आणून दाखविलीं तीं, याप्रमाणें सर्व कागदपत्र पाहतां लेहून दिल्याप्रमाणें लेख भोग्य साक्षीनिशीं पुरवणींत येऊन तुम्हीं खरे जाहालेत. अबदुल रहीम वतनाचे हिशाविशीं तुम्हांपाशीं भांडत होता तो खोटा पडिला याउपरी त्यास हिशाविशीं भांडावयास संबंध नाहीं. तुमचे वडील अबदुल सलाम याणीं अबदुल जबर यास परगणें उंडणगाव पैकीं आठ गांवचा देशमुखीचा रुसूम नेमून दिल्हा आहे. त्याप्रमाणें म्हणोन पुरशीस करितां असला नाहीं. असें पुरशीसीचें उत्तर लेहून देतो; व दुसरे कागद दाखविले तेही मनसुबीचे उपयोगीं साधनें बलोत्तर पडलीं नाहीत यांजवरून पाहतां अबदुल रहीम वाद सांगतो तो खोटा; वतनाच्या हिश्याविशीं त्याजला तुम्हांशीं कजिया करावयास संबंध नाहीं. अबदुल सलाम यांणीं अबदुल जबर यास परगणे उंडणगांव पैकीं आठ गांवचा देशमुखीचा रुसूम नेमून दिल्हा आहे. त्याप्रमाणें अबदुल रहीम यांणीं घेऊन असावें. जाजती कजिया तुम्हांशीं करूं नये. याप्रमाणें ठराव होऊन तुम्हीं देहायनाम्याचे दाखल्यास पत्रें आणून दाखविलीं तीं, व सर्व कागदपत्र पाहतां तुम्हीं लेहून दिल्याप्रमाणें लेख भोग्य साक्षीनिशीं पुरवणींत येऊन खरे जाहालेत, सबब तुम्हांस हें निवाडपत्र सादर केलें असें, तरी सदरील महाल एक व तर्फा दोन येथील देशमुखी व परगणे उंडणगांव येथील देशपांडेपणाचें वतन सुदामत चालत आल्याप्रमाणें तुम्हीं व तुमची अवलाद पुस्त दर पुस्त अनुभऊन सुखरूप राहणें. तुम्हीं वादांस खरे जाहालेत. सबब वतन संमंधें तुम्हांकडे सरकारची हरकी रुपये ३००१ तीन हजार एक रुपया करार केली. त्याचा भरणा सरकारांत करून जाब घेणें म्हणोन नांवाचें निवाडपत्र. १.

सदरील अन्वयें पत्रें कीं सदरील वतन सुदामत चालत आल्याप्रमाणें देशमूख व देशपांडे मजकूर यांजकडे व याचे अवलाद अफलाद पुस्त दर पुस्त चालवित जाणें. या पत्राची नक्कल लेहून घेऊन, हें असल पत्र याजवळ भोगवटियास परतोन देणें ह्मणोन पत्रें.

१ देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी परगणे उंडणगांव, व परगणे शेंदुरणी, व परगणे जामनेर यांस.
१ देशमूख व देशपांडिये परगणे शेंदुरणी, व परगणे जामनेर यांस.
१ मोकदम देहाय परगणे उंडणगांव, व तर्फ हवेली, परगणे शेंदुरणी, व तर्फ तोंडापूर, परगणे जामनेर यांस.

---

२

एकूण च्यार चिटणिशीं पत्रें दिल्हीं असेत. पैकीं नांवाचे निवाडपत्रांतील सारांश येथें बार करून निवाडपत्राची नक्कल तपसीलवार करून दसरीं ठेविली असे.

---

a Thákur, and that he was forcibly converted to Islam by the Mogal Emperor.

# ७ न्यायखातें.

## ( ब ) फौजदारी.

## ( अ ) गुन्हे.

### १ फंदफितुरी व राजद्रोह.

८६६ ( ९१ )-किल्ले दौलताबाद येथील हवालदार वगैरे यांणीं किल्ल्याचा फितूर केला होता, त्याच्या तकरीच्या तुह्मीं नारो बाबाजी याजकडे लिहून पाठविल्या होत्या, त्या मशारनिल्हे यांणीं हुजूर पाठविल्या; त्याजवरून सविस्तर विदित जाहलें. त्यास फितुरांत मुख्य असाम्या होत्या त्यांचें शासन येणेंप्रमाणें.

खमस सबैन
मया व अलफ
जमादिलाखर ३

१ बाळोजी कराले हवालदार यास तोफेच्या तोंडीं देऊन उडवावें.

२ एकेक हात व एक पाय तोडून टाकणें.

१ संभाजी कराले, हवालदार याचा लेक.

१ जावजी नाईक दिंमत हवालदार.

एकूण तीन असामींचें शासन सदरहूप्रमाणें करणें. याखेरीज फितुरांतील असामी.

१ माधवराव कालेले.

१ माधवराव हरी.

## ( B ) Criminal

### ( 1 ) Conspiracy & Treason.

( 866 ) The Havaldár and other men of fort Daulatábád having become traitors, Dhondo Mahádev made inquiries, recorded evidence and forwarded the papers to Náro Bábaji who submitted them to Government. The following orders were issued: —

A. D. 1774-75.

( 1 ) Báloji Karále, Havaldár, should be blown from the mouth of a cannon;

( 2 ) His son Sambháji and Jávaji serving under him should each have one hand and one foot cut off;

१ अंताजी कृष्ण.
१ महिमाजी अश्वठराव.

४

येणेंप्रमाणें चार असाम्यांचा अन्याय पाहून शासन करणें. ब्राह्मण शेणवी यांत असतील त्यांस बिडी घालून पोटास नागली देत जाणें. ब्राह्मण शेणवी यांस नाचण्या देऊन बेडी घालून ठेवावें ह्मणोन, धोंडो महादेव यांचे नांवें. सनद १.

परवानगी रूबरू.

८६७ ( ९३ )—मौजे वागज, तर्फ करेपठार, प्रांत पुणें येथील अंमल महिपतराव पुणेंकर शिलेदार यांजकडे सरंजाम होता, त्यास मशारनिल्हे हैदर नाईक याजकडे गेले, सबब गांवची जप्ती सरकारांत करून जप्तीची कमावीस गंगाधर त्रिंबक यास सांगितली असे, तरी मशारनिल्हेसी रुजू होऊन, मौजे मजकूरचा अंमल सुरळीत देणें ह्मणोन, मोकदम मौजे मजकूर याचे नांवें. सनद १.

खमस सबैन मया व अलफ रजब १६

रसानगी यादी.

## नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

८६८ ( १९३ )—माधवराव बांडे यांजकडे चाकरीस राहून लबाडी करितात, याजकरितां बांडे याजकडे चाकरीस लोक गेले असतील, त्यांचा शोध करून, घराची जप्ती करून, वस्तभावेचा जाबता हुजूर पाठऊन देणें; आणि मुलामाणसांस तसदी चांगली देऊन तिकडून उठोन तोरखेड्यास यादवराव रघुनाथ याजवळ रुजू होऊन आपले घरीं येत तें करणें, सदरहू असामीची जप्ती यादवराव रघुनाथ यांजकडील कारकुनाचे गुजारतीनें करणें ह्मणोन. सनदा.

खमस सबैन मया व अलफ रबिलाखर ५

---

( 3 ) Four other persons should be punished according to their deserts, any Brahmins and Shenwis being put in chains and given only *nagli* to eat.

( 867 ) Mahipatrao of Poona, a Silledár, having gone over to Haidar Naik, his saranjam was attached.
A. D. 1774-75.

FROM NÁRO APPÁJI'S DIARY.

( 868 ) The houses and property of persons who had gone to serve under Mádhavrao Bánde were ordered to be attached.
A. D. 1774-75.

१ नारायणराव बारगल, तालुके तळोदें, निसबत तुकोजी होळकर.
१ गोविंदराव बुळे ठाणें जावर, दिंमत तुकोजी होळकर.
१
१
१

सनदा छ. १८ रबिलावल हस्तकपत्र पुरंधर.

८६९ ( १९४ )—नारायणराव कृष्ण यांचें नांवें सनद कीं, हैबती थिटा, व सटवाजी साकोरा व झाप माळी, व मल्हारजी साकोरा, व लक्ष्मण बिन सटवाजी साकोरा, व रयते कसबे केंदूर, यांणीं गावांत बखेडा करून रयेतीस फिसात करून गावांतून बाहेर घेऊन गेले आहेत. ते चिंचोसीस जाऊन गांवची वसूली सरकारची कलमें आहेत तीं माफ करावीं म्हणोन, मुद्दे घालून गांवची लावणी होऊं देत नाहीं, व वसुलही देत नाहीं म्हणोन, मोकदम व कमाविसदार यांणीं हुजूर विदित केलें, त्याजवरून हे सनद सादर केली असे; तरी सदरहू पांच असामीं किल्ले चाकण एथें अटकेस ठेऊन पोटास शिरस्ते प्रमाणें देत जाणें; आणि बंदोबंस्तानें ठेवणें म्हणोन. छ. १३ रबिलावल. सनद १.

खमस सबैन मया व अलफ रबिलाखर ५

रसानगी यादी.

८७० ( २६२ )—किल्ले सूरगड, तालुके अवचितगड, येथील फितव्याचा मजकूर लिहिला तो साद्यंत कळला. हवालदार यास वगैरे फितूरी लोक यांस अटकेस ठेविले आहेत. त्यांचें पारिपत्य करावयाची आज्ञा करावी म्हणोन लिहिलें, त्यास हवालदार याचे डोकें मारणें, व येसजी पवार व बहिरजी भोपतराव यांचे हातपाय तोडणें, व दुसरे फितूरी लोक आहेत त्यांची चौकशी करुन ज्याचा जसा अन्याय असेल त्याप्रमाणें पारिपत्य करणें. माहदाजी गणेश फडके

सीत सबैन मया व अलफ जिल्काद २८

( 869 ) Haibati Thitá, Satwáji Sákorá, and others of Kendur instigated the ryots of the village to leave their homes and took them to Chinchosi; they asked that certain demands of Government on the village should be remitted, and refused to allow the lands to be cultivated or to pay the revenue till their request was granted. The Mokadam and Kamávisdár having represented the matter to the Huzur, the 5 instigators were ordered to be confined in fort Chákan.

A. D. 1774-75.

( 870 ) A conspiracy was detected among the officers of fort Surgad in Táluká Awachitgad. It was ordered that the Hawaldár should be beheaded, that two others should have

A. D. 1775-76.

यास बेडी घालून माफजतीनें बरोबर लोक देऊन हुजूर रवाना करणें. किल्ले वंदनगडकरी लोक, आठरा असामी, तालुके मजकुरी आहेत त्यास चार महिनें नामजाद ठेवावयाची आज्ञा करावी म्हणोन लिहिलें, त्यास तूर्त तालुके मजकुरी ठेवणें म्हणोन, आबाजी बल्लाळ व भास्कर महादेव यांचें नांवें. सनद १.

परवानगी रूबरू.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

८७१ ( २९१ )—अबी सुपी व राधी सांगली, कोळ्याच्या बायका यांचे भाऊबंद कोळ्यांत गेले म्हणून हुजूर पाठविल्या, त्यांची चौकशी करून तुम्हांकडे पाठविल्या असे, तरी कोळणीमजकूर यास हजीर जामीन घेऊन सोडून देणें म्हणून, रामचंद्र महादेव कमाविसदार, कसबे खेड, यांचे नांवें. छ. २५ रविलावल. सनद १.

सीत सबैन मया व अलफ रविलाखर १५

रसानगी यादी.

८७२ ( ३३० )—सखाराम हरी फितुर करीत होते, सबब बिडी घालून तुम्हांकडे किल्ले नगर येथें अटकेंत ठेवावयास पाठविले आहेत, त्यास पोहोंचवावयास कृष्णाजी मैराळ कारकून, व स्वार व गाडदी दिल्हे आहेत. त्यांस पक्क्या बंदोबस्तानें किल्ले मजकुरीं अटकेंत ठेऊन भोजन घालीत जाणें. परभू कारकून त्यांजवळ जाऊं न देणें. चौकीस माणसें ठेवाल तीं वरचेवर बदलीत जाणें. मराठा एक माणूस खिजमतगारीस ठेऊन देणें. तो पंधरा दिवसां बदलीत जाणें. धोत्रें अगर शेलापागोटें लागल्यास देणें. जेवणाची व वस्त्रपात्राची आबाळ न करणें. बेडी नेहमीं असों देणें. सखाराम हरी खेळ्या राजकारणी आहे. कोणे गोष्टीस चुकणार नाहीं. याजकरितां एक कोठडी करून त्यांत घालून बाहेरहून कुलुप घालीत जाणें. एकास त्याज-

सबा सबैन मया व अलफ साबान २०

---

their hands and feet cut off, and that the rest should be punished according to their deserts.

### FROM JANARDAN APAJIS DIARY.

( 871 ) Two Koḷi women were arrested, as their kinsmen were implicated in an insurrection, and were sent to Huzur. Orders were issued for their release, after taking security for their appearance whenever required.

A. D. 1775-76.

( 872 ) Sakhárám Hari being implicated in a conspiracy was sent to prison in fort Nagar. The Officer in charge of the fort was directed to give him proper food and clothing, to allow no Parbhu kàrkun to approach him, to change the guard over him frequently and his attendant every fortnight, and to lock him up in a room. The Officer was warned that the prisoner was a

A. D. 1776-77.

वळ जाऊं न देणें. याचे गुण तुम्हांस ठाऊकच आहेत. या करितां फार चांगला बंदोबस्त करणें म्हणोन, महादाजी नारायण यांचे नांवें. सनद १.

परवानगी रूबरू.

८७३ ( ३३१ )—बाबूराव हरी फितुर करीत होते, सबब बिडी घालून तुम्हांकडे किल्ले सिंहीगड येथें अटकेंत ठेवावयास पाठविले आहेत, त्यास पोहोंचवावयासी विठ्ठल यशवंत कारकून व स्वार व गाडदी दिल्हे आहेत. त्यांस पक्क्या बंदोबस्तानें किल्ले मजकुरी अटकेंत ठेऊन भोजन घालीत जाणें. परभू कारकून त्याजवळ जाऊं न देणें. चौकीस माणसें ठेवाल तीं वरचेवर बदलीत जाणें. जेवावयास ब्राह्मणाकडून घालवीत जाणें. जेवणाची आबाळ न करणें. धोत्रें . शेलापागोटें लागेल तें लिहून पाठवणें. ज्या कोठडींत ठेवाल तेथें प्रवेश होऊं न देणें. बेडी नेहमीं असों देत जाणें. सारांश गोष्ट, फितुरी आहेत. यांचा विश्वास न धरितां पक्क्या बंदोबस्तानें ठेवणें म्हणोन, सखो मल्हार यांचे नांवें. सनद १.

सबा सबैन मया व अलफ साबान २०

परवानगी रूबरू.

दौलत बाबूराव, बाबूराव हरी यांचे पुत्र, फितुरांत होते. त्यांस बिडी घालून किल्ले चाकण येथें अटकेंत ठेवावयास तुम्हांकडे पाठविले आहेत. त्यांस पोहोंचवावयास राघो नारायण कारकून, व स्वार, व गाडदी दिल्हे आहेत, तरी पक्क्या बंदोबस्तानें अटकेंत ठेऊन भोजन घालीत जाणें. परभू कारकून त्याजवळ जाऊं न देणें. चौकीस माणसें ठेवाल तीं वरचेवर बदलीत जाणें. एक मराठा माणूस खिजमतगारीस व्रतनदार पाहून ठेऊन देणें. पंधरा दिवशीं बदलीत जाणें. जेवणाची आबाळ न करणें. धोत्रवस्त्रपात्र लागल्यास लिहून पाठवणें. येथून पाठविलें जाईल. ज्या खोलींत ठेवाल तेथें दुसऱ्या माणसाचा प्रवेश होऊं न देणें. पक्क्या बंदोबस्तानें ठेवणें म्हणोन, नारायणराव कृष्ण यांचे नांवें. सनद १.

परवानगी रूबरू.

महिपत बाबूराव, बाबूराव हरी यांचे पुत्र, फितुरांत होते, सबब बिडी घालून किल्ले त्रिंबक येथें अटकेंत ठेवावयास तुम्हांकडे पाठविले आहेत. त्यांस पोहोंचवावयास सदोशिव शंकर कारकून, व स्वार, व गाडदी दिल्हे आहेत, तरी किल्ले मजकुरीं पक्क्या बंदोबस्तानें अटकेंत ठेऊन भोजन घालीत जाणें. चौकीस माणसें ठेवाल तीं वरचेवर बदलीत जाणें. परभू कारकून त्यांजवळ जाऊं न देणें. एक मराठा माणूस खिजमतगारीस ठेऊन देणें. पं-

---

scheming politician, who would stop at nothing, and that every precaution should therefore be taken for his safe custody. He should always be kept in fetters and no one allowed to go near him.

( 873 ) Similar orders were issued in regard to Báburao Hari,

धरा दिवशीं बदलीत जाणें. वस्त्रपात्र कार्याकारण लागेल तें देत जाणें. जेवणाची व वस्त्रपात्राची आबाळ न करणें. ज्या कोठडींत ठेवाल तेथें दुसऱ्याचा प्रवेश न होय असें करणें. पक्का बंदोबस्त करणें ह्मणोन, धोंडो महादेव यांस. सनद १.

परवानगी रूबरू.

भास्कर नारायण फितुरांत होते, सबब बिडी घालून किल्ले धोडप येथें अटकेंत ठेवावयास तुम्हांकडे पाठविले आहेत, त्यांस पोहोंचवावयास हैबतराव माणकेश्वर कारकून, व स्वार, व गाडदी दिल्हे आहेत; तरी किल्ले मजकुरीं पक्के बंदोबस्तानें अटकेंत ठेऊन जेवावयासी घालीत जाणें. चौकीस माणसें ठेवाल तीं वरचेवर बदलीत जाणें. वस्त्रपात्र लागेल तें कार्याकारण देत जाणें, वरचेवर सावधगिरी करीत जाणें ह्मणोन, बाजीराव आपाजी यांचे नांवें. सनद १.

परवानगी रूबरू.

मीर्जा फाजलबेग फितूर करीत आहे, सबब बिडी घालून तुम्हांकडे किल्ले नारायणगड येथें अटकेस ठेवावयास पाठविले आहेत, त्यांस पोहोंचवावयास मुळचंद कारकून, व स्वार, व गाडदी दिल्हे आहेत; तरी पक्क्या बंदोबस्तानें ठेऊन पोटास शेर देत जाणें ह्मणोन, रामचंद्र शिवाजी यांचे नांवें. सनद १.

परवानगी रूबरू.

८७४ ( ३४३ )—रावजी परभू याचें घर मौजे सिद्धेश्वर, तालुके पाल, येथें आहे, त्यास रावजी मजकूर हा दोन वर्षें कोळ्यांत मलई करून, कागदपत्र पाठऊन, लबाड्या करीत होता; ह्मणोन हुजूर विदित जाहलें, त्यावरून हें पत्र तुम्हांस सादर केलें असे; तरी तुह्मी सुभाहूनच त्याचे घरीं बातमी न कळतां, तो घरीं असेल ते वेळेस जप्ती दहा शिपाई, व एक कारकून चांगला इतबारी पाहून, त्याचे घराची जप्ती करून कागदपत्र त्याचे घरांत जे सांपडतील ते जप्त करून पाठवणें; व रावजी मजकुरास निराळा काढून, कोणाचे मार्फतीनें कोळ्याचे कामांत पडला

सबा सबैन
मया व अलफ
रमजान २९

A. D. 1776-77. Daulat Báburao and Mahipat Báburao, Bháskarrao Nàràyan and Mirza Fazalbeg, to the Officers of the forts of Sinhgad, Chàkan, Trimbak, Dhoḍap and Náràyaṇgaḍ respectively.

( 874 ) Government having learnt that Ráwaji Parbhu was in communication with the Kolis and was inciting them to rebellion, Rámrao Náráyaṇ in Tàluká Rájmáchi was directed to search his house at Sidheswar in Tàluká Pál without previous intimation, and attach and send to the Huzur all the papers that might be found therein. Rámrao was further directed to ascertain

A. D. 1776-77.

होता, कसकसी वर्तणूक करावयास कोणीं सांगितली होती, त्याप्रमाणें कोळ्यांत कसा मिळाला होता, तें सविस्तर त्याची जमानी लिहून घेऊन, सत्वर हुजूर पाठवणें. हुजुरून जप्ती आली आहे असें त्यास तूर्त कळों न देणें. युक्तीनें त्याचे घरांत कागदपत्र व त्याची जमानी लिहून घेऊन पाठवणें; आणि हुजुरून आज्ञा होईल तेव्हां रावजीस सोडावयाचा जाहल्यास जामीन घेऊन सोडणें, तूर्त किल्ल्यास नेऊन ठेवणें ह्मणोन, रामराव नारायण तालुके राजमाची यांचे नांवें छ. १७ रजब परवानगी राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस.

सनद १.

## मुतालीक ह्यांचे रोजकीर्दीपैकीं.

८७५ ( ८ )—नारो रामाजी कारकून हा बाजी गोविंद बर्वे यांजकडून हैदरखानाचे लष्करांतून बातमीस लष्करांत आला होता, तो सांपडला, सबब तुम्हांकडे किल्ले धारवाड येथें अटकेस ठेवावयास मराठे गाडदी दिंमत रामजी वणजारे वगैरे असामी २० वीस असामीं बराबर पाठविले आहे, तरी याचे पायांत बिडी घालून किल्ले मजकुरीं पक्क्या बंदोबस्तानें ठेऊन पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन, त्रिंबकराव येशवंत यांचे नांवें. सनद १.

समान सबैन मया व अलफ सवाल ३

परवानगी रूबरू.

८७६ ( ६२२ )—मौजे घनगड येथिल लोक रामचंद्र गोविंद, माजी कारखानीस, यांणीं इंग्रजांचे गडबडेंत सालगुदस्तां फिताऊन सखाराम हरी अटकेस होता, त्यास मोकळा करून, किल्ला बदलावा असा मनसबा करून, बाहेरील लोक बीरदीचे रानांत आणून लबाडी करित होता, तो इंग्रजाचा मोड जाहला तेव्हां रानांतील लोक पळून गेले. पुढें फितुराचें वर्तमान तुम्हांस कळल्यावर तुम्ही चौकशी केली. तो आठ आसामी फितुरी, त्यांपैकीं कारखानीस मजकूर व जावजी मापारी

समानीन मया व अलफ जमादिलाखर ४

---

from him in private full particulars as to how he joined the Kolis, who induced him to do so, and what part he took in their affairs, and to submit his statement to the Huzur.

## FROM THE MUTÁLIK'S DIARY.

( 875 ) Náro Rámji Kárkun who was found to be a spy sent by Bàji Govind from Haiderkhán's camp was sent to prison.

A. D. 1777-78.

( 876 ) During the disturbances caused by the English in the preceeding year, Rámchandra Góvind, who formerly held the office of Kárkhànnis, collected a force in the forest of Birandi, and entered into a plot with the men of the fort of

A. D. 1779-80.

बरदेकर हे दोघे लष्करांत जाऊन येऊन बातमी नेत होते, त्यामुळें पळून गेले. बाकी सहा असामी फितुरी तुह्मांस सांपडले, ते हुजूर पाठविले त्याचे अपराध मनास आणून शासनाविशीं. कलमें.

| किता. | असामी. |
|---|---|
| १ | तानाजी नाईक बंबर तट सर नौबत याचा अपराध पाहतां भारी शासनास योग्य; परंतु सरकारांत फितुराचें वर्तमान जाहीर केलें, सबब उजवा हात तोडणें. |
| १ | खंडोजी सेजवलकर, सयाजी सुर्वे याचा भाऊ, सयाजी मजकुराचे ऐवजीं चाकरीस होता, त्यास सखाराम हरी यास मोकळा करावयाच्या मनसब्यांत तूं आहेस कीं नाहीं असें जैतोजी जांबुळकर, व देवजी महाडीक यांणीं पुशिलें असतां तुह्मांस कळविलें नाहीं, सबब शासनास योग्य, परंतु भावाचे मुबदला नव चाकरीस आला, सबब न सांगितलें, परंतु कारखानिसाचे निरोप लोकांस सांगत होतां, असा फितुराचा मिलाफी, सबब उजवा हात तोडणें. |

दोन असामीचे उजवे हात तोडणें.
कलम १.

| किता. | असामी. |
|---|---|
| १ | देवजी धोंडजी महाडीक. |
| १ | भिवाजी धोंडजी नाईकेणें. |
| १ | मोराजी बहिरजी नाईकगुंड. |
| १ | जैताजी जांबुळकर. |
| ४ | |

चार असामी बहुत अपराधी, सबब त्यांस तोफेच्या तोंडीं बांधून उडवून ---
कलम. १

Ghangad for the surrender of the fort and the release of Sakhárám Hari. On hearing of the defeat of the English, the force which had assembled dispersed. The plot was then discovered and eight persons were found to have been implicated in it. Two of them, the Kárkhànnis, and Jáwaji Mápári absconded. The rest were arrested and punished as follows:—

(1) Tánáji Náik Sarnobat deserved condign punishment; but as he gave information to Govt. he was allowed to escape with the loss of only his right hand.

एकूण दोन कलमें लिहून सहा अपराधी तुह्मांकडे किल्ले मजकुरीं येसाजी दरवडा खिजमतगार याजबराबर पाठविले आहेत, तरी खिजमतगाराचे विद्यमानें सदरहू दोन कलमांप्रमाणें पारिपत्य करून हुजूर लेहून पाठवणें ह्मणोन, अर्जोजीराव ढमाले हवालदार व कारकून किल्ले मजकूर यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

## हरिहरराव पांडुरंगराव यांच्या कीर्दीपैकीं.

८७७ ( ७६३ )—परगणे मजकूरपैकीं लोक कितुरकर देसाई याजकडे चाकरीस गेले असतील त्यांचीं घरें व चीजबस्त जी असेल, ती चौकशी करून जफ्त करावयाकरितां कारकून पाठविले आहेत; तरी हे देसाई मजकूर यांजकडे परगणे मजकूरचे लोक गेले असतील त्यांची चौकशी करून घरें व चीजबस्त जफ्त करितील, त्यांस जफ्त करूं देणें, अडथळा न करणें ह्मणोन.

इसन्ने समानीन मया व अलफ जमादिलाखर २१

१ अंताजी शंकर कमाविसदार दिंमत परशराम रामचंद्र, परगणे तेरदाळ, यांजकडे कामगिरीस गिरमाजी जिवाजी कारकून दिंमत परशराम रामचंद्र यास पाठविले आहेत, सबब सदरहु अन्वयें.

१ अंताजी विठ्ठल कमाविसदार, परगणे यादवाड, दिंमत परशराम रामचंद्र यांजकडे रामाजी दादाजी कारकून दिंमत परशराम रामचंद्र पाठविले, सबब सदरहु अन्वयें.

१ भास्कर सखदेव कमाविसदार परगणे जमखिंडी दिंमत परशराम रामचंद्र यांस पत्र कीं सदरहुप्रमाणें जप्त करून हुजूर लेहून पाठवणें ह्मणोन.

३

एकूण तीन पत्रें छ. १९ जमादिलावल समानीन, परवानगी रूबरू दिल्हीं असेत.

८७८ ( ९८९ )—बळवंतराव काशी यांचे नांवें सनद कीं, तुम्हीं विनंतिपत्र पाठविलें

( 2 ) One man who was serving as a substitute for his brother received the same punishment.

( 3 ) The rest were ordered to be blown from guns.

FROM HARIHARRAO PÁNDURANG'S DIARY.

( 877 ) The officers of Parganá Terdál and Yádwád &c. were directed to attach the property of persons who had gone over to the Desai of Kitur.

A. D. 1781-82.

( 878 ) Kasbe Siur in Parganá Gándápur belonged to Ahilyábai Holkar. A feud existed between the village officers and the kamávisdár and the parties had been quarrelling for 4 months. Balwantrao Káshi happened to encamp at the village,

A. D. 1788-89.

तिसा समानीन मया व अलफ रमजान २

तें प्रविष्ट जाहलें. कसबे सिउर, परगणे गांडापूर, येथें मुक्कामास आलों तो गांव अहिल्याबाई होळकर यांजकडील त्या गांवचे कमाविसदार व पाटील कुळकर्णी यांचा कजिया लागोन चार महिने झुंजत होता. त्यास लोणारा किल्ला ज्या भिल्लांनीं घेतला ते भिल्ल आंत होते. त्याजला आह्मीं मागों लागलों. त्यांणीं उत्तर केलें कीं तुह्मीं हजारपांचशें रुपये घेऊन जावें. आह्मी भिल्ल देत नाहीं. त्याजवरून होळकराकडील कमाविसदार, व पागे यांच्या विचारें गांवांवर हल्ला केला तेसमई आमचे सोळा माणूस जखमी, व तीन ठार जाहले; व भिल्लांचे शंभर माणूस जखमी व कांहीं ठार जाहले. त्यांच्यानें दम न धरवे तेव्हां रघुनाथ धोंडाजी व गोविंद चिमणाजी मातबर गृहस्थ गावांत राहतात, त्यांच्या हवेल्या थोर आहेत, त्यांत भिल्ल व कुळकर्णी शिरोन गोळी वाजविली, इतक्यांत अस्तमान होऊन रात्र पडली. याजवर हरदूजणांनीं मागील दरवाजा उघडोन भिल्ल काढोन दिल्हे. ते भिल्ल सांपडले असते ह्मणजे इतकी मसलत न लांबती त्यांचीं घरें जप्त केल्यास वीस पंचवीस हजारांची सरकारची किफायत होईल ह्मणोन, व रोजमरे याचे ऐवजाकरितां लिहिलें तें विदित जाहलें. ऐशास गांव चार महिने लढत होता, तो तुह्मीं हल्ला करून घेतला, उत्तम केलें. रघुनाथ धोंडाजी व गोविंद चिमणाजी यांणीं सरकारचे हरामखोर सोडून दिले याजकरितां त्यांचे घराची जप्ती करून जे सांपडेल त्याची याद लिहून हुजूर पाठविणें. आणि त्यांस कैद करणें, व कुळकर्णी यांचे वतनाची जप्ती करणें, येविशीं अहिल्याबाई होळकर यांस पत्र सादर केलें आहे, तरी तुह्मीं सदरहू लिहिल्याप्रमाणें करणें ह्मणोन. सनद १.

रसानगी, त्रिंबक नारायण परचुरे.

कारकून निसबत दप्तर.

---

and learning that the Bhils who had taken the fort of Lonárá were in the village he demanded their surrender. The villagers sent word that they would pay Rs. 500 or 1000 to Balwantrao rather than surrender the Bhils. Balwantrao with the consent of the Kamávisdár attacked the village. Some of the Bhils were killed and wounded, and the rest were taken by the villagers to the houses of Raghunáthrao Dhondoji and Govind Chimnáji two influential men in the village. The Kulkarni also joined them, and they fired on Balwantrao's men. At night-fall, they allowed the Bhils to escape. Balvantrao having reported the facts to Government, Raghunáth and Govind were ordered to be arrested, and their houses were attached. The Kulkarni's watan was also attached. The facts of the case were also communicated to Ahilyábai.

# ७ न्यायखातें.

## ( ब ) फौजदारी.

## ( अ ) गुन्हे.

### २ खून व आत्महत्या.

८७९ ( ९७ )–पदमसिंग पिसाळ देशमुख, प्रांत वाई, याचे नांवें अभयपत्र कीं कुसाजी भोसला कुणबी रयत मौजे ओझरडें, संमत हवेली, प्रांत मजकूर, यास पाटाचे पाण्याचे कजियामुळें तुह्मी मार दिल्हा, त्या मारानें कुणबी मजकूर त्याच दिवशीं मृत्यु पावला; खून तुह्मांकडे लागला; सबब तुह्मांस सरकारांत आणून अटकेस ठेविलें होतें. त्यास खुनाबाबत सरकारची गुन्हेगारी रुपये १७५० साडेसत्राशें करार करून विठ्ठलराव मोरेश्वर गोळे यांची निशा सरकारांत घेतली असे. या उपरी खुनाचा लांजा सरकारचा तुह्मांकडे नाहीं, सुखरूप राहणें अभय असें ह्मणोन.

खमस सबैन मया व अलफ साबान १९

पत्र १

रसानगी यादी.

### मुतालीक याचे रोजनिशीपैकीं.

८८० ( २ )–संभू पाटील, कसबे धामणगांव, परगणे मलकापूर यास पत्र कीं, तुझा व कसबे मजकूर येथील गांवकरी यांचा वतनसंमंधें कजिया होता, यामुळें तूं परागंदा होऊन गांवकरी यांसीं दावा करावयाकरितां रात्रीस जमाव करून गांवावर आलास, तेव्हां मइनाई पाटलीण, मौजे पळसखेडें, तर्फ पिंपरी, परगणे जामनेर, इचा लेक वाटेस कसबे मजकूरचे सिवारांत सांपडला तो तूं ठार मारिलास; सबब मइनाई पाटिलीण हुजूर फीर्याद आली, त्याजवरून तु-

खमस सबैन मया व अलफ साबान २६

---

### ( 2 ) Murder & suicide.

**( 879 )** Padamsing Pisá!, Deshmukh of Pránt Wái, beat Kusáji Bhósle, a ryot of Ózarde, to death in a dispute relating to canal water. He was arrested & kept in confinement but was afterwards released on his giving security for the payment of a fine of Rs. 1,750.

A. D. 1774-75

### FROM THE MUTÁLIK'S DIARY.

**( 880 )** Sambhu Pátil of Dhámangaon in Pargaṇa Malakápur, having a quarrel with the village officer regarding the watan, left the village. He collected some men and came to the village one night to attack his enemies. He found a son of Mainái

A. D. 1774-75.

जला मसाला करून हुजूर आणून मनास आणितां खुनाचा आरोप तुजवर आला, सबब तूं आपला घरवंद व शेत याचा निमे वांटा मइनाईस देऊन दत्तु पाटील मइनाईचा दीर याचे नावें भवरगांवचे पाटील वगैरे यांचे साक्षीनें कागद लिहून दिल्हा; सबब खुनाचा अन्याय माफ करून सरकारांत गुन्हेगारी रुपये १५० दीडशें रुपये घेऊन हें अभयपत्र दिल्हें असे, तरी कसबे मजकुरीं सुखरूप राहणें ह्मणोन. पत्र १.

रसानगी याद.

८८१ ( २०९ )–बाजीराव आपाजी, तालुके धोडप, यांचे नांवें सनद कीं, हटकरी धणगर याचा चाकर मुदबख्या गुदस्तां गुजराथेंतुन दौलत बाबूराव याचे पथकांतून कंठाळ मुद्धां घेऊन पळोन आपल्या घरास जात होता, तो रात्रीं मौजे महारपाटणें परगणे वांबोरी, येथें येऊन वस्तीस राहिला, दुसरे दिवशीं तेथून निघोन आपल्या घरास जात होता, तो भुता पाटील व बावाजी पाटील व नेऱ्या भिल व महार मौजे मजकूर यांणीं मुदबख्यास वाटेंत गाठून जिवें मारिलें, सबब भुता पाटील व बाबाजी पाटील पळाला. त्याचा भाऊ भिवजी पाटील व नेऱ्या भिल व महार यांस किले धोडप येथें अटकेस ठेविलें आहे, त्याचे पारपत्याचीं वगैरे. कलमें.

सीत सबैन मया व अलफ रविलाखर १५

Pátlin of Palaskhede in the field and killed him. Mainái complained to the Huzur, and the charge of murder was proved. Sambhu therefore granted to Mainái half a share in his houses and fields and executed a document to that effect in favour of Datto Pátil, Mainábái's brother-in-law. A pardon was consequently given to him for his offence, Rs. 150 being levied from him as fine.

( 881 ) Mudbakhya, a servant of a Hatkari Dhangar, ran away with his master's property from the camp of Daulatráo Báburao on his way home halted one night at Mahár-pátne in Parganá Wákhári. The next morning while proceeding to his destination, he was way-laid and murdered by Bhutá Pátil, Báwáji Pátil, Neryá Bhil and a Mahár. These persons were therefore imprisoned in fort Dhodap. Orders were now issued for the disposal of the prisoners as follows:—

A. D. 1775-76.

( 1 ) The murderers Bhutá and Néryá should be taken to the village where the murder took place and beheaded;

( 2 ) One of the murderers, Báváji Pátil, having absconded, his brother

भुता पाटील, भिवजी पाटील याचा भाऊ बावाजी पाटील, व नेऱ्या भिल यांणीं खून केला, त्याणें भिवजीचा भाऊ बावाजी पळाला सबब खुनी असामींचे पारिपत्य.

१ भुता पाटील.
१ नेऱ्या भिल.

दोन असामी यांणीं ज्या गांवीं खून केला त्या गांवीं हरदू जणांस नेऊन ऌाटून टाकणें. कलम १.

| किता. | असामी. |
|---|---|
| १ | भिवजी पाटील बावाजी यानें खून करोन पळोन गेला, सबब त्याचा भाऊ. |
| १ | महारानें मुदबख्याची पितळी घेतली सबब. |

दोन असामी जामीन घेऊन सोडून देणें. कलम १.

मौजे मजकूरची पाटिलकी जफ्त करावयाविशीं सरसुभाहून सनद तुम्हांस सादर जाहली आहे, त्याप्रमाणें पाटिलकी जफ्त करणें. कलम १.

तीन कलमें लिहिलीं आहेत, तरी सदरहू लिहिल्याप्रमाणें करणें ह्मणोन. सनद १.

रसानगी यादी.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

८८२ (२९५)—बाळसेट बिन गोंदसेट सोनार देवरुखकर याचे नांवें चिटणिसी
सीत सबैन मया व अलफ रबिलाखर १५
पत्र कीं, गोंदसेट सोनार मुराडकर याच्या लेकास रामा दसपुत्र्या व राघोबा विश्या या दोघांनीं जिवें मारिला, त्याचे सोबतीस गोपाळा गुहागरकर सोनार व तुझा लेक सदाशिव होता असें ह्मणून गोंदसेट मजकूर पेशजीं हुजुर फिर्याद जाहला होता, त्याजवरून येविशींचा शोध करतां सदाशिवाकडे सदरहूविशींचा लांझ्या नाहीं, असें जाहलें; परंतु चौकशीबद्दल कांहीं दिवस अटकेस होता, आरोप आला, सबब पंचगव्य देववून हें आज्ञापत्र सादर केलें असे, तरी सदरहू खुनाचा लांझ्या तुझा लेक सदाशिव याजकडे नाहीं. पूर्ववत्प्रमाणें आपले सोनाराचे जातींत

was arrested. He and the Mahár who had taken a pot belonging to Mudbakhyá were ordered to be released on furnishing security.

( 3 ) The Pátilki watan of the village was confiscated.

## FROM JANÂRDAN ÂPÂJIS DIARY.

( 882 ) Two persons murdered a son of Gondshet Sonár. Bálshet Sonár's son, Sadáshiv, was their accomplice, but at the inquiry he proved his innocence. Orders were therefore
A. D. 1775-76.

वर्तत जाणें. तुझे लेकाकडे हरकी रुपये १५० दीडशें करार करून हुजूरांत पागा दिंमत बाजी मोरेश्वर यासीं छ. २९. सवालीं देविले ते सरकारांत सदरहूप्रमाणें जमा जाले असत ह्मणोन. छ. २३ मोहरम. पत्र १.

८८३ ( ४७५ )–यादो पांडुरंग आवटी कसबे बारागांव नांदुर, परगणे मजकूर, व

समान सबैन मया व अलफ रजब ३०

कुळकर्णी मौजे चिंचोलें, परगणे मजकूर याच्या दोन स्त्रिया होत्या, त्यांस कण्हेरीच्या मुळ्या चारल्या, एक स्त्री मृत्यु पावली, एक आजारी आहे. यादो पांडुरंग कसबे मजकूरहून पळोन गेला, ह्मणोन तुह्मांकडील कारकुनांनीं हुजूर विदित केलें, त्याजवरून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी कसबे मजकूरचे आवटीपण, व मौजे मजकूरचें कुळकर्ण, येणेंप्रमाणें जफ्त करून उत्पन्न होईल तें परगणे मजकूरचे हिशेबीं जमा करणें; व यादो पांडुरंग याचा शोध करून त्यास धरून हुजूर पाठऊन देणें ह्मणोन, निळकंठराव रामचंद्र पागा, यांचे नांवें. छ. •२ जमादिलावल. सनद १.

रसानगी यादी.

## मुतालिक ह्याचे रोजनिशीपैकीं.

८८४ ( ७ )–सटवाजी लाड खिजमतगार याणें आपला चाकर पोर्गा ठार मारिला,

समान सबैन मया व अलफ साबान १४

सबब मशारनिल्हेस किल्ले गदग येथें अटकेंत ठेवावयास पाठविला असे, तरी यास बेडी घालून किल्लेमजकुरीं पक्क्या बंदोबस्तानें ठेऊन शिरस्तेप्रमाणें पोटास शेर सनद–पैवस्तगिरीपासून किल्ले मजकूर पैकीं देत जाणें ह्मणोन, रामचंद्र नारायण यांचे नांवें. सनद १.

परवानगी रूबरू. राजश्री बाळाजी महादेव
कारकून शिलेदार.

issued that cow's urine should be given to purify him as he had been for some time in jail, and Rs. 150 were levied from him as a present.

( 883 ) Yádo Pándurang, kulkarni of Chincholi in Parganá Nándur, gave roots of the *kanher* plant to his two wives to eat. One of them died, and the other sufferd from the effects of the poison. Yádav absconded. His watan was attached, and orders were issued for his apprehension.

A. D. 1777-78.

FROM THE MUTÁLIK'S DIARY.

( 884 ) Satwáji Lád khismatgár having murdered his servant-boy was sent to prison in fort Gadag.

A. D. 1777-78.

८८५ ( ६१५ )—नरहर लक्ष्मणराव कमाविसदार, परगणे शेवगांव, यांचे नांवें सनद कीं, रामाजी येल्हो ब्राह्मण यास कसबे तीसगांव, परगणे मजकूर एथें जिवें मारिलें. ते मारेकरी ब्राह्मण वगैरे तेरा असामी कैद करून हुजूर आणिले होते, त्याचा करार येणेंप्रमाणें. कलमें.

तिसा सबैन मया व अलफ जमादिलावल

मारेकरी असामी १३ पैकीं शूद्र चार व मुसलमान एक, एकूण असामी ५ पांच किल्यावर अटकेस ठेविले. बाकी. असामी.

१ जनार्दन बापूजी.
१ हरी रामगिरधर.
१ भवानी यशवंत.
२ मल्हार त्रिंबक, व मुक्ताजी त्रिंबक.
१ विठ्ठल गोपाळ.
१ मल्हारी ब्राह्मण.
१ गोविंदा ब्राह्मणभाई निसबत हरी रामगिरिधर.

८

एकूण आठ असामी किल्यावर अटकेस ठेवावयाचे केले होते, ते मना करून त्यांजकडे ऐवज करार १०००१ रुपये.

यासि तपशील.

१५०० रामाजी येल्हो यांचे पुत्रास खुनाबद्दल द्यावे.
८५०१ सरकारचे खंडाबद्दल सरकारांत घ्यावे.

१०००१

आठ असामी बेड्यासुद्धां सरकारचे प्यादे हुजूर हशमाकडील बरोबर देऊन तुम्हांकडे पाठविले आहेत तेथें पोंहचलियावर जामीन चांगले पक्के घेऊन जामीनकतबे हुजूर पाठवणें; आणि सदरहू असामींच्या बेड्या तोडून जातीबाहेर ठेवणें. पुढें यांणीं राहावें, पुढें वर्तणूक कशी करावी याची आज्ञा हुजुरून होईल त्याप्रमाणें करवणें. कुटुंबसुद्धां जातीबाहेर ठेवणें. कलम १.

रामाजी येल्हो यांचें कर्ज या असामी पैकीं ज्याजकडे येणें असेल तें त्याजपासून व्याजसुद्धां सरकारचे ऐवजाबरोबर एका महिन्यांत वसूल करून रामाजीचे पुत्रास पावतें करून, पावती घेऊन हुजूर पाठवणें. कलम १.

सदरहू असामी तुम्हीं आपलेजवळ पुढें चाकरीस कधींही ठेऊं नये. ऐसें केलें असे, तरी न ठेवणें. कलम १.

परगणे मजकूर येथील फडणिसी नारो रघुनाथ याजकडे आहे, त्याचे तर्फेनें रा-

(885) Thirteen men murdered, Rámáji Yelló who held the appointment of Fadnis at Tisgaum in Pargana Shevgaum. Five of them, one a musalman and four Shudrás were sent to prison. The rest who were Brahmins were first ordered to be imprisoned but that order was revoked and they were fined Rs.10,001, out of which Rs. 1500 were ordered to be given to the son of the deceased. It

A. D. 1778-79.

एकूण दहा हजार एक रुपया सात असामी ब्राह्मण व एक ब्राह्मणभाई मिळोन आठ असामींकडे सदरहूप्रमाणें करार केला असे, तरी याची निशा एक महिन्याचे मुदतीची घेऊन ऐवज वसूल करणें; आणि यापैकीं दीड हजार रुपये रामाजीचे पुत्रास देऊन बाकी सरकारचे खंडाचे पंच्यायेसींशें एक रुपयाची हुंडी करून एक महिन्याचे आंत ऐवज हुजूर पुण्यास पावता करणें. कलम १.

माजी येल्हो कामकाज करित होते. हल्लीं त्यांचे पुत्र गोविंद राम यांस मशारनिल्हेनीं आपले तर्फेनें फडणिसीनें कामकाज सांगितलें आहे, तरी त्यांचे हातें घेत जाणें. कलम १.

येणेंप्रमाणें पांच कलमें करार केलीं असत, तरी सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन छ. २४ रविलावल. सनद १.

रसानगी यादी.

८८६ ( ६४५ )—गंगी परदेशिण इणें आपला दादला सोमल घालून जिवें मारिला, सबब अटकेंत ठेवावयास किल्ले सिंहगड येथें पाठविली आहे, तरी किल्ले मजकुरीं अटकेंत ठेऊन पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देऊन काम करवीत जाणें ह्मणोन, नारो महादेव यांचे नांवें. सनद १.

समानीन मया व अलफ जिल्काद ५

रसानगी यादी.

८८७ ( ७०७ )—त्रिंबक मनाजी दिंमत तुकोजी होळकर यांणीं हुजूर विदित केलें कीं, आपलें घर कसबे आकोलें एथें आहे, त्यास गांवांत दादो जयराम यांची स्त्री शामाबाई इची अप्रतिष्ठा शिमग्यांत गांवकरी यांणीं केली, सबब तिणें जीव दिल्हा, त्याचे चौकशीस सरकारांतून विसाजी हरी

इसन्ने समानीन मया व अलफ साबान ११

---

was directed that security should be taken from these Brahmins and that they should be excommunicated. Further orders were to be issued regarding their future residence. The officer of Shewagaum was told never to employ them under him. The son of the deceased was given the appointment of his father.

( 886 ) Gangi, a Pardéshi woman murdered her husband by administering arsenic to him. She was therefore sent to prison.

A. D. 1779-80.

( 887 ) The villagers of Akóla outraged the modesty of Shàmá, wife of Dàdo Jayràm, during the Shimgà holidays. She therefore committed suicide. Visáji Hari was sent

A. D. 1781-82.

कारकून पाठविले, त्यांणीं चौकशी करून अन्यायी यांजपासून गुन्हेगारी घेतली. हल्लीं विसाजी हरी सर्व गांवास पंचगव्य देऊन असामी पाहून पट्टी घेतात. येविशीं आज्ञा जाहली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून हें आज्ञापत्र सादर केलें असे, तरी त्रिंबक मनाजी यास सर्वां-बरोबर पंचगव्य देणें, पट्टी मना केली असे, तरी यास पट्टीचा तगादा न करणें ह्मणोन, विसाजी हरी यांस चिटणिसी. पत्र १.

सलास समानीन
मया व अलफ
जमादिलाखर ३०

८८८ ( ७६६ )—कृष्णाजी उतेकर याणें कृष्णाजी महाडीक शिंपी, वस्ती कसबे पाली, याच्या कुणबिणी दोन, मौजे रतबगांव, तर्फ पाल हवेली, येथील नदीवर जिवें मारून आपण महाडास घरीं गेला, त्याचा पत्ता तुह्मीं लाऊन धरून आणून, किल्ले सरसगड येथें अटकेंत ठेविला आहे, त्यास हल्लीं तोफेचे तोंडीं द्यावयाची आज्ञा केली असे, तरी तोफेच्या तोंडीं देऊन उडवून टाकणें ह्मणोन, बाजी गोविंद यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

अर्बा समानीन
मया व अलफ
जमादिलावल २०

८८९ ( ८४० )—सदाशिव गणेश केळकर वस्ती वाडा फणसें, मौजे वाडें तर्फ खारे-पाटण, तालुके विजेदुर्ग, याणें गोविंदभट पैठण, वस्ती वाडा मजकूर यांचीं कन्या गुणाजी गणेश केळकर, वस्ती मौजे वानिवडें, तर्फ मजकूर यास दिल्हीं होतीं, तीं जिवें मारली ह्मणून हुजूर विदित जाहलें; त्याजवरून येविशींची चौकशी करितां गुणाजी गणेश याची बायको मारल्याचा मुद्दा सदाशिव गणेश याजकडे लागू होतो; सबब यास कैद करून बराबर गाडदी निसबत राघो विश्वनाथ गोडबोले असामी ४ चार देऊन बिडीमुद्धां किल्ले वंदन एथें अटकेस ठेवावया-करितां पाठविला असे, तरी किल्ले मजकुरीं पक्के बंदोबस्तानें अटकेस ठेऊन पोटास शेर शि-रस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन, नारो शिवदेव यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

from the Huzur to inquire into the matter. He fined the offenders and ordered that all the villagers should drink cow's urine to purify themselves and pay a cess imposed by him. Trimbak Mánáji complained to the Huzur. The cess was remitted but he was ordered to drink cow's urine to purify himself.

( 888 ) Krishnáji Utekar killed two female servants of a tailor of Páli. He was ordered to be blown from a gun.
A. D. 1782-83.

( 889 ) Sadáshiva Gaṇesh Kelker of Wádá Faṇase in Mouze Wáde of Turf Kháre Pátaṇ in Táluká Vijedurg having murdered his brother's wife was sent to prison.
A. D. 1783-84.

८९० ( ९०८ )–बळवंतराव नरसी याचें घर कसबे खटाव, प्रांत मजकूर येथें आहे,
सीत समानीन मया व अलफ मोहरम १९ त्यास त्याचे भाऊबंद वगैरे शें दीडशें लोक जमा होऊन मशारनिल्हेचा वाडा वेढून त्यास बाहेर काढिलें; व त्याचीं माणसें तोडिलीं, त्या जमावांत किल्ले वर्धनगड येथील लोक होते, म्हणून कळोन आलें; त्याजवरून हें पत्र लिहिलें असे, तरी मशारनिल्हेचे वाडियावर लोक चालोन गेले. त्याची चौकशी मनास आणावी लागती. यास्तव त्या जमावांत किल्ले मंजकूरचे लोक असतील त्यांस पाठवून द्यावें म्हणून, परशराम श्रीनिवास पंडित प्रतिनिधी यांचे नांवें चिटणिसी.

पत्र १.

८९१ ( ९६१ )–रखमी साळोखी इचा दादला लक्ष्मण साळोखा, वस्ती कसबे पुणें,
समान समानीन मया व अलफ मोहरम १८ हा गुणी कुणबीण दिंमत बच्याजी रामाजी कारकून निसबत चिटणीस इचा खून हडपसरचे रानांत करून खुन्यें पळोन गेले; त्यांत साळोखा मजकूर होता तोही पळोन गेला, त्याचें ठिकाण न लागे, याजकरितां रखमी मजकूर इजला सरकारांत धरून आणून हजीर जामीन घेणे, म्हणोन तगादा केला असतां जामीन न मिळे, सबब किल्ले सिंहीगड येथें रखमीमजकूर इजला अटकेंत ठेवावयाकरितां गाडदी असामी सहा निसबत राघो विश्वनाथ याजबराबर पाठविली आहे, तरी किल्लेमजकुरीं बंदोबस्तानें अटकेंत ठेऊन पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणे म्हणोन, केशवराव जगन्नाथ यांचे नांवें.

सनद १.

परवानगी रूबरू.

८९२ ( १०५८ )–सदाशिव गणेश केळकर, वाडा फणसें मौजे वाडें, तर्फ खारा-
सलास तिसैन मया व अलफ सफर १९ पाटण, तालुके विजयदुर्ग यांणीं हुजूर विनंती केली कीं गुणाजी गणेश तिवरेकर मौजे वानिवडे, तालुके मजकूर यांची स्त्री मारल्याचा आरोप मजकडे आला, सबब किल्ले वंदन येथें सरकारांतून मजला अटकेस

---

( 890 ) The Bháubands of Baḷwantrao Narsi of Khaṭáv numbering about a hundred and fifty, surrounded the house of Baḷwantrao, took him out and killed his men.
A. D. 1785-86.
Some men from the Wardhangaḍ fort were alleged to be implicated in the matter. The Pratinidhi was asked to send them to Poona for inquiry.

( 891 ) Laxmaṇ Sáḷokhá of Poona being concerned in the murder of a female servant absconded, and could not be found. His wife Rakhmi was therefore ordered to furnish security for her appearance when required but she was unable to do so. She was therefore sent to prison in Sinhgaḍ.
A. D. 1787-88.

( 892 ) Guṇáji Gaṇesh Tiwrekar of Wániwade in Táluká Khárá-

दहा वर्षे ठेविलें होतें, त्यास हल्लीं मोकळें केलें; परंतु प्रायश्चित्त देऊन शुद्ध केलें नाहीं. याजकरितां स्वामींनीं कृपाळू होऊन जीवनमाफक राजदंड घेऊन, प्रायश्चित्त द्यावयाची आज्ञा करून, मजला दोषापासून मुक्त केलें पाहिजे ह्मणोन; ऐशीयास गुणाजी गणेश तिवरेकर याची स्त्री मारल्याचा आरोप केळकर मजकूर याजकडे आला होता, सबब याजपासून राजदंड व ब्रह्मदंड घेऊन सर्व शिष्ट सभेंत विध्युक्त प्रायश्चित्त देववून शुद्ध करून, हे पत्र सादर केलें असे, तरी तुह्मीं तालुके मजकूरचे ब्राह्मणांस ताकीद करून सदाशिव गणेश यांशीं अन्न व्यवहार करीत ते करणें, ह्मणोन चिटणिसी. पत्रें.

१ गंगाधर गोविंद तालुके विजयदुर्ग यांस.

१ समस्त ब्राह्मण तालुके मजकूर यांस.

# ७ न्यायखातें.

## ( ब ) फौजदारी.

### ( अ ) गुन्हे.

#### ३ डाके.

८९३ ( २३० )—आनंदराव त्रिंबक सुभेदार परगणे सुपें यांस सनद कीं, काळ्या वलद गंगाजी गोळा, वस्ती कसबे सुपें, हा बेरडांकडे चाकरीस राहून दरवड्यांत जात होता ह्मणोन तुह्मीं लिहिलें, ऐशास काळ्या मजकूर हा बेरडांमध्यें चाकर होता, सबब याचा शिरच्छेद करावयाची तुह्मांस आज्ञा केली असे, तरी काळ्या गोळ्याचा शिरच्छेद करणें ह्मणोन. सनद १.

सीत सबैन मया व अलफ रजब २४

रसानगी, मल्हारजी कामथा खिजमतगार दिंमत सखाराम भगवंत.

८९४ ( २३१ )—महादाजी नीलकंठ याचे गोटांतील बेलदार व पेंढारी यांणीं साल-

---

A. D. 1792-93. pátan had his wife murdered by Sadáshiv Ganesh Kelkar of Wáde in Táluká Vijayadurga who was imprisoned for the same for ten years. The latter was then released without being purified. He prayed Government to purify him, offering to pay a reasonable sum as fine. His prayer was granted, two fines ( one to be paid to Government and the other to Bráhmans ) being levied.

( 3 ) Dacoity.

( 893 ) Kályá walad Gangáji Gola of Supe was found to have served under Berads, joined Berads and to have accompanied them on their expedition for committing dacoity. He was therefore ordered to be beheaded.

A. D. 1775-76.

( 894 ) The Beldárs and Pendháris in the camp of Mahádáji Nilkant

सीत सबैन मया व अलफ रजब ७

गुदस्तां नवाबाचे लष्करांत लूट केली, सबब शहर बऱ्हाणपूर येथें मुलेंमाणसें सुद्धां अटकेस ठेविले आहेत. त्यांपैकीं दहा असामी जमातदार वगैरे मुख्य असतील ते ठेऊन बाकी सोडून देणें ह्मणोन, नारो कृष्ण यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

८९५ (२३५)—महिपत्या मांग, मौजे उंदीरगांव, परगणे संगमनेर, येथें राहून मुलकांत दरवडे घालीत होता. त्याणें विठ्ठल शिवाजी यांचें कापड जालनापुराहून जात होतें, तें लुटून नेलें. त्याचा मुद्दा मांग मजकुराकडे लागला, सबब त्यास धरून आणावयास लोक पाठविले, तो महिपत्या पळोन गेला. त्याचीं माणसें व जमावाचे लोक सांपडले ते आणून नेवाशाचे गढींत अटकेस तुह्मीं ठेविले आहेत त्यांचीं. कलमें.

सीत सबैन मया व अलफ साबान १०

१ डोचकीं मारणें. असामी.

- १ संत्या महिपत्याचा भाऊ.
- ८ चाकर दरवड्याचे.
  - २ मौजे उंदीरगांव येथील.
    - १ महिम्या.
    - १ नवशा.
    - ---
    - २
  - १ अर्जुन्या, मौजे आलेगांव, परगणे टेंबुरणी.
  - १ सोन्या, मौजे रोठेगांव तर्फ कडवलीत.
  - २ मौजे आंघूर, परगणे वैजापूर.
    - १ गोप्या.
    - १ येशा.

A. D. 1775-76.

having plundered the camp of the Nawab in the preceeding year had been sent to prison. They were now ordered to be released with the exception of 10 principal persons, Jamátdárs &c.

(895) Mahipatyá Máng used to reside at Undirgaum in Parganá Sangamner and to commit dacoities in the country. On one occasion he committed robbery of some cloth be-

A. D. 1775-76.

१ विठ्या, मौजे बिलवणी, परगणे वैजापूर.
१ उद्या, कसबे वैजापूर.

---

८

१ खंड्या, मिलाफी वाटेकरी, मौजे बहिरवाडी, परगणे नेवासें.

---

१०

कलम.

१ सोडून देणें, महिपत्याचीं माणसें.

असामी.

१ हरकी, त्याची वायको.
१ येशा पोर, उमर वर्षे १॥

कलम.

एकूण कलमें दोन लिहिलीं असेत. सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें म्हणोन, रामचंद्र नारायण, परगणे नेवासें वगैरे महाल, यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

८९६ ( २५३ )—बाजीराव आपाजी, तालुके घोडप यांचे नांवें. सनद.

सीत सबैन मया व अलफ सवाल ११ — १ तुम्हीं हुजूर विनंति केली कीं, गावज्या भिल वस्ती मौजे कसाबखेड, परगणा माणिकपुंज, याणें डोंगरहटीचे भिलासीं मिळोन परगणे मजकुरीं गांवगन्ना दंगा करून लुटलें, सबब

---

longing to Vithal Siváji, which was being brought from Jálnápur. The robbery was traced to him and he was arrested. He however absconded. His men and confederates were then seized and the following orders were passed:—

( 1 ) Mahipatyá's brother and Mahipatyá's eight servants who assisted him in his dacoities, and one person who was Mahipatyá's confederate and a sharer in his spoil were ordered to be beheaded.

( 2 ) Mahipatyá's wife and child were ordered to be set at liberty.

( 896 ) Gáwajyá Bhil of Kasábkhed in Parganá Mánikpunja, hav-

मिल मजकुरास धरून किल्ले धोडप येथें अटकेस ठेविला आहे ह्मणोन, त्याजवरून हे सनद सादर केली असे, तरी गांव लुटले त्यांत हा होता ऐसा पत्ता पुर्ता मनास आणून मिल मजकूर त्यांत होता ऐसें असल्यास मारून टाकणें ह्मणोन सनद.

८९७ ( ५०७ )—येशवंतराव बिन संताजी संकपाळ पाटील, व बहिरो गणेश वगैरे कुळकर्णी मौजे चांदक, प्रांत वाई, याणें लक्ष्मण कान्हेर याच्या वाडियावर चाळीस पन्नास माणूस घेऊन येऊन, दंगा करून, बेकैदी केली; सबब पाटील मजकूर याचा हक्क व मळे व मिराशीचीं शेतें वगैरे असतील व कुळकर्णी याचें कुळकर्ण व ज्योतिषपण सरकारांत जफ्त करून जफ्तीची कमावीस तुह्मांस सांगितली असे, तरी पाटीलकीचा हक्क व शेतें व मळे, वगैरे व कुळकर्णी याचें कुळकर्ण व ज्योतिषपणाची जफ्ती करून, जफ्तीचा आकार इमानें इतबारें करून, आकारा पैकीं तुह्मांस सालीना रुपये ७५ पाउणसे करार केले असेत, ते घेऊन बाकी ऐवज राहील तो सरकारांत पावता करून पावलीयाचा जाब घेत जाणें ह्मणोन, गोपाळ आपाजी कारकून, मार्फत मोरो हरी, यांचे नांवें. सनद १.

समान सबैन मया व अलफ सवाल १७

सदरीलप्रमाणें लक्ष्मण कान्हेर याचे नांवें सनद कीं, मशारनिल्हे अंमल करितील, तुह्मीं अडथळा न करणें ह्मणोन. सनद १.

२

परवानगी राजश्री सखाराम भगवंत.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

८९८ ( ५१२ )—बापूजी रघुनाथ कुळकर्णी, मौजे ब्राह्मणी, तर्फ राहूरी, परगणे

---

A. D. 1775-76. ing attacked and plundered some villages in the Parganá, was arrested by the Kamávisdár and kept in the fort of Dhódap. It was ordered that if Gáwajyá's complicity in the crime was proved beyond doubt he should be beheaded.

( 897 ) Yeshwantrao bin Santáji Sankpál Pátil and Bahiró Gaṇesh Kulkarṇi and others of Chádak in Piánt Wái led an attack on the house of Laxmaṇ Kánher with the assistance of 40 or 50 persons. Their watans were therefore ordered to be attached.

A. D. 1777-78.

## FROM JANÁRDAN APÁJI'S DIARY.

( 898 ) Bápuji Raghunáth Kulkarṇi of Bráhmaṇi, Tarf Ráhuri in

समान सबैन मया व अलफ सवाल ३० संगमनेर, हा मांगास मिळोन दरवडे घालीत होता. त्याचे मुद्दे कुळकर्णी मजकूर याचे घरीं निघाले, सबब त्याचें कुळकर्ण हिशाचें सरकारांत जप्त करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी मौजे मजकूर येथील मशारनिल्हेचे हिशाचें कुळकर्ण जप्त करून सदरहूचे उत्पन्नाचा आकार होईल तो प्रांत गंगथडी येथील हिशेबीं जमा करणें ह्मणोन, नरसिंगराव बल्लाळ यांचे नांवें छ. २० साबान. सनद १.

सदरील अन्वयें मोकदम मौजे मजकूर यांस. सनद १.

२.

रसानगी यादी.

८९९ (७१४)—कसबे बावधन, प्रांत वाई, येथें रामाजी गोविंद वाळंबेकर यांचे घरीं दरवडा पडला, सबब कसबे मजकूरचे रखवालीचे वगैरे बेरड असामी ७ सात असामी धरून किल्ले परळी येथें अटकेंत ठेवावयास पाठविले आहेत. यांचे पायांत बेड्या घालून किल्ले मजकुरीं पक्के बंदोबस्तानें अटकेंत ठेवणें; आणि पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन, बाळाजी नारायण यांचे नांवें. सनद १.

इसन्ने समानीन मया व अलफ रमजान १२

रसानगी यादी.

## ७ न्यायखातें.

## (ब) फौजदारी.

## (अ) गुन्हे.

### ४ चोऱ्या व दरवडे.

### जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

९०० (२४७)—येश्या व जावज्या बेरड, तुह्मीं चोरीवर धरिले होते. त्यास वाजपूस

---

A. D. 1777-78. Parganá Sangamner used to commit dacoities with the assistance of Mángs, and stolen property was found in his house. His watan was therefore attached.

(899) A dacoity having taken place at Báwdhan in Pránt Wái, seven Rakhwáldárs of the village, of the Berad caste, were arrested and sent to prison.

A. D. 1781-82.

(4) Theft and robberies.

FROM JANÁRDAN APÁJIS DIARY.

(900) Two Berads arrested for theft died of the beating they

सीत सबैन मया व अलफ रमजान ३० करितां न सांगत, ह्मणोन मार दिला याजमुळें मयत झाले, त्यास बेरडाची वस्तवानी त्याचे रुपये तुह्मांकडे येणें आहेत, ते याद तुह्मांपाशीं आहे, त्याप्रमाणें वसूल करून हुजूर पाठविणें ह्मणोन, भिकाजी आपाजी कारकून दिंमत पागा हुजूर यांचे नांवें. छ. ३ साबान. सनद १.

रसानगी यादी.

९०१ ( २८५ )-विश्वनाथभट पाटणकर वस्ती मौजे खेड, कसबे नेवरें, तालुके रत्नागिरी हा चोऱ्या करीत होता, ह्मणोन अटकेंत ठेविला. त्यास जामीन घेऊन सोडून द्यावा, तरी जामीन मिळेना, सबब तालुके मजकुराहून तुह्मीं हुजुर पाठविला, तो येऊन पोहोंचला, त्यास हल्लीं येथें वेदमूर्ती जनार्दनभट भिडे वस्ती मौजे महाबळ, तर्फ संगमेश्वर, तालुके मजकूर यांस विश्वनाथ भटांनीं फिरोन चोरी करूं नये, व कांहीं बदफैली करूं नये, काशीस जावें, याप्रमाणें जामीन घेऊन सोडून दिला असे ह्मणोन, महिपतराव कृष्ण तालुके मजकूर यांस, जाब १. सदरहूचा जामीन कतबा दप्तरीं असे छ. ४ सफर.

सीत सबैन मया व अलफ रबिलाखर १५

परवानगी रूबरू.

९०२ ( ३४६ )-विसो दातार हा पुण्यांत लोकांचे घरीं चोऱ्या करीत होता त्यास धरून कैद करून तुह्मांकडे अटकेंत ठेवावयासी पाठविला आहे, यास किल्ले सोलापूर येथें पक्के बंदोबस्तानें ठेऊन पोटास शेर मध्यम प्रतीचा देत जाणें ह्मणोन, रामचंद्र शिवाजी, तालुके मजकूर यांचे नांवें परवानगी राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस. रसानगी, पांडुरंग कृष्ण कारकून दिंमत अनंदराव काशी कोतवाल शहर पुणें छ. २८ रजब. सनद १.

सबा सबैन मया व अलफ रमजान २९

A. D. 1775-76. received at the hands of a kárkun in the Huzur Págá for not confessing their guilt. The kàrkun was ordered to send their property to Government.

(901) Vishvanáth Bhat Pátankar of Khed in Táluká Ratnágiri being given to committing thefts was arrested and being unable to furnish security was sent by the District officer to the Huzur. Janárdan Bhat Bhide stood surety for him, promising that he would not again commit theft or any other offence and that he would repair to Benáres.

A. D. 1775-76.

(902) Viso Dátár being given to committing thefts in Poona was sent to prison in fort Sholápur. The order was given by Bàḷáji Janárdan and communicated to the writer of the order by a clerk of the Kotwál of Poona.

A. D. 1776-77.

९०३ ( ४२५ )—गोपाळजी आंगरे यांजकडील चोरट्यांनीं लांजे महालांत उपद्रव केला आहे, यास्तव लोकांस बक्षीस द्यावयास करून स्वारी पाठविली आहे, ह्मणोन लिहिलें, त्यास चोरांचा पत्ता पाडून पारिपत्य करणें. जो चोर धरून आणील त्यास कार्याकारण पाहून बक्षीस देणें ह्मणोन.

सबा सबैन मया व अलफ सफर २

कलम १.

९०४ ( ६३६ ) कमावीस जप्ती बरहुकुम मुकुंदा भाट याणें श्रावण मासचे दक्षणेसमई रमण्यांत ब्राह्मणांचे वस्तभाव चोरली, सबब कैद करून त्याजवळ सनगें सांपडलीं ते गुदस्तां त्रिंबक मोरेश्वर कारकून दिंमत हशम, सनगें एकूण. आंख.

समानीन मया व अलफ साबान २३

| | | |
|---|---|---|
| ५ | दुपट्टे धुवट फाटके | २ |
| ·।· | टोपी डोईची छिटी | १ |
| ५। | | ३ |

९०५ ( ६८५ )—गळी गुजर वगैरे वस्ती कसबे बारामती याचे घरचे चाकरांनीं भाईचंद गुजर वस्ती कसबे मजकूर याचे घरीं चोरी केली ते. असामी.

इहिदे समानीन मया व अलफ रमजान ६

१ खेत्रू पवार.

१ राणु गावडा.

१ जोगु मचाला.

१

एकूण तीन असामी वस्तवानीसुद्धां सांपडले, ते तुह्मीं धरून गुजराची वस्तवानी माघारी देऊन कैद करून ठेविले आहेत; त्यांचीं शासनें करावयाची आज्ञा जाली पाहिजे, ह्मणोन

---

(903) Mahál Lánje being infested by robbers, order was issued to trace and punish them, and permission was given to grant suitable rewards to those who might assist in arresting the offenders.

A. D. 1776-77.

(904) Mukundá Bhát stole articles belonging to Bráhmins who were assembled at Ramṇá for the purpose of receiving the Daxiná disbursed during the month of Shrávaṇ. He was imprisoned, and clothes worth Rs. 5-4 found on him were confiscated.

A. D. 1779-80.

(905) Three persons committed theft at the house of Bháichand Gujar of Bárámati and were arrested with the property stolen. Pándurang Báburao returned the property to

A. D. 1780-81.

तुम्हांकडील आपाजी बाबाजी यांणीं हुजूर विनंती केली; त्याजवरून हे सनद तुम्हांस सादर केली असे, तरी सदरहू तीन असामींचीं शासनें एकेक हात तोडून सोडून देणें; आणि हुजूर लिहून पाठवणें म्हणोन, पांडुरंग बाबूराव यांस. सनद १.

रसानगी, आपाजी बाबाजी दिंमत पांडुरंग बाबूराव.

९०६ ( ८४४ )—तालुके रत्नागिरी येथें शामल जंजीरकर याजकडील चोरांचा उपद्रव जाहला होता, याजकरितां लोक स्वारीस पाठविले, त्यास लोकांनीं चोर धरून आणिल्यास पन्नास रुपये बक्षीस द्यावयाचा करार केला, त्याप्रमाणें लोकांनीं चोर धरून आणिले, सबब सरकारांतून पन्नास रुपये बक्षीस द्यावयाची आज्ञा जाली पाहिजे म्हणून तुम्हीं हुजूर विनंती केली; ऐशास शामलाकडील चोरटे धरावयाची मेहेनत लोकांनीं चांगली करून चोरटे धरिले, सबब बक्षीस एक साला रुपये पन्नास ५० रुपये द्यावयाचा करार करून हे सनद सादर केली असे, तरी सदरील पन्नास रुपयांची नांवनिशीवार लोकांस वांटणी करून, तालुके मजकूर येथील हिशेबीं खर्च लिहिणें म्हणोन, महिपतराव कृष्ण यांचे नांवें. सनद १.

अर्बा समानीन मया व अलफ जमादिलाखर १६

रसानगी यादी.

९०७ ( ९०४ )—कोंकणप्रांतीं चोरटे चोऱ्या करीत होते, त्यांस तुम्हीं धरून आणून चौकशी करून त्यांचे अपराध हुजूर लेहून पाठविले; त्याजवरून चोरांचीं पारिपत्यें करावयाचीं. बीतपशील.

सीत समानीन मया व अलफ मोहरम ८

२० डोकीं मारावयाचे. असामी.

१ माना म्हार वारूळकर वस्ती हाय तर्फ मरल माहाल.

१ सोना बिन गणोजी शेलार, वस्ती ढोकवलें, तर्फ हेळवाक.

१ कृष्णशेट बिन पांडशेट सोनार चिपळुणकर, हल्लीं वस्ती कसबे बामणोली, तर्फ मजकूर.

---

the owner and solicited orders for the disposal of the thieves. He was directed to cut off one hand of each of the offenders and to set them at liberty.

(906) A reward of Rs. 50 was offered for the capture of robbers residing in the territory of the Janjirkar who used to commit robberies in the Táluká of Ratnágiri. The robbers having been captured, the rewards were ordered to be paid.

A. D. 1783-84.

(907) The following sentences were passed on 58 persons (Mahárs, Sonárs &c.) who were concerned in thefts committed in the Konkan and whose cases were reported for orders:—

A. D. 1785-86.

१ लक्ष्मण बिन धोंडशेट सोनार, वस्ती येलें, प्रांत सातारा, संभशेट, व जानशेट सोनार तांबीकर, यांचे घरचा पोर्गा.
१ बाळू बिन मांहादजी पाकडा, वस्ती मौजे भेंडसगांव. प्रांत पनाळा.
१ देवा बिन बहिरू महार, वस्ती मौजे पांचगणी, तर्फ मरळी महाल.
१ गणा म्हार बिन हिरा काजुरलीकर हल्लीं वस्ती पाटण.
१ नाना म्हार बिन खंडा म्हार तळेकर हल्लीं वस्ती मौजे उमरडें तर्फ मरळी.
१ रघा बिन दुलबा म्हार वस्ती मौजे पाली तर्फ तांब तालुके व्याघ्रगड.
१ राया बिन धारा म्हार वस्ती मौजे उमेरडें तर्फ परळी.
१ जान्या बिन धारोजी हेमण वस्ती मौजे कुलकवाडी.
१ लख्या बिन देवजी राणींक, वस्ती मौजे कुलकवाडी.
१ भिका बिन कृष्णाजी बुटर्या, वस्ती कुलकवाडी.
१ सोना बिन ताना भोवड, वस्ती कुलकवाडी.
१ लक्ष्मण बिन बाळकोजी बुटर्या, वस्ती चिपळूण.
१ लक्ष्मण बिन बाळकोजी मोन्या, वस्ती मौज कुलकवाडी.
१ गोपाळ सावंत देसाई, वस्ती मौजे मेढें, तर्फ फुणगुस.
१ कृष्णाजीराव खानवीलकर वस्ती मौजे बुडीयें. तर्फ फुणगुस.
१ लख्या कावल्या, वस्ती मौजे नारसिंगें तर्फ फुणगुस.
१ मादु रायकर वस्ती मौजे मेढें तर्फ फुणगुस.

---

२०

१३ उजवा हात व डावा पाय तोडावयाचे. असामी.

१ तान शेट सोनार वस्ती मौजे कुसवडें तर्फ पाटण.
१ होना लव्हार वस्ती मौजे ढोकवलें, तर्फ हेळवांकला.
१ महादजी बिन रुपाजी पाकडा, वस्ती मौजे भेडसगांव.
१ येसू बिन रुपाजी पाकडा वस्ती मौजे भेडसगांव.
१ गोदा बिन येसू पाकडा वस्ती मौजे भेडसगांव.
१ तामा म्हार बिन रामा म्हार पालकर, हल्लीं वस्ती मौज मरळी.
१ धाका बिन भिका म्हार वस्ती मौजे बिचोडी तर्फ हेलवाक.
१ जिवाजी विचारा वस्ती मौजे हसोल हल्लीं वस्ती कुलकवाडी.
१ रघोजी पोर्गा निसबत वाजोजी शिंदे वस्ती कुलकवाडी.

20 Persons to be beheaded,
13 ,, to have the right hand and left leg cut off,

१ अंतशेट बिन बाळशेट सोनार वस्ती मौजे खडपवली तालुके चिपळूण.
१ रत्नोजी बिन रामजी कदम वस्ती मौजे कुलकवाडी.
१ नारशेट बिन दादशेट सोनार मुरुडकर, हल्लीं वस्ती कसबे पुणें.
१ लक्ष्मण बिन आपाजीराव सुर्वे, कुंभारखाणकर.

१३

१८ उजवा हात तोडावयाचे. असामी.

१ गोरखोजीराव इंदुलकर वस्ती मौजे कुसवडें तर्फ पाटण.
१ हणमंता इंदुलकर, वस्ती मौजे कुसवडें, तर्फ पाटण.
१ हिरोजी इंदुलकर, वस्ती मौजे कुसवडें, तर्फ पाटण.
१ बाळोजीराव इंदुलकर वस्ती मौजे कुसवडें, तर्फ पाटण.
१ गणसालवी वस्ती मौजे कुसवडें तर्फ पाटण.
१ लक्ष्मण बिन विठोजी शेलार ढोकवलकर वस्ती मौजे रासाटी, तर्फ पाटण.
१ सेका बिन भानजी भांगड्या वस्ती मौजे कुसवडें तर्फ पाटण.
१ सेका बिन आपाजी सेळ्या, वस्ती मौजे धावडें, तर्फ मरळी.
१ रता बिन सोना म्हार, वस्ती मौजे सावरट, तालुके व्याघ्रगड.
१ माला बिन विठा म्हार, वस्ती मौजे उंबरणें, तर्फ मरळी.
१ संता बिन हरनाक म्हार, वस्ती मौजे उंबरणें, तर्फ मरळी.
१ भाना बिन मागल, हल्लीं वस्ती मौजे हाय, तर्फ मरळी.
१ बाळू बिन नागोजी धावडा, वस्ती मौजे कुलकवाडी.
१ चिमा बिन उदाजी पाटील, वस्ती मौजे खडपवली, तर्फ चिपळूण.
१ कृष्णशेट बिन बाळशेट वस्ती, मौजे खडपवली, तर्फ चिपळूण.
१ लक्ष्मण बिन माणकोजी सालवी, वस्ती लवलें, तर्फ खेड.
१ हरी गुरव, वस्ती मौजे तिवरें, घेरा प्रचितगड.
१ रघा गुरव, वस्ती मौजे राई, तर्फ फुणगुस.

१८

४ उजवा हात व कान एक कापावयाचे असामी.

१ बहिरू शेलार, वस्ती मौजे कुसवडें, तर्फ पाटण.
१ भागा बिन भिका म्हार, दरेकर, हल्लीं वस्ती मौजे सावरठ, तर्फ तांब.
१ सतू बिन धारोजी धामशा, वस्ती मौजे कुलकवाडी.

---

18 Persons to have the right hand cut off,

१ राजू बिन हिरोजी राणीक, वस्ती कुलकवाडी.

४

१ सोना बिन संता म्हार, वस्ती मौजे पापरडें, तर्फ मरळी, याचा उजवा हात व पाय तोडावा.

१ साना बिन ताना म्हार, वस्ती व्याघ्रंवली, तर्फ (देव)रुख, याचा एक कान कापावा.

१ संभाजी बिन हरजी डुगणकर, वस्ती मौजे कुलकवाडी, तर्फ चिपळूण, विशोभित करून फिरऊन मेक देऊन मारावा.

५८

एकूण अठ्ठावन असामींचीं सदरहू लिहिल्याप्रमाणें पारिपत्यें करणें ह्मणून, महिपतराव कृष्ण मामलेदार तालुके रत्नागिरी यांस. सनद १.

रसानगी यादी.

९०८ ( ९३१ )–तालुके अंजणवेल येथें बंदीवान आहेत, त्यांचे पारपत्याची आज्ञा, जाहली पाहिजे ह्मणोन तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें त्यास. कलमें.

सबा समानीन मया व अलफ सवाल २३

मल्हार आपाजी व त्याचा पोरगा हुजुरून किल्ले वहिरवगड येथें अटकेस ठेवावयासी पेशजीं पाठविला, त्यास मल्हार आपाजी सर्दीमुळें आजार होऊन मृत्यु पावला; पोरगा अटकेस आहे ह्मणोन लिहिलें, त्यास पोर्ग्यास जामीन घेऊन सोडून देणें. कलम १.

येसा गुलाम निसबत रामचंद्रभट गद्रे, वस्ती मौजे पालशेत, तर्फ गुहागर, हा भटजींचें घरीं मनस्वी वर्तणूक करून कामकाज न करी, यास्तव त्यांणीं सोड दिल्ही, त्याणें मुलकांत ब्राह्मणांचे घरीं दोन तीन वेळां चोऱ्या केल्या, सबब अटकेस ठेविला आहे, ह्मणोन लिहिलें. त्या चोऱ्या कोण

4 Persons to have the right hand and one ear cut off.

3 „ * * * *

(908) A slave, named Yesá, belonging to Rámchandrabhat Gadre of Pálset in Tarf Guhágar shirked work, and behaved impudently. Rámchandrabhat therefore discharged him. The slave then began to commit thefts. He was arrested and orders were solicited by the Mámlatdár of Anjanwel as to his disposal. Full details as to the places of thefts and the amount stolen in each case were called for, and the Mámlatdár was informed that on

A. D. 1786-87.

ताना देवळ्या कुणबी, वस्ती मौजे आडुर, तर्फ गुहागर, याणें मौजे वलणेश्वर, तर्फ मजकूर, येथें फिरस्ती महारीण होती तिजबरावर बदकर्म केलें; सबब अटकेस ठेविला आहे ह्मणोन लिहिलें. त्यास याचें घर जफ्त करून वस्तभाव तालुके मजकूरचे हिशेबीं जमा करणें; आणि यास पोटास शिरस्तेप्रमाणें शेर देऊन इमारतीवर काम घेत जाणें. कलम १.

कोणते जागा, किती ऐवजपर्यंत केल्या, तें तपशीलवार लेहून पाठवणें. समजोन आज्ञा होईल त्याप्रमाणें करणें; तोंपर्यंत पोटास शेरशिरस्तेप्रमाणें देत जाणें; इमारतीचें काम घेणें. कलम १.

एकूण तीन कलमें सदरहू लिहिल्याप्रमाणें करणें ह्मणोन, त्रिंबक कृष्ण यांचे नांवें. सनद १.
रसानगी, त्रिंबक नारायण परचुरे.

## ७ न्यायखातें.

## ( ब ) फौजदारी.

## ( अ ) गुन्हे.

### ५ फसवणूक.

९०९ ( ५४१ )—शहर पुणें येथील कोतवाली पेशजीं घासीराम सावळदास याजकडे होती, तेव्हां त्यांणीं रमाबाई ब्राह्मणीण बायको, घांभारगोंदेंकरीण, इजपासून संवाष्ण जेवावयासी गेली ह्मणोन निमित्य ठेऊन पन्नास रुपये घेतले आहेत. त्यास रमाबाईकडे सवाष्ण जेवावयास गेली असें लागत नाहीं. याजकरितां हल्लीं रुपये ५० पन्नास माघारे द्यावयाचे केले असत; तरी मशारनिल्हेचे फाजील कोतवाली संबंधें सरकारांत आहे, त्यापैकीं सदरहू पन्नास रुपये रद्द कर्ज लिहून रमाबाईस देविले असे, तरी देणें; आणि पावलीयाचें कबज घेणें, ह्मणोन आनंदराव कासी कोतवाल यांचे नांवें. छ. १२ जिल्हेज. सनद १.

समान सबैन मया व अलफ
सन २६

---

receipt of the information, final orders would be passed. A prisoner died of cold in the fort of Bahiravgad; his son who was also in prison was ordered to be released.

( 5 ) Cheating.

( 909 ) Ghâshirâm Sâwaldâs who was formerly a Kotwâl of Poonâ, fined a Brahmin widow Rs. 50 for going to dine at another Brahmin's house under the pretence that her husband was alive. The Huzur considered that the charge was not proved and ordered the money to be refunded to her.

A. D. 1777-78.

# ७ न्यायखातें.

## ( ब ) फौजदारी.

## ( अ ) गुन्हे.

### ६ चोरीचा माल घेणें.

९१० ( ७२४ )—अबदुल रहिमान जमादार, निसबत हुजूर हशम, यांणीं हुजूर विदित केलें कीं, लाड महमद व शेख चांद यांजपासून मीं चोरीचे दागिने विकत घेतले, सबब कसबे जुन्नर येथें माझें घर आहे त्याची जफ्ती बाळाजी महादेव यांणीं करून वस्तभाव वगैरे बीतपशील.

इसन्ने समानीन मया व अलफ सवाल १८

नक्त रुपये १७

सनगें एकूण किंमत अजमासें रुपये.

| | | |
|---|---|---|
| १९। | महंमुद्या | ४ |
| ४ | तिवट | १ |
| १७॥ | शेले | ४ |
| ९ | लुगडें चंद्रकळा. | |
| ४९॥। | | |

कापड दागिनें.

१ जामा बुट्टेदार.
२ बासनें छिटी.
१ रुमाल.
१ वळी.
१ मूठ.
१ कंठाळ.

७

बैल सर २

एकूण सत्रा रुपये नक्त व पावणेपन्नास रुपयांचीं सनगें, व सुमारे दागिने सात, व बैल दोन येणेंप्रमाणें किल्ले शिवनेरीस नेलें आहे; येविशीं आज्ञा जाली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून येविशींची चौकशी हुजूर मनास आणितां जमादार मजकूर याणें एकशेंवीस रुपयांचे दागिने चौघांस दाखऊन घेतले, चोरीचे असें ठावकें नाहीं. याप्रमाणें जालें, सबब याची जफ्ती केली आहे ते मोकळी करून हें पत्र सादर केलें असे, तरी सदरहूप्रमाणें वस्तभाव व घर कागदपत्र जफ्तीस ठेविलें आहे तें याचे हवालीं करणें; व अबदुल रहिमान यास जामीन सदरीलविशीं हुजूर घेतला, याजकरितां शिवनेरीस तुह्मीं जामीन घेतला आहे त्याचा कतबा माघारा देणें ह्मणोन, बाळाजी महादेव यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

(6) Receiving stolen property.

(910) Abdul Rahimán's property was attached by Báláji Mahádeo (officer of Junnar) on the ground that he has purchased stolen ornaments. Abdul applied to the Peshwá. It was found that Abdul purchased the ornaments publicly and in good faith. His property was therefore ordered to be released from attachment

A. D. 1781-82.

# ७ न्यायखातें.

## ( ब ) फौजदारी.

## ( अ ) गुन्हे.

### ७ बनावट दस्तऐवज.

### जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

९११ ( ४८६ )—बाळाजी केशव करडेले, दिंमत गणपतराव विष्णु गद्रे, याणीं हुजूर विदित केलें कीं, कृष्णाजी सदाशिव, वस्ती मलगांव, परगणे निंबाइत, याणीं खोटी हुंडी भगवंत बहिरव थथे औरंगाबादकर, याचें नांवची राखले रावजी दामोदर, नामें जोग बाळकृष्ण हरी गद्रे निसबत त्रिंबकराव विश्वनाथ यास द्यावें. अशी लिहिली. त्याचा ऐवज हुंडीप्रमाणें आपण दिल्हा. पुढें थथ्यांची रुजवात होतेसमयीं बोलले कीं, हुंडी खोटी; आमचे दुकानची नव्हे; ऐवज घेतला नाहीं. तेव्हां त्याचा शोध करितां, कृष्णाजी सदाशिव यानें खोटी हुंडी लिहिली; त्याजवरून सरकारांतून ताकीदपत्रें दिल्हीं कीं, खोटी हुंडी लिहिली त्याणीं ऐवज द्यावा. असें असतां, कृष्णाजी सदाशिव ऐवजाचा निकाल करून देत नाहीं ह्मणोन; त्याजवरून हें पत्र सादर केलें असे, तरी तुह्मीं कृष्णाजी सदाशिव यास पागा असीउमरी येथें आणून त्याजपासून व्याजसुद्धां ऐवज घेऊन, त्यापैकीं सरकारची चौथाई घेऊन, हुजूर पागेचा हिशेबीं जमा करून बाकी ऐवज बाळाजी केशव याचा देणें. याशिवाय कृष्णाजी सदाशिव याजपासून साधेल ते गुन्हेगारी घेऊन, हिशेबीं जमा करून, हुजूर लेहून पाठवणें ह्मणोन, गंगाधर शंकर यांचे नांवें. छ. २६ जमादिलाखर, चिटणिसी. पत्र १.

समान सबैन मया व अलफ रजब ३०

९१२ ( ६५५ ) चिंतो रामचंद्र भोपटकर याणें कृत्रिमीं पत्रें हातानें शिके करून,

---

## ( 7 ) Forgery.

### FROM JANÁRDAN ÁPÁJI'S DIARY.

( 911 ) Krishnáji Sadáshiv of Malgám in Parganá Nimbáyet forged a hundi and cashed it. He was ordered to pay back the amount fraudulently received of which one fourth was to be credited to Government, and to pay as large a fine as possible.

A. D. 1777-78.

( 912 ) Chinto Rámchandra Bhopatkar, forged false documents and seals. He was therefore imprisoned in fort Sinhgad and orders were issued not to allow him access to pen paper and ink.

A. D. 1779-80.

समानीन मया व अलफ जिल्हेज २

साधकांचीं खोटीं पत्रें लोकांस करून दिल्हीं, सबब त्यास किल्ले सिंहीगड येथें अटकेंत ठेवावयास पाठविला आहे, तरी शाई व लेखणी व कागद त्याजवळ न जाई असा पक्का बंदोबस्तानें अटकेंत ठेऊन पोटास शेर शिरस्तेप्रमाणें किल्ले मजकूरपैकीं देत जाणें ह्मणोन, नारो महादेव यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

## ७ न्यायखातें.

## ( ब ) फौजदारी.

## ( अ ) गुन्हे.

## ८ जबरीचीं लग्नें.

### जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

सीत सबैन मया व अलफ रमजान ३०

९१३ ( २४१ )—बापूजी आपाजी केळकर यांची कन्या दोहो सवा दोहो वर्षांची सदाशिवभट करमरकर, वस्ती सातारा, यांणीं जबरदस्तीनें धरून नेऊन गोपाळ कृष्ण कानिटकर याचा पुत्र मुका, यास देऊन लग्न करविलें; आणि मुबदला गोपाळ कृष्ण कानिटकर यांची कन्या सदाशिवभटानीं आपल्या बंधूस केली. केळकराची कन्या दुसरी नवरी थोर असतां धाकटी कन्या धरून जबरदस्तीनें नेऊन लग्न लाविलें. सबब करमरकर व कानिटकर या उभयतांचे घरांस बहिष्कार घालणें, व त्यांचीं घरें वस्तभावसुद्धां जप्त करणें; दोघांचे घरास बहिष्कार घालून जप्ती केल्याचें सविस्तर हुजूर लेहून पाठविणें ह्मणोन. सनदा.

१ कृष्णराव अनंत, मुक्काम सातारा. यांस कीं. सदाशिवभट करमरकर. याचे घरास बहिष्कार घालणें; आणि घर वस्तभावसुद्धां जप्त करणें, व ज्या गांवीं मुलीचें लग्न लागलें तेथील जोशी उपाध्ये यांस आणून हुजूर पाठविणें ह्मणोन.

( 8 ) Forced marriage.

FROM JANÁRDAN ÁPÁJI'S DIARY.

A. D. 1775-76.

( 913 ) Sadáshiv Bhat Karmarkar of Satárá forcibly took away a daughter of Bápuji Apáji Kelkar, aged two years or two years and a quarter, and married her to Gopál Krishṇa Kánitkar's dumb son, and in return for this service, Gopál Krishṇa's daughter was married to Sadáshiv's brother. Bápuji Apáji had another elder unmarried daughter, and the marriage of the younger daughter was therefore improper. Sadáshiv's and Gopál's families were

१ श्रीनिवास शामराव कमाविसदार, प्रांत कराड यास कीं, गोपाळ कृष्ण कानिटकरास, धाकटी कन्या धरून आणली, असें कळलें असून तिचें लग्न आपल्या पुत्राशीं केलें, सबब कानिटकराचें घरास बहिष्कार घालणें; आणि घर वस्तभाव देखील मौजे टेंबू, प्रांत मजकूर येथें इनाम जमीन आहे, ते वगैरे जें कानिटकराचें असेल त्यासुद्धां जप्त करणें ह्मणोन.

२

रसानगी यादी, छ. १४ साबान.

९१४ ( ५६४ )—हरी महादेव करमरकर, वस्ती कसबे बीरवाडी, तर्फ मजकूर, यांचे बंधूची कन्या नवरी आहे, तीस त्रिंबक धारप याणें धरून रानांत नेली, त्याजबद्दल येस जोशी उपाध्ये तर्फ मजकूर, व आबाजी बाबाजी धारप हे उभयतां रानांत जाऊन तिशीं त्रिंबक धारप याचें लग्न लाविलें, ऐसें येस जोशी व आबाजी बाबाजी ह्मणतात ह्मणोन हुजूर विदित जालें. त्याजवरून मनास आणतां मूल धरून नेली, तिचें लग्न येस जोशी यांणीं रानांत लाविलें, हा महद् अन्याय केला, सबब त्यांचें वतन जप्त करावयाविशीं हे सनद सादर केली असे, तरी मशारनिल्हेचें तर्फ मजकूरचें ज्योतिष व उपाध्येपण सरकारांत जप्त करणें; आणि सरकारढलाईत पाठविले आहेत, यांजबरोबर त्रिवर्गांस हुजूर पाठऊन देणें म्हणोन, कृष्णाजी रामचंद्र तर्फ बीरवाडी यांचे नावें. छ. २४ रविलाखर. सनद १.

समान सबैन मया व अलफ जमादिलावल ८

रसानगी यादी.

९१५ ( ६८० )—सदाशिव नागनाथ यांणीं हुजूर विदित केलें कीं, आपण मौजे

---

therefore excommunicated and their property was ordered to be attached. The Joshis and priests officiating at the marriage were also summoned to the Huzur.

( 914 ) Government was informed that Trimbak Dhárap of Birwádi in Táluká Birwádi forcibly took away Hari Mahádev Karmarkar's daughter outside the village and there married her. A certain Joshi officiated as priest and Abáji Bábáji Dhárap was with him. The officer of Birwádi was informed, that the offence was very serious, and was directed to attach the Joshi's watan and to send the three offenders to the Huzur.

A. D. 1777-78.

( 915 ) Sadáshiv Nágnáth, an inhabitant of Anantgaum in Parganá Ambe Jogái went on a pilgrimage to the Godávari, leaving his wife and daughter at home, Náro Báwáji

A. D. 1779-80.

समानीन मया व अलफ जमादिलावल ५ अनंतगांव, परगणे आंबेजोगाई, येथें वस्तीस राहतों. त्यास गुदस्तां जेष्ठमासीं आपण सिंहस्थास गोदास्नानास गेलों, घरीं कुटुंब होतें; व आपली कन्या लग्न करावयाची मूल होती. त्यास नारो बावाजी व केसो बावाजी कुळकर्णी आंबेकर, यांणीं आपण घरीं नाहीं ऐसी संधी पाहून जेष्ठ शुद्ध सप्तमीस अस्तमानीं दहा प्यादे व शेषंभट आंबेकर ऐसे आणून आमचे घरीं मारामार करून मुलीस धरून शेजारी सटवाजी पाटील मौजे मजकूर, यांचे आंगणांत नेली. तेंच दिवशीं त्या पाटिलाची भावजई मेली होती, तशीच मुलीस त्याचे आंगणांत उभी करून नारो बावाजी यांणीं आपले आंगावरील पांगरूण मधी धरून केसो बावाजी एकीकडे उभा राहिला, व एकीकडे मुलीस उभी केली, आणि शेषंभटानें मंगलाष्टकें म्हणोन, मुलीचे गळ्यांत मंगळसूत्र बांधोन, नाक टोंचोन, नथ घालून, मुलीस सोडून दिल्ही, आणि ते निघोन गेले. त्यास ब्राह्मणाचें लग्न नांदी श्राद्ध, सप्तपदी इत्यादिक कोणताही विधी केला नाहीं, ह्मणोन. ऐसीयास केसो बावाजी कुळकर्णी याणें सदाशिव नागनाथ यांचे कन्येस धरून नेऊन शेषंभटास नेऊन लग्नाचा विधी पुर्ता न करितां मंगळाष्टकें मात्र ह्मणोन मंगळसूत्र बांधोन नाकांत नथ घालून सोडून दिल्ही, याप्रमाणें अविधिकर्म जाहालें, तेव्हां तुह्मीं कुळकर्णी मजकुरास व शेषंभटास व आणीक या कर्मांत होते त्यांस बहिष्कार घालून, जाहालें वर्तमान हुजूर लेहून पाठवावें तें न केलें, हे कोण गोष्ट ? हल्लीं हें पत्र लिहिलें असे, तरी याउपरी ज्यांणीं सदरहूप्रमाणें केलें त्यांस बहिष्कार घालून घडला प्रकार चौकशी करून हुजूर लिहून पाठवणें ह्मणोन, समस्त ब्राह्मण क्षेत्र आंबेजोगाई, यांचे नांवें. पत्र १.

मालोजी नाईक बावळे, यास सदरहू अन्वयें पत्र कीं, येविशीं पेशजीं तुह्मांस सरकारचें पत्र सादर जाहलें असतां येविशींचें वर्तमान चौकशी करून लेहून पाठविलें नाहीं. याउपरी कोणाची रुरयात न करितां चौकशी करून, कुळकर्णी यास व शेषंभटास वगैरे या कामांत

---

and Keso Báwáji, taking advantage of his absence, entered Sadáshiv's house and with the assistance of 10 peons, whom they had hired for the purpose, forcibly carried away the daughter. They took her into the compound of Satwáji Pátil of the village, and made her stand before Keso, Náro holding a cloth between them. Sheshambhat chanted the hymns sung on occasions of marriage, tied the auspicious thread round the girl's neck and put an ornament on her nose. They then set the girl free and went away. Her father on his return represented the matter to the Peshwa. The Brahmin community of the sacred place of Ambe Jogái was reprimanded for not having reported the facts to Government. The community was now directed to excom-

असतील त्यांस ब्राह्मणांकडून बहिष्कृत करऊन, चौकशीचा मजकूर तपसीलवार लिहून कुळ-कर्णी व शेषंभट यांस सरकारचे ढलाईतांबरोबर हुजूर पाठविणें ह्मणोन. पत्र १.

२

एकूण दोन पत्रें चिटणिसी दिल्हीं असत.

९१६ (७५९)—निंबाजी गोसावी ब्राह्मण, वस्ती मौजे खरडी, परगणे कासेगांव,

इसन्ने समानीन मया व अलफ जमादिलाखर १६

यांणीं हुजूर विदित केलें कीं, आपण आपले स्त्रीस व कन्येस घेऊन आपले सासऱ्याचे घरीं, मौजे कामथी, परगणे मनरूप येथें गेलों होतों. त्यास तेथील कुळकर्णी योगेश्वर शामजी, यांणीं जबरदस्तीनें आमची कन्या धरून नेऊन वाड्याचीं कवाडें लाऊन आपले पुत्राशीं लग्न करावयाचें योजून गांवकरी जोशी जमा करून लग्न करावें असें ह्मणों लागला. त्यास गांवकरी न करीत, व आपला भाऊ माणकोबा यांणीं दगड घेऊन आपणांस मारून घेतलें, तेव्हां आमचे कन्येस सोडून दिल्हें. त्याजवर आह्मीं आपले कन्येचें लग्न करण्यास जातों तेथें कुळकर्णी मजकूर अडथळा करितो, लग्न करूं देत नाहीं, मूल थोर जाली, याजकरितां त्यास ताकीद जाली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून हें पत्र तुह्मांस सादर केलें असे तरी येविशींचें वर्तमान तुह्मीं मनास आणून एक वेळ लग्न जाहलें नसलियास, गोसावी मजकूर आपली कन्या दुसरे वरास देईल त्यास देऊं देणें. कुळकर्णी जबरदस्तीनें लग्न लावीत होता, असें असलियास त्याजपासून गुन्हेगारी सरकारांत घेऊन जमा करणें ह्मणोन, चिंतो रामचंद्र कमाविसदार, क्षेत्र पंढरपूर, दिंमत परशराम रामचंद्र यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

---

municate Náro, Keso and Sheshambhaṭ and to report the facts of the occurrence in detail after inquiry.

(916) Nimbáji Gosávi, a Brahmin of Kharḍi in Parganá Kásegaum,

A. D. 1781-82.

complained that he had gone to his father-in-law's house at Kámṭhi in Parganá Manrup, with his wife and daughter, that while there Yogeshwar Shámji, the kulkarṇi of the village, forcibly took his (Nimbáji's) daughter away to his house, closed the doors and collected the priests with a view to marry the girl to his son, that however as the villagers objected and as Nimbáji's brother struck himself with a stone, Yogeshwar released the girl, and that he was now obstructing the marriage of the girl with another person. Nimbáji therefore prayed that Yogeshwar might be ordered to desist from doing so. The Kamávisdár of Pandharpur was directed to inquire into the matter and to allow Nimbáji, in case his daughter had not already been married, to give her in marriage to any person he chose. He was further directed to fine Yogeshwar, if the allegations made against him were found to be correct.

९१७ (९३७)—मल्हार भवानी भींगोरे, मौजे खाबसवाडी, तर्फ लांजे, परगणे धारूर, यांणीं हुजूर विदित केलें कीं, बयाजी दत्ताजी ठाकूर देशमूख कळंबकर, व राणोजी बिन सुलतानजी शेळका पाटील व विठू तेली कारभारी मौजे मजकूर, या त्रिवर्गांनीं आपणांस व आपले स्त्रीस कैद करून मारामार केली. बहुत तसदी देऊन आह्मांस ह्मणों लागले कीं, आह्मीं तुझे मुलीचें लग्न लावितों. तेव्हां आपण उत्तर केलें कीं, मूल लहान तीन वर्षांची आहे, या समयीं लग्न करावयासी योग्य नव्हे ह्मणोन आपण बोलतांच मजला मारिलें; आणि गांवांतील गोविंद धोंड्या, उदमी ब्राह्मण, मीठ विक्या, उमर वर्षे पंचेताळसाचा, याजला आणून उभे केलें. आह्मीं त्यास पाहतां बहुत अनर्थ करून द्वाही दुराई केली, तेव्हां आह्मां उभयेतांस कमच्या मारून बेदम केलें. आपण बेदम पडलों असतां त्या दोहों चहूं घटकांत लग्न लाविलें ह्मणोन त्रिवर्ग बोलों लागले. आह्मीं यासी दृष्टीनें पाहिलें नाहीं, अशी जबरदस्ती आह्मांवर केली. येविशींची वाजवी चौकशी होऊन, ज्याणें आह्मांवर जबरदस्ती केली आहे त्याचें पारपत्य करून आमचे मुलीचें लग्न येथाविधी करऊन दुसऱ्या वरास द्यावयाची आज्ञा केली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून हें पत्र सादर केलें असे, तरी येविशींची चौकशी मौजे मजकूरचे व भोंवरगांवचे ब्राह्मण जमा करून त्यांच्या जबान्या लेहून घेऊन, त्या जबान्यांवरून या ब्राह्मणावर जबरदस्ती करून लग्नाची अविधी केली, असें जाहालें असल्यास हल्लीं या मुलीचें विधियुक्त दुसरें लग्न करऊन, ज्यांनीं याजवर जबरदस्ती केली आहे त्यांचें पारपत्य येथास्थित करून, गुन्हेगारी घेऊन हुजूर पाठवणें. तेथें विल्हेस न लागे तरी जबान्यासुद्धां

सबा समानीन मया व अलफ मोहरम १५

---

(917) Malhár Bhawáni Bhingore of Khábaswáḍi in Tarf Lánje in Parganá Dhárur complained that the Deshmukh Pâṭil and Kárbhári of his village arrested and beat him and his wife and pressed him to allow them to marry his daughter to a man of their selection. The girl was three years old and Malhár urged that she had not reached marriageable age. The Deshmukh and other persons thereupon called Govind Dhondyá, a Brahmin trader in salt, aged 45, and declared that they would marry the girl to him. Malhár and his wife strongly protested against the marriage but to no purpose. The Deshmukh and others beat Malhár and his wife so severely that they fell down and lay unconscious for about 2 hours. When they came to their senses, they were told that the marriage had been celebrated. Malhár therefore prayed that an inquiry might be made, and that he might be permitted to marry the girl to another bride-groom. The Kamàvisdàr of Paiṭhaṇ was ordered to investigate the matter, and if he found that the marriage

A. D. 1786-87.

हुजूर पाठवणें ह्मणोन, सदाशिव विठ्ठल कमाविसदार, मोकासी परगणे पैठण, दिंमत मानसिंगराव सोळसकर, यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

# ७ न्यायखातें.

## ( ब ) फौजदारी.

## ( अ ) गुन्हे.

### ९ बदकर्म.

९१८ ( ७०३ )—जनोजी डावरा, मौजे धोलवड, तर्फ हवेली, प्रांत जुन्नर, याची बायको अहिली, हिणें देवजी बिन खंडोजी चिंचवडा, वस्ती मौजे मजकूर, याजवळ बदकर्म केलें, सबब देवजी मजकूर याजपासून तुह्मी गुन्हेगारी घेऊन, याचे बायकोस अटकेस ठेविली आहे. तिचें पारिपत्य जाहालें नाहीं, ह्मणोन, डावरा मजकूर याणें हुजूर अर्ज केला, त्याजवरून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी राणोजी शेलार खिजमतगार, निसबत खास जिलीब, दिंमत संभाजी धाईरीकर, यास पाठविला आहे, याचे गुजारतीनें अहिलीचें नाक कापून सोडून देणें; आणि हुजूर लिहून पाठवणें, ह्मणोन. बाळाजी माहादेव मामलेदार तालुके शिवनेर यांचे नांवें. सनद १.

इसन्ने समानीन मया व अलफ रजब १६

रसानगी यादी.

९१९ ( ८९१ )—जानकी लगडीण, इणें बदअंमल केला, सबब किल्ले विसापूर येथें अटकेस ठेविली आहे, तीस सोडावयाविशीं तिचा बाप शिवजी गाइकवाड, याणें हुजूर अर्ज केला; त्याजवरून तिणें बदअंमल करूं नये, याप्रमाणें शिवजी मशारनिल्हे यास जामीन घेऊन सोडावयाची आज्ञा केली असे, तरी तिजला सोडून देऊन शिवजी मशारनिल्हे याचे हवालीं करणें ह्मणोन, भिकाजी गोविंद यांचे नांवें. सनद १.

सीत समानीन मया व अलफ साबान १३

परवानगी रूबरू.

---

had been celebrated without the usual ritual, to get the girl married to another person. and to inflict an adequate punishment on the offenders.

( 9 ) Adultery.

( 918 ) Áhili, wife of Janoji Drāwarā of Dholwad in Prānt Junnar committed adultey with Devji Khandoji Chinchawdá. Devji was fined and Ahili was sentenced to have her nose cut off and then to be set at liberty.

A. D. 1781-82.

( 919 ) Jánki Lagadin was imprisoned at fort Visápur for adultery. Her father Shiwáji Gáikwád prayed for her release. His prayer was granted on his standing surety for her future good conduct.

A. D. 1785-86.

९२० ( ११०८ )—काशी कोम त्रिंबकजी चवाण, वस्ती कसबे नेवासें, इणें आपला
खमस तिसैन
मया व अलफ
जिल्हेज १
दादला व घरदार सोडून पुण्यांत येऊन बदकर्म करीत होती, सबब किल्ले सरसगड येथें अटकेस ठेवावयास बरोबर गाडदी, निसबत राघो-विश्वनाथ याजकडील देऊन पाठविली असे, तरी किल्ले मजकुरीं कैदेंत ठेवणें, तेथें कोणाशीं बदकर्म करूं नये; व कोणी निसबतीस घेऊन आपले घरीं नेऊन काम काज करऊं नये, किल्ले मजकूरचे इमारतींचें वगैरे काम घेऊन पोटास शेर शिरस्ते-प्रमाणें देत जाणें ह्मणोन, गोविंद बाजी यांचे नांवें. सनद १.

रसानगी, राघो विश्वनाथ गोडबोले.

## ७ न्यायखातें.

## ( ब ) फौजदारी.

## ( अ ) गुन्हे.

## १० भूमिगत द्रव्य.

## नारो आपाजीच्या कीर्दीपैका.

९२१ ( १९५ )—कसबे सिन्नर येथें जावजी पाचोरा कुणबी याजकडें ठेवणें सांपडलें,
खमस सबैन
मया व अलफ
रबिलाकर ५
त्याची चौकशी करितां ठेवणें सांपडलें तें काढून नेलें, थांग लागों देत नाहीं, ह्मणोन तुह्मांकडील कारकुनांनीं हुजूर विदित केलें; त्याजवरून हुजूरून त्याचे चौकशीस सदाशिव बाबाजी कारकून शिलेदार पाठविले आहेत. त्यांस, व समागमें प्यादे आहेत त्यांस रोजमरा. रुपये.

१५ सदाशिव बाबाजी यांस रोजमरा एकमाही, छ. १ रबिलावलचा.

१२ प्यादे दिंमत अबदुला यांस रोजमरा दुमाही, छ. १ सफरचा.

( 920 ) Káshi kom Trimbakji Chaván of Newáse left her husband
A. D. 1794-95.
and was living in adultery in Poona. She was therefore sent to prison in fort Sarasgad.

( 10 ) Treasure-trove.

FROM NÁRO ÁPÁJI'S DIARY.

( 921 ) Government was informed that some treasure had been
A. D. 1774-75.
found by Jáwaji Páchorá, kunbi of Sinner, but that no trace of it could be discovered. Sadáshiv Bábáji kàrkun Silledár was therefore sent from the Huzur to inquire into the matter.

६ देवजी वल्लद रामजी.
६ रघोजी वल्लद कुसाजी.

१२

एकूण सतावीस रुपये रोजमरा एकमाही, व दुमाही सदरहू तेरखांचा हुजूर पावला आहे. पुढें ठेवीची चौकशी होऊन ठिकाण लागे तों रोजमरा एकमाही व दुमाही भरल्यास तालुके पटापैकीं देणें ह्मणोन, बाळकृष्ण केशव यांचे नांवें. छ. १४ रबिलावल. सनद १. रसानगी यादी.

९२२ ( २६९ )—मौजे खडकवासलें तर्फ हवेली पुणें कर्यात मावळ, येथील मोकदमांनीं सरकारचे आज्ञेशिवाय मौजे मजकूरचे रानांत ठेवणें खणावयास गेले; त्याची चौकशी हुजूर मनास आणितां, ठेवणें यांस सांपडलें नाहीं, परंतु सरकारचे आज्ञेशिवाय हे ठेवणें आणावयास गेले, सबब सहाशें रुपये गुन्हेगारी यांजकडे करार केली, याचा भरणा हुजूर होईल, तुह्मीं ठेवण्याविशीं मौजे मजकूरचे मोकदमांस उपसर्ग न लावणें ह्मणोन, आनंदराव जिवाजी यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

सीत सबैन मया व अलफ मोहोरम १

९२३ ( ७४६ )—शामराव मुरार याची हवेली किल्ले मुल्हेर येथें आहे, त्यांत द्रव्य आहे; त्याचा शोध करून जमीन खणून द्रव्य सांपडेल त्यापैकीं निमे शामराव यास द्यावें; व निमे सरकारांत घ्यावें ह्मणोन, राघो अनंत दिंमत मजकूर यांणीं हुजूर विनंती केली; त्याजवरून श्रीनिवास त्रिंबक कारकून, व खिजमतगार असामी दोन तुह्मांकडे पाठविले आहेत, तरी बेलदार वगैरे माणसें लागतील तीं देऊन, राघो अनंत जागा दाखवितील तेथें तुह्मीं जवळ उभें राहून जमीन खणून माल निघेल तो बंदोबस्तीनें काढणें. जो माल निघेल त्यापैकीं निमे शामराव मुरार यास द्यावा, निमे सरकारांत घ्यावा; याप्रमाणें करार केला असे, तरी जो माल निघेल तो हुजूर लेहून पाठवणें, आज्ञा होईल त्याप्रमाणें करणें ह्मणोन, रामचंद्र कृष्ण, तालुके मुल्हेर, यांचे नांवें. सनद १.

इसन्ने समानीन मया व अलफ रबिलाखर ६

---

( 922 ) The Mokadams of Khadakwásle in Turf Haveli, Poona, Karyát Máwal, having dug for treasure in the village lands, without the permission of Government were fined Rs. 600 though no treasure was found.

A. D. 1775-76.

( 923 ) Rágho Anant, a servant of Shámrao Murár, represented that treasure was hidden in Shámrao's house at fort Mulher and prayed that it might be dug up and one half given to Shámrao, the other half being taken by Govern

A. D. 1781-82.

शामराव मुरार यांचे नांवें सनद कीं, जो माल निघेल त्यांपैकीं निमे तुह्मांस बक्षीस करून निमे सरकारांत घेतला जाईल, खातरजमा असो देणें ह्मणोन. सनद १.

२

एकूण दोन सनदा दिल्या असेत, रसानगी यादी.

# ७ न्यायखातें.

## ( क ) फौजदारी.

### ( अ ) गुन्हे.

#### ११ जादूगिरी.

९२४ ( १७ )—बाळाजी महादेव कारकून, निसबत दफ्तर, यांणीं विदित केलें कीं, आपले स्त्रीस कोकणांतील भुतें लागून बाधा जाहली आहे. त्याजकरितां कोकणांत मौजे देवघर, तर्फ देवरुख, तालुके रत्नागिरी येथें जाऊन देवापाशीं सहा महिन्याचा गूण मागितला, त्याप्रमाणें सहा महिने निक्षून गूंण पडिला; परंतु उपद्रव कोणाकडून होतो याचें ठिकाण लागलें पाहिजे त्यास चौगांवच्या देवाच्या दाखल्यानें ज्याचें भूत निवडेल तें त्याचे पदरीं घालून उपद्रव न होय तें करणें; आणि भुताळ्यापासून गुन्हेगारी घेणें ह्मणोन, महिपतराव कृष्ण यांचे नांवें चिटणिसी छ. २१ रमजान. पत्र १

अर्बा सबैन मया व अलफ रमजान ३०

९२५ ( २४ )—परशराम जिवाजी डोंगरे मौजे केळें, तर्फ केळें माजगांव, यांणीं हुजूर

---

ment. The prayer was granted and the officer of Mulher was directed to cause the spot shown by Rágho to be dug up and to report the result.

( 11 ) Practice of witchcraft and sorcery.

( 924 ) Báḷáji Máhádeo, a karkun in the Daftar, represented that his wife had been possessed by an evil spirit in the Konkaṇ, that he had prayed the deity of his village Dewaghar, in Tarf Devrukh in Táluká Ratnágiri, that she might be cured within 6 months and that she had been cured accordingly within the 6 months. He requested that inquiries might now be made to find out who caused the evil spirit to possess his wife. Orders were issued accordingly to find out and fine the offender and to take steps to stop further trouble.

A. D. 1773-74.

( 925 ) Parashrám Jiwáji Ḍongre of Keḷe in Tarf Keḷe Májgaum,

अर्बा सबैन मया व अलफ जिल्काद ३० विदित केलें कीं, आमचे घरीं भूताची पिडा होऊन बहुत नाश झाला. येविशींची चौकशी थळी पडथळीं करितां बाबू महादेव डोंगरे, मौजे मजकूर यांणीं देवास माजुका केल्या; व भुतें घातलीं असें निघालें; त्याप्रमाणें गांवकरी यांचे गुजारतीनें त्यांचे पदरीं भुतें घातलीं असतां सुरळीतपणें वारीत नाहीं ह्मणोन, त्याजवरून तुह्मीं चौदेवास पडथळें नेमून पडथळीं ज्याचें भूत निवडेल त्यापासून वारऊन यांस फिरून उपद्रव न लागे तें करून जामीन घेऊन अन्यायाप्रमाणें गुन्हेगारी घेऊन सरकार हिशेबीं जमा करणें ह्मणोन बाजी महादेव यांचे नांवें छ. सवाल चिटणिसी. पत्र १.

## नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

९२६ ( १७१ )—तालुके अंजणवेल, व तालुके सुवर्णदुर्ग, येथील भुताळ्यांची चौकशी खमस सबैन मया व अलफ मोहरम ६ करून बंदोबस्त करावयाचें काम बाजी राम यांजकडे सांगितलें आहे, त्यास बंदोबस्ताचे कामकाजास तुह्मांकडून तालुक्यापैकीं शिपाई देविले असत, तरी नेहमीं नेमून देणें, व भुताची चौकशी गांवगन्ना फिरोन करावयाची आज्ञा मशारनिल्हेस केली आहे, हे गावगन्ना फिरोन पेशजी सरसुभाहून कलमबंदीचा जाबता करून दिला आहे, त्याप्रमाणें चौकशी करतील, त्यांस करूं देणें ह्मणोन. छ. २४ जिल्काद. सनदा.

१ कृष्णाजी विश्वनाथ तालुके अंजणवेल यांस शिपाई असामी ३ तीन देणें ह्मणोन.

१ मोरो बापूजी तालुके सुवर्णदुर्ग यांस शिपाई असामी ३ तीन देणें ह्मणोन.

---

२

रसानगी यादी.

---

A. D. 1773-74. respresented that there being much sickness in his family due to the influence of evil spirits, he made inquiries at several sacred places and found that the evil spirits were sent by Bábu Mahádeo Dongre. He further stated that though the fact was brought home to Bábu in the presence of the villagers he did nothing to call away the spirits. Báji Mahádeo was therefore directed to institute inquiries to fine the offenders, to cause the evil spirits to be driven out, and to take security from the offender, binding him to abstain from such acts in future.

## FROM NÁRO ÁPÁJI'S DIARY.

( 926 ) A kárkun Bájirao was appointed to move about in the Tálukás of Anjanwel and Suwarnadurga and make inquiries regarding persons possessing power over evil spirits. Two kárkoons from the Tàlukás and some peons were deputed to assist him.

A. D. 1774-75.

तालुके सुवर्णदुर्ग, व तालुके अंजणवेल, येथील भुताळ्याचे बंदोबस्ताचें काम तुह्मांकडे आहे, त्याचे कामकाजास सदरहू दोन तालुक्यांपैकीं दोन कारकून व दहा लोक देविले होते, त्यांपैकीं कांहीं दिले व कांहीं न दिल्हे; त्यास हल्लीं गांवगन्ना फिरोन चौकशी जाहली पाहिजे, यास्तव दोन तालुक्यांपैकीं लोक असामी सहा देविले असत. त्यांशिवाय जदीद असामी पांच करार केले; त्यांस मोईन वगैरे.

| | |
|---|---|
| कारकून असामी १<br>मोईन सालीना रुपये ५० | प्यादे असामी ४ दरमहा दर असामीस आकरमाही शिरस्ता रुपये ४ प्रमाणें दरमहा रुपये १६. |

एकूण असामी पांच पैकीं कारकून असामी एक यास मोईन सालीना पन्नास रुपये, व प्यादे असामी चार यांसी दरमहा आकरमाही शिरस्ता सोळा रुपये करार केले असत, तरी सदरहूप्रमाणें पांच असामी जदीद ठेऊन बंदोबस्त करणें; आणि चाकरी बमोजीब आकार होईल तो कमाविसपैकीं देणें ह्मणोन, बाजीराम यांचे नांवें. छ. २४ जिल्काद.

सनद १.

रसानगी यादी.

९२७ ( १७३ )—तालुके रत्नागिरी, व तालुके विजयदुर्ग, व तालुके देवगड, व तालुके सौदळ, येथील भुताळ्यांचे बंदोबस्ताचें काम तुह्मांकडे सरसुभाहून सन इसन्ने सबैनांत सांगोन, कमाविसीचे ऐवजीं नेमणूक करून दिली आहे. सालीना. रुपये.

खमस सबैन मया व अलफ मोहरम ६

३५० तुह्मांस मोईन.

२०० ऐन तैनात.

५० भोजन खर्च, व पोरगा मिळोन.

३५०

७५ कारकून असामी १ एकूण मोईन.

१७६ प्यादे कामकाजाबद्दल, असामी ४ दरमहा दर असामीस रुपये ४ प्रमाणें रुपये १६ एकूण आकरमाही.

१० कागद बहा, व शाई शिरें, यांस अदमासें नेमिले असत. चौकशीनें खर्च लागतील ते करावे.

६११

( 927 ) The salary of the officer sent to inquire about persons

एकूण सहाशें अकरा रुपये सालीना खर्चाची नेमणूक, पेशजीं सन इसन्ने सबैनांत, सरसुभाहून विसाजी केशव यांणीं करून दिल्ही आहे, त्याप्रमाणें हुजुरून करार केली असे, तरी भुताळ्यांचे व कमाविसीचे ऐवजीं चौकशीनें खर्च करणें. कमाविसीचा हिशेब हुजूर समजावीत जाणें. त्यांत मजूरा दिल्हे जातील. भुतांचे चौकशीचीं वगैरे. कलमें.

चौकशीचें वगैरे कलमांचा जाबता सरसुभाहून विसाजी केशव यांणीं सन इसन्ने सबैनांत करून दिला आहे, त्याप्रमाणें गावगन्ना फिरोन चौकशी मनास आणून बंदोबस्त करून सालाचें सालांत हुजूर समजावीत जाणें. कलम १.

गुन्हेगारी पंचवीस रुपयांपासून पन्नास रुपये पावेतों घ्यावी, ह्मणोन सरसुभाहून चौकशीचें कलमाचा जाबता करून दिला त्यांत कलम लिहिलें आहे. परंतु कोकणची रयत गरीब, मसाला गुन्हेगारीवर दृष्टी न देणें. ह्मणोन सन सलासांत सरसुभाचें पत्र आहे, त्या अन्वयें जीवन पाहून गुन्हेगारी घेत जाणें. कलम १.

एकूण दोन कलमें करार केलीं असत, तरी सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, बाजी महादेव यांचे नांवें. छ. १९ जिल्हेज. सनद १.

रसानगी यादी.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

९२८ ( २२० )—मार्तंड जोशी रायरीकर, याणें जादुगिरीचा प्रयोग केला, सबब किले घनगड येथें अटकेंत ठेवावयास पाठविला असे, तरी पायांत बेडी घालून पक्क्या बंदोबस्तानें अटकेंत ठेऊन पोटास दरमहा, केलीं.

सीत सबैन मया व अलफ जमादिलाखर २९

८८१॥ तांदूळ सडीक मोठे.
८।२ जोरी बाजरी वगैरे दाणे यांचें पीठ करून.
८८१ दाळ.
८८।· मीठ.

८॥·१।

A. D. 1774-5 possessing power over evil spirits was fixed at Rupees 350. He was directed not to impose heavy fines as the ryots in Konkan were poor.

(928) Mártand Joshi Ráyarikar having practised magic, was sent to prison in fort Ghangad. It was ordered that fetters should be put on him, that these should be removed

A. D. 1775-76.

एकूण पावणेआठ पायली केली, दरमहा, पोटास सनदपैवस्तागिरीपासून देणें, व दोन प्रहरीं अंघोळीचे वेळेस बेडी तोडून स्नान घालणें. कपाळीं विभूत व गंध एकंदर लाऊं न देणें; व स्नानसंध्या जपज्याप कांहीं करूं न देणें; व दोन प्रहरीं एक वेळ मात्र आपल्या बेतानें भोजनास करून खाईल, उपरांत बेडी घालीत जाणें; व सायंकाळीं बेडी न काढणें, व भोजनास दुसऱ्यानें करील तर, व व्रत कांहीं करूं लागेल व स्नानसंध्या कांहीं करूं लागेल, तर एकंदर करूं न देणें ह्मणोन, रामराव नारायण तालुके राजमाची यांचे नांवें. छ. ९ रबिलाखर. सनद १.

रसानगी यादी.

९२९. ( २३७ )–सिदोजी सिनगारा भोई निसबत गंगाधर शंकर दिंमत पागा हुजूर, याचा भाऊ काळोजी यास मोराजी तिकोना भोई, याणें भुतें घालून जिवें मारिलें, याप्रमाणें गोतभोई, शहर पुणें, नाईक असामी ५० यांणीं मोराजीचे आंगीं मुद्दा शाबीत केला. तेव्हां जादुगिरीची विद्या निष्फळ व्हावी, यास्तव पुढील वरले दोन दांत पाडून चांभाराचे कुंडांतील पाणी पाजून जातीबाहेर टाकावा असें ठरलें असतां, मोराजी गोताजवळ म्हणतो कीं, जातींतून गेल्यावर बेरडां मांगास मिळून मारे करीन. अशा बदफैलीच्या गोष्टी सांगतो, सबब तुह्मांकडे, किल्ले कोहज, येथें अटकेस ठेवावयास पाठविला असे, तरी मोराजीचे पुढील वरले दोन दांत पाडून, चांभाराचे कुंडांतील पाणी पाजून, किल्यावर अटकेस बंदोबस्तीनें ठेवणें; आणि बंदीवानाप्रमाणें काम करऊन पोटास शेर देत जाणें ह्मणून, भिकाजी गोविंद मामले कोहज यांचे नांवें. छ. ९ माहे रजब. सनद १.

सीत सबैन मया व अलफ रमजान ३०

रसानगी यादी.

only once in the day at the time of the mid-day meal, which he should be made to prepare himself, that he should not be allowed to apply sacred ashes or sandal mark, nor to perform the daily religious rites, nor to recite sacred hymns.

( 929 ) It was proved by the evidence of 50 of his caste-men that Moráji Tikoná Bhoi, caused the death of Káḷoji Singárá Bhoi through the instrumentality of evil spirits. In order that his powers of sorcery might be rendered ineffectual, it was ordered that two of his front upper teeth should be extracted, that he should be made to drink water from the Chàmbhárs' reservoir, and that he should then be excommunicated. Moráji however threatened his caste-men that if he were excommunicated he would join the Berads and Mángs and practise witchery through them. He was therefore sent to prison at Kohaj, and orders were issued for the extraction of his teeh, and for his being made to drink Chámbhár's water, and to work like other prisoners.

A. D. 1775-76.

९३० ( ९२९ )—बाळाजी धोंडदेव, वस्ती मौजे जिवली, तर्फ केळें माजगांव, तालुके
सबा समानीन मया व अलफ साबांन ९
रत्नागिरी, यांणीं हुजूर विदित केलें कीं, मौजे मजकूर येथें आपले घरीं आज दोन वर्षे भुताचा उपद्रव नानाप्रकारें होऊन नाश जाला. एका वर्षामध्यें अकस्मात् घरास आग लागोन घर दोन वेळां भुतांनीं जाळलें. त्यांत वस्तभाव झाडून जळाली. कांहीं राहिलें नाहीं. त्यास आपल्यावर भुतें घालून कोणीं दावा केला, त्याची चौकशी करून पत्ता लाऊन पारपत्य होय तें केलें पाहिजे ह्मणोन; त्याजवरून हें पत्र सादर केलें असें, तरी येविशींची चौकशी तुह्मीं करून, ज्याचीं भुतें मशारनिल्हेचें घरीं उपद्रव करीत असतील, त्याजकडून भुतें वारऊन फिरोन यांचें घरीं उपद्रव न होय ऐसा जामीन घेणें; व गुन्हेगारी घेऊन तालुके मजकूरचे हिशेबीं जमा करणें ह्मणोन, महिपतराव कृष्ण यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

# ७ न्यायखातें

## ( ब ) फौजदारी.

## ( अ ) गुन्हे.

### १२ गोवध.

९३१ ( १०८७ )—कसबे खेड, तर्फ मजकूर, प्रांत जुन्नर, येथील महारांनीं गोवध
अर्बा तिसैन मया व अलफ रविलावल १
केला, व गुरें मारलीं, ह्मणोन हुजूर विदित जालें; त्याजवरून महाराचे हाडोळ्याची जमीन आहे, तिची जफ्ती सरकारांत करून कमावीस तुह्मांकडे सांगितली असे, तरी हाडोळ्याचे जमीनीची जफ्ती करून, उत्पन्नाचा आकार होईल तो सरकार हिशेबीं जमा करणें ह्मणोन, महिपत कृष्ण कमाविसदार कसबे मजकूर यांचे नांवें. सनद १.

रसानगी, त्रिंबक नारायण परचुरे कारकून निसबत दफ्तर.

---

( 930 ) Bàlàji Dhondadeo of Jiwali in Tarf Kele Majgaum in Táluká
A. D. 1786-87.
Ratnàgiri complained that he had been troubled in various ways by evil spirits for the last two years, that during the current year his house was twice set on fire by them and all the property therein was destroyed. He prayed that the persons who sent the evil spirits to harass him might be traced and punished. An inquiry was ordered to be made.

( 12 ) Cow-killing.

( 931 ) The Mahárs of Khed in Pránt Junnar having killed a cow
A. D. 1793-94.
and other cattle, their watan was ordered to be attached.

९३२ ( १०९३ )—केशवराव जगन्नाथ यांचे नांवें कीं, तुम्हीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. केदारी मांग, वस्ती मौजे कल्याण, घेरा किल्ला सिंहीगड, याचे घरीं येश्या व अंबऱ्या मांग, वस्ती मौजे किकवी, तर्फ खेडेंबारें हे चार महिने येऊन राहिले होते, त्यास तिघां मांगांनीं छ. १० रबिलावलीं धोंडजी करजवणा, याची गाय मोगरवाडीचें रानांतून गुरांतील धरून आणून कल्याणचे रानांत दिवसास बांधोन ठेऊन, सायंकाळीं तिघां जणांनीं सुरा व कुराड बिळे वस्त्यानें जिवें मारली. त्याचे चौकशीस किल्ले मजकुरींहून शिपाई, व कल्याणकर पाटील, व बेरड पाठविले. जाग्याचा थांग मोघमदऱ्यांत लागला, सबब कल्याणकर महाराचे घरांतील झाडे घेऊन, मांगाचे घरांत गेले तों केदाऱ्या मांग याचे घरांत मुद्दा सांपडला, सबब घर जप्त करून तिघे मांग किल्यास आणून चौकशी करितां कबूल जाहले. त्यांची जबानी लिहोन घेतली. तिची नक्कल पाठविली आहे. मांगांचा अपराध थोर आहे. पारपत्याची आज्ञा जाहली पाहिजे ह्मणोन, तपसीलें लिहिलें तें कळलें. त्यास मांगांनीं गाईचा वध केला, सबब सदरील तीन असामींचे उजवे हात तोडून सोडून देणें ह्मणोन, छ. ९ रबिलाखर. सनद १.

अर्बा तिसैन मया व अलफ जमादिलावल १७

रसानगी, त्रिंबक नारायण.

## ७ न्यायखातें.

## ( ब ) फौजदारी.

## ( अ ) गुन्हे.

### १३ किरकोळ.

९३३ ( ६१९ )—येसोबा नाईक संभूस, वस्ती कसबे संगमनेर, याचे घरीं सन समान सबैनांत चोरांनीं दरवडा घातला, त्यांपैकीं किल्ले पटा येथें अटकेस चोर असामी नऊ ९ असामी ठेविले आहेत, त्यांचीं हल्लीं डोकीं मारावयाची तुम्हांस आज्ञा करून, हे सनद सादर केली असे, तरी

समानीन मया व अलफ जमादिलावल २८

---

( 932 ) Certain Mángs of Kalyan near Sinhgad having killed a cow, their right hands were ordered to be cut off.

A. D. 1793-94.

( 13 ) Miscellaneous offences such as negligence in guarding prisoners &c.

( 933 ) Nine dacoits imprisoned at fort Pattá were ordered to be beheaded. Four other prisoners, also concerned in dacoity had escaped from fort Bitingá. The persons who had been responsible for their safe custody were ordered to be sent to the Huzur.

A. D. 1779-80.

सदरहू चोरांचीं डोकीं, रघोजी पवार खिजमतगार यास पाठविला आहे, याचे गुजारतीनें मारणें; व किल्ले बितिंगा, तालुके मजकूर येथें चार दरवडेकरी अटकेंत होते, ते पळोन गेले सबब दरवडेकरी यांचे चौकीच्या लोकांस हुजूर आणविले असत, तरी पाठऊन देणें ह्मणोन, बाळकृष्ण केशव यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

९३४ ( ७७८ )—अबदुल्ला वलद शेख नथु जमातदार, हा नांदागीरीकर बेरडांस जामीन होता; त्यास ते पळोन गेले सबब अबदुल्ला मजकूर यास, किल्ले सिंहगड येथें अटकेस ठेवावा, याजकरितां बिडीसुद्धां बराबर गाडदी देऊन पाठविला असे, तरी किल्ले मजकुरीं यास पक्के बंदोबस्तानें अटकेस ठेऊन, पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन नारो महादेव यांचे नांवें. सनद १.

सलास समानीन मया व अलफ सफर १२

९३५ ( ८५८ )—बाळ जोशी चांदोरकर, हे त्रिंबकराव नारायण याजकडे सरकारची चौकी असतां, त्याजकडे जाऊन त्यासीं कांहीं बोलणें बोलून गेले सबब त्यांस कैद करून किल्ले सुरगड, तालुके अवचितगड, येथें अटकेस ठेवावयास बरोबर गाडदी, दिंमत शेख अहमद याजकडील दहा असामी देऊन पाठविलें असे, तरी पायांत बेडी न घालितां पक्के बंदोबस्तानें किल्ले मजकुरीं अटकेस ठेऊन, पोटास शिधा मध्यम प्रतीचा देत जाणें ह्मणून गणेश बल्लाळ, व हरी गणेश यांचे नांवें. सनद १.

खमस समानीन मया व अलफ सवाल १७

रसानगी, राघो विश्वनाथ गोडबोले.

९३६ ( ८८९ )—बावाखान, वस्ती मौजे चावणें, तर्फ तुंगारतन, हा तालुके कर्नाळा येथें चोऱ्या करीत होता, त्यास धरून आणून किल्ले कर्नाळा येथें अटकेस इब्रामखान जेजालदान याचे चौकींत ठेविला होता त्याणें इब्रामखान यास आपली बहीण देऊं केली. त्या लालचीनें बावाखान

खमस समानीन मया व अलफ रजब २५

---

( 934 ) Abdullá wd. Shek Nathu, Jamátdár, had stood surety for certain Berads of Nándgir. The Berads having absconded, Abdullá was sent to prison.

A. D. 1782-83.

( 935 ) Bál Joshi Chándorkar went and communicated with Trimbakrao Náráyaṇ, while the latter was in custody. He was therefore sent to prison.

A. D. 1784-85.

( 936 ) Báwákhán of Chàwaṇe in Tarf Tungártan, having committed robberies in Táluká Karnáḷà, was sent to prison in fort Karnáḷá. While there, he offered to give his sister in marriage to Ibrámkháṇ, the guard on duty, and Ibrám, therefore

A. D. 1784-85.

याचे पायांतील बेडी तोडून पाहाऱ्यांतून काढून दिला, तो दुसरे चौकीस सांपडला; त्याजवरून बावाखान व इब्रामखान यांस अटकेस ठेविले आहेत. त्यांचे पारिपत्याविशीं आज्ञा जाली पाहिजे, ह्मणोन तुह्मी विनंती केली; त्याजवरून हरदूजणांचा एकेक हात व एकेक पाय तोडावयाची आज्ञा केली असे, तरी सदरीलप्रमाणें तोडून टाकणें ह्मणोन रामराव अनंत तालुके मजकूर यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

९३७ ( ९५७ )–विठोजी बिन सुलतानजी सातकर, पाटील निम्मे कसबे खेड, तर्फ मजकूर, प्रांत जुन्नर, हा पेशजी दारू प्याला ते समई, याजपासून दहा हजार रुपये गुन्हेगारी घ्यावी, परंतु बाळोजी पलांडे यांणीं रदबदल केली कीं, हा अन्याय यास माफ करावा, या उपरी दारू पिणार नाहीं, पुढें अंतर पडेल तर दहा हजार रुपये गुन्हेगारीचे याजपासून घ्यावे. असे असतां, हल्लीं पुण्यांत दारू प्याला, तो कोतवालीकडे सांपडला, याजकरितां गुन्हेगारी सरकारांत घ्यावयाची, त्यास ऐवज मिळत नाहीं ह्मणतो, यास्तव विठोजी मजकूर याची निम्मे पाटिलकी, व वतन संबंधें इनाम व हकदक, मानपान, व इनाम जमीन चाहुर एक आहे, त्याची जप्ती करून, तुह्मांस कमावीस सांगितली असे, तरी सदरीलप्रमाणें जप्ती करून, इमानें इतबारें वर्तोन, अंमल चौकशीनें करून, ऐवज आकारेल त्यापैकीं तुमचा रोजमरा दुमाही रुपये १५ पंधरा छ. १० जिल्कादचा हुजूर दिल्हा आहे. पुढें दुमाही भरल्यावर तेथें जप्तीचे कामास असाल तोंपावेतों रोजमरे घेत जाणें. मजूरा पडतील. बाकी ऐवज राहील तो सरकारांत पावता करून जाब घेणें ह्मणोन, बाळाजी चिंतामण कारकून शिलेदार यांचे नांवें. सनद १.

समान समानीन मया व अलफ जिल्काद २४

मोकदम निम्मे, चौगुले, व शेट्ये, व रयान, कसबे मजकूर यांचे नांवें सनद कीं, मशारनिल्हेसी रुजू होऊन, वतनसंबंधें वगैरे सुदामत चालत आल्याप्रमाणें देत जाणें ह्मणोन. सनद १.

---

removed his fetters and set him free. He was arrested however by the outer guard. Ibrám and Báwákhán were sentenced each to have one hand and one leg cut off.

( 937 ) Vithoji bin Sultánji Sátkar, the owner of half the Patilki watan of kasbe Khed was fined Rs. 10,000 for drinking liquor. At the intercession of Bálàji Palánde, he was pardoned and the fine was remitted on his agreeing to abstain from drinking in future, and to pay the above amount of fine in case he drank. He was subsequently found drunk by the police in Poona. The above fine was therefore imposed and as he was unable to pay it, his watan was attached.

A. D. 1787-88.

सर्वोत्तम शंकर यांचे नांवें चिटणिसी पत्र कीं जप्तीचें कामकाज मशारनिल्हेचे हातें घेत जाणें ह्मणोन. पत्र १.

एकूण तीन पत्रें, रसानगी यादी.

विठोजी मजकूर याजपासून गुन्हेगारी ध्यावयाचा ठराव जाहला, याजकरितां सनदांवर तेरखा होऊन रवाना जाहल्या नाहीं सबब दूर.

९३८ ( १०१६ )—कसबे नाशिक येथें ब्राह्मण मद्यपान करितात, त्यांची चौकशी करावयाविशीं तुह्मांस आज्ञा जाहली आहे. त्यास धर्माधिकारी ब्राह्मणास मिळून मलई करितात, सबब धर्माधिकारीपण जप्त करावयाची आज्ञा केली असे, तरी कसबे मजकूर येथील धर्माधिकारीपण जप्त करून, ऐवज होईल तो सरसुभाचे हिशेबीं जमा करीत जाणें ह्मणोन, सर्वोत्तम शंकर यांचे नांवें, सनद १.

इहिदे तिसैन मया व अलफ जिल्हेज १९

रसानगी, त्रिंबकराव नारायण परचुरे कारकून निसबत दफ्तर.

९३९ ( १०१७ )—कसबे नाशिक येथील ब्राह्मणांची चौकशी करावयाविशीं सर्वोत्तम शंकर यांस आज्ञा केली आहे, तरी मशारनिल्हे चौकशी करून ब्राह्मण वगैरे अटकेस ठेवावयाबद्दल तुह्मांकडे पाठवितील. त्यांस पक्क्यां बंदोबस्तानें किल्ले हाये येथें अटकेस ठेऊन पोटास शेर देत जाणें ह्मणोन. सनदा.

इहिदे तिसैन मया व अलफ जिल्हेज १९

१ बाजीराव अपाजी, तालुके धोडप, यांचे नांवें.

१ बाळकृष्ण केशव, तालुके पटा, यांचे नांवें.

१ रामचंद्र कृष्ण, तालुके मुल्हेर, यांचे नांवें.

३

एकूण तीन सनदा. रसानगी, त्रिंबकराव नारायण परचुरे कारकून निसबत दफ्तर.

(938) It was reported that the Brahmans of Násik drank liquor. Sarwóttam Shankar was deputed to inquire into the matter. He was authorized to attach the watan of the chief priests of the town, as they were implicated in the above offence.

A. D. 1790-91.

(939) Orders were issued to the several forts to receive any Brahmans sent for custody by Sarwottam Shankar in connection with the inquiry into liquor drinking.

A. D. 1790-91.

९४० ( १०३४ )—मौजे गांवखडी, तर्फ लांजें, तालुके विजेदुर्ग, येथील महार यांणीं मौजे कशेळी, तालुके मजकूर, येथील कुळकर्णी याचा बैल रानांत दगडांनीं जिवें मारिला, त्यास कृष्णाजी गोविंद गोरे यांणीं मौजे मजकूरचे महारांस खोड्यांत घालून ठेविले आहेत. ते महार तुह्मांकडे पाठवितील त्यांची चौकशी करून, कुळकर्णी याचा बैल रानांत दगडांनीं जिवें मारिला असल्यास, पक्का मुद्दा पाहून, ज्या महारांनीं मारिला त्यांचें पारिपत्य एक हात व एक पाय याप्रमाणें तोडून सोडून देणें ह्मणोन, गंगाधर गोविंद यांचे नांवें. सनद १.

इहिदे तिसैन मया व अलफ रमजान २०

रसानगी यादी.

९४१ ( १०४० )—परसू बिन जावजी जमदडा निसबत चिमणाजी नीळकंठ कोलटकर, यांणें इंग्रजांचे लोक घाट उतरोन चिपोळणास गेले, ह्मणोन खोटी बातमी येऊन सांगितली, सबब किल्ले चाकण येथें अटकेस ठेवण्यास बरोबर सखाराम विश्वनाथ याजकडील प्यादे देऊन पाठविला असे, तरी किल्ले मजकुरीं पक्के बंदोबस्तानें अटकेस ठेऊन, याजपासून किल्याचे इमारतीचें काम घेऊन, पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन, भगवंतराव नारायण यांचे नांवें सनद १.

इसन्ने तिसैन मया व अलफ सवाल २०

रसानगी, सखाराम विश्वनाथ साने.

## ७ न्यायखातें

## ( ब ) फौजदारी

## ( अ ) गुन्हे

### १४ ज्या गुन्ह्यांचीं नांवें नाहींत असे गुन्हे.

९४२ ( ३२५ )—बाबूराव कृष्ण यांस सनद कीं, खानाजाद, किल्ले सातारा येथें आला

( 940 ) A Mahár of Gáwakhadi in Tarf Lánje in Táluká Vijaydurga stoned a bullock of a kulkarni to death. The officer of the Táluká was directed to cut off one hand and one foot of the Mahár, if the offence was proved.

A. D. 1790-91.

( 941 ) Parsu bin Jáwji Jamdadá serving under Chimnáji Nilkanth Kólatkar gave false information that the English army had crossed the ghaut and gone to Chiplun. He was therefore sent to prison.

A. D. 1791-92.

( 14 ) Offences not specified.

( 942 ) It was ordered that Khánájád, a prisoner in Sátárá fort who after inquiry had been found to be a rascal should be beheaded.

A. D. 1776-77.

सबा सबैन मया व अलफ साबान १३ — आहे, त्याची चौकशी तुह्मी केलीत, त्यास तो लबाड असें ठरण्यांत आलें आहे, सबब त्याचें डोकें मारावयाची आज्ञा केली असे, तरी यास मारून टाकणें; आणि हुजूर लिहून पाठवणें ह्मणोन. सनद १.

९४३ ( ७०० )—गोपाळ बल्लाळ याचे नांवें सनद कीं, तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहालें. तालुके कावनई, येथें बंदीवान भवानजी पाटील पाडेकर, व सदाशिव मोऱ्या, व निंबाजी गतवीर आहेत; त्यांचे पारिपत्याविशीं पूर्वी विनंती लिहिली होती. उतर आलें कीं, जामीन घेऊन सोडून देणें. त्यास यांजला कोणी जामीन रहात नाहीं, व दंड द्यावयास पदरीं एक पैसा नाहीं, पारिपत्य केल्यावांचून सोडल्यास पुन्हां उपद्रव करावयास चुकणार नाहीं, यांचें पारिपत्य असावें, ह्मणोन लिहिलें, त्यास सदरील तीन असामींचें पारिपत्य करावयाची आज्ञा तुम्हांस केली असे, तरी अपराधानुरूप पारिपत्य करणें ह्मणोन, मशारनिल्हेचे नांवें. सनद १.

इसन्ने समानीन मया व अलफ जमादिलाखर २७

परवानगी रूबरू.

## ७ न्यायखातें

### ( क ) वेड

९४४ ( ९२३ )—मानसिंग रागडा शिंदा पोर्गा यास वेड लागलें, सबब तालुके शिवनेर येथें अटकेस ठेवावयाबद्दल शेख बाळा वलद शेख बहुदीन, व महमद कासम वलद शेख रुस्तुम दिंमत शेख रजब निसबत हुजूर हशम, यांजबराबर पाठविला आहे, तरी यास तालुके मजकूरचे हरएक किल्यावर अटकेस ठेऊन, पोटास शिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन, बाळाजी महादेव, तालुके मजकूर, यांचे नांवें. सनद १.

सीत समानीन मया व अलफ जमादिलाखर २७

रसानगी यादी.

( 943 ) The officer of Táluká Káwanai solicited orders regarding the punishment of three prisoners in the fort. He was directed to take sureties from them and to set them at liberty. He represented that the prisoners were unable to furnish security and that they were without even a pice and recommended that some punishment be inflicted on them. He was directed to punish the men according to their deserts.

A. D. 1781-82.

( c ) Insanity.

( 944 ) Mánsing Rágdá Scindá having become insane was sent to Táluká Shivner for confinement.

A. D. 1785-86.

# ७ न्यायखातें

## ( ड ) न्यायखात्यांतील कामगार

९४५ ( १२४ )—निंबाजी विठ्ठल व निंबाजी अनंत कुळकर्णी मौजे चिंचोडी परगणे नेवासें यांणीं ब्ऱ्हाणपूरचे मुक्कामीं हुजूर विदित केलें कीं, शिवाजी विठ्ठल व नारो विठ्ठल यांचे वडील आमच्या वडिलीं कुळकर्णावर गुमस्ते ठेविले होते त्यांणीं एकजदी भाऊ निमे कुळकर्णाचे विभागी ह्मणोन कलह मांडिला. त्याबद्दल या दोघांची व आमची मनसुफी नारो बाबाजी यांजपाशीं पडली; त्यांणीं चांगला शोध न करितां, वाद्यास निवाडपत्र करून दिल्हें, ह्मणोन आह्मीं हुजूर फिर्याद होऊन, वेदशास्त्रसंपन्न राजश्री रामशास्त्री बाबांकडे मनसुफी आणिली, त्यांणीं निर्वाह केला नाहीं. मी, निंबाजी विठ्ठल हिंदुस्थानांत चाकरीस गेलों. मागें नारो बाबाजीनीं पहिलें मनास आणिलें, तें हुजूर समजाऊन निमे वतनाचीं पत्रें वाद्यास हुजूरचीं करून दिल्हीं, त्याप्रमाणें निम्में वतन वादी अनभवितात. आमचें ह्मणोन निम्मे वतन ठेविलें तें सरकारांतच आहे; आम्हीं घेतलें नाहीं, त्यास वाद्यास गुमस्ता म्हटलेला कागद कानगोपाशीं आहे, व वाद्या दुसरे गावीं कुळकर्णाची गुमस्तगिरी करीत असोन, मालधणी ह्मणोन बीकलम घातलें आहे. आमचे वडिलीं दुसरे गुमस्ते ठेविले, त्यांणीं कुळकर्णी ह्मणोन या गावीं बीकलम लिहिलें आहे, व आमचे वडीलांचे हातचा कागद, वाद्यास गुमस्ता ह्मटलेला, देशपांडे परगणा मजकूर यांजपाशीं आहे, त्यास वतनाची जफ्ती करून सदरहू चार कागद प्राचीन आहेत, ते आह्मीं हजीर करितों, ते पाहून पांढरीच्या साक्षा नारो बाबाजीनीं घेतल्या, त्या साक्षीदारांस पुरसीस करून निवाडा केला पाहिजे, ह्मणोन विनंती करून कानगो जवळील कागदाची तालीक कानगोचे मोहरेनसी दाखविलीत; त्याजवरून महिपत नारायण व अंदो शिवदेव यांस आणून त्याजवळ नारो बाबाजींचे विद्यमानचें सरकारचें पत्र होतें तें पाहिलें, तों त्यांत यांस सदरहू प्राचीन चोहों कागदांचा अर्थ नाहीं, त्याजवरून हे सनद सादर केली असे, तरी निंबाजी विठ्ठल व निंबाजी अनंत याजपासून वर्तणुकेचा, व सदरहू प्राचीन चार कागद अमुक मुदतीस दाखवावयाचा जामीन, मातबर गांवचा मोकदम, सरळ, चांगला, घेऊन दरोबस्त कुळकर्णाचें वतनाची जफ्ती करून, पेशजीं तीन सालें त्याजकडे चाललीं त्यांचें हक उत्पन्न पूर्ववतप्रमाणें सरकारांत घेऊन वाडे कुळकर्णाचे देखील पूर्ववत अनामत करून हरदू वाद्यांस कागदपत्रसुद्धां, पुणियास, मनसुफीस शास्त्रीबाबांकडे रवाना करणें. ते बर-

खमस सबैन मया व अलफ जिल्काद २१

---

( d ) Judicial officers.

**( 945 ) A** watan dispute was sent for disposal to Rám Shástri.

A. D. 1774-75.

हक मनसुफी करून विल्हेस लावितील. दोन्ही वाद्यांचीं घरें गांवांत वाडींत हल्लीं नांदतीं घरें असतील तीं भाऊबंदसुद्धां जफ्तीखाले ठेवणें. हरदू वादी कुळकर्णी यांणीं नवीं घरें मिळऊन रहावें; याप्रमाणें करणें ह्मणोन, नारो आपाजी यांचे नांवें. सनद १.

येविशीं रामशास्त्री यांस कीं, हरदू कुळकर्णी यांचे वतनाची जफ्ती करून जामीन घेऊन, कागदपत्रसुद्धां तुह्मांकडे पाठवितील. त्यांचें वर्तमान मनास आणून वाजवी असेल त्याप्रमाणें विल्हेस लावावें ह्मणोन. १.

२

रसानगी यादी.

९४६ ( ३०३ )–आनंदराव काशी, यांचे नांवें सनद कीं, शहर पुणें येथील कोतवाली धोंडो बाबाजी यांजकडे होती, ते दूर करून सालमजकुरापासून तुम्हांस सांगितली असे, तरी इमानें इतबारें वर्तोन, अंमल चौकशीनें करून, शहरचा चौकी पाहरा याचा कोतवाली संबंधाचा बंदोबस्त चांगला राखोन, रयतेवर जुलूम जाजती न करितां वाजवीचे रुईनें अंमल करून रयेत अबाद राखणें येविशीं कोतवाली संबंधें.

सबा सबैन
मया व अलफ
जमादिलावल २९

कलमें.

हल्लीं तुम्हांकडे कोतवालीसंबंधें रसदेचा ऐवज एकुणीस हजार एक रुपया करार केला आहे, त्याचा भरणा हुजूर करून जाब घेणें. या भरण्याचा ऐवज, व मागील तुमचे कारकीर्दीचे हिशेबाची मखलाशी होऊन ऐवज ठरेल त्यापैकीं, धोंडो बाबाजी याचे कारकीर्दींत कोतवालीचे ऐवजापैकीं रदकर्ज पावला असेल तो वजा करून, बाकी राहील तो, धोंडो बाबाजी याचे हिशेबाची मखलासी होऊन ऐवज देणें निघेल तो मिळोन, कोतवाली संबंधें उत्पन्न होईल त्यांत नेमणुकी खर्च वजा करून बाकी ऐवज रदकर्जी घेत जाणें. कलम १.

महाल मजकूर शिबंदीची वगैरे नेमणूक करून दिल्ही जाईल. कलम १.

रसदेस व्याज, दरमहा दरसदे रुपया एकोत्रा शिरस्तेप्रमाणें करार केलें असे. कलम १.

हल्लीं रसद तुम्हांपासून घेतली आहे, त्याहून जाजती रसद दुसरा पहिल्याच सालांत देऊं लागल्यास घालमेल करणें जाहली तरी, रसदेचा वगैरे खर्च वाजवीचे रुईनें नव्याकडून देविला जाईल. एकसाल गुदरल्यानंतर घालमेल जाल्यास रसदेचे ऐवजपैकीं मखलाशीमुळें देणें ठरेल तो ऐवज नव्या कोतवालाकडून देविला जाईल. कलम १.

---

( 946 ) The office of Kótwál of Poona City was conferred on Anandrao Káshi. He was directed to patrol the city efficiently and to do the other duties honestly and justly and without oppressing the ryots. The following subsidiary instructions were issued to him:—

A. D. 1776-77.

दरकदारांपासून कामकाज मुरळीत घेत जाणें. कलम १.

दरमहाचे दरमहा कोतवाली संबंधें ऐवज जमा होत जाईल त्यांत नेमणूक दरमहा शिबंदीचा वगैरे खर्च वजा करून, बाकी ऐवज रदकर्ज खर्च ल्याहावा, दरकदारांचीं वेतनें अखेरसालीं द्यावीं. कलम १.

सन खमस सबैनांत चाळीस हजार रुपये रसद सरकारांत तुम्हांपासून घेतली, पुढें कोतवाली काढून धोंडो बाबाजी यास सांगितली, त्यास तुमचे सन खमस सबैनचे हिसेबाची मखलाशी होऊन बाकी ऐवज देणें निघेल त्यापैकीं, धोंडो बाबाजी यांजकडून तुमचे सावकारास पावती जाहली असेल तीं वजा होऊन बाकी सावकाराचा ऐवज देणें राहील तो, हल्लीं तुम्हांपासून एकोणीस हजार एक रुपया रसद घेतली आहे, ही फिटल्यावर पुढें कोतवालीचे ऐवजीं सावकारास द्यावा. बोभाट न यावा. कलम १.

गंगाधर शामजी यास अमीनीची असामी हल्लीं कोतवालीकडे नवा करार करून दिल्ही असे, याजपासून कुल कामकाज अमीनीचें ध्यावें, साऱ्या दरकदारांनीं कमाविसीचें कलम पांच हजार रुपये पर्यंत होईल, तें कोतवालीकडे जमा धरून रदकर्जी घेणें. जाजती कलम पांच हजार रुपयांवर जाहल्यास पोत्यास भरणा करणें. कलम १.

धोंडो बाबाजी याचे कारकीर्दीचे हिशेबाची मखलासी होऊन ऐवज देणें ठरेल त्यांत अंतस्ताचा ऐवज वजा करून बाकी देणें राहील तो एका वर्षानें अंमलाचे पैवस्तगिरीपासून हमीदारानें द्यावा. कलम १.

हल्लीं एकोणीस हजार एक रुपया रसद सरकारांत घेतली आहे, हा ऐवज फिटल्यावर तुमचा ऐवज मागील रसदेपैकीं मखलासीमुळें ठरेल तो, व दरकदारांचा रसदी ऐवज हिस्सेरशीदप्रमाणें कोतवालीचे ऐवजीं देत जाणें. कलम १.

पांडुरंग कृष्ण सर अमीन हुजुरून नेमून दिल्हे आहेत, त्यांचे विद्यमानें कुल कामकाज कोतवालीचें करीत जाणें. इतल्याशिवाय केल्यास मजुरा पडणार नाहीं. कलम १.

रसद फिटे तोंपर्यंत कोतवालीकडील ऐवज सरकारांत घेऊं नये. अंमलाची घालमेल होणार नाहीं. कलम १.

(1) He should advance to Government a loan of Rupees 19001 at an interest of Rupee one *per cent per mensem:*

(2) the income derived from the office should, after deducting sanctioned expenditure, be taken in liquidation of the loan. in case the income exceeded by Rs. 5000, the excess should be remitted to Government:

(3) the duties should be carried on, under the supervision of **Pándurang Krishna Sir Amin, appointed by Government;**

चावडीस नेहमीं येऊन आपलें दरकाचें काम करावें. कामाचा खोळंबा होऊं नये. जाहाल्यास अमीनानें दरकदार नसेल त्याचें निशाण करून काम चालवावें. कलम १.

धोंडो बाबाजी याचे कारकीर्दींतील सरकारसनदेशिवाय कारकून व प्यादे असतील, त्यास तुमचे उपयोगीं पडतील ते ठेवणें; तुम्हांस उपयोगीं नसतील ते दूर करणें. त्यांचे ऐवजीं नवे नेमणुकेप्रमाणें ठेवणें. कलम १.

शहरांतील कजीया, भांडण, न्याय मनसुबी, असेल ती तुम्हीं वाजवी मनास आणून फडशे करणें; आणि हरखी गुन्हेगारी साधेल ती घेऊन हिशेबीं जमा करणें. कलम १.

एकूण पंधरा कलमें करार करून दिल्हीं असेत, तरी सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें म्हणोन. सनद १.

रसानगी यादी.

९४७ ( ३७१ ) पांडुरंग त्रिंबक कमावीसदार, मौजे पिंपळस, तर्फ कोऱ्हाळें, दिंमत धोंडो मल्हार, यांस पत्र कीं, रामाजी महादेव मोकदम मौजे यांणीं हुजूर विदित केलें कीं, मौजे मजकुरीं गांवांत कोणास घर घेणें, अगर कोणाची भिंत, व पनाळ, व मोरी, व जागा अधिकउणी, याचा काजिया असेल तो पेशजींपासून मनास आणावयाचा आह्मांकडे चालत आहे, त्यास हल्लीं कमावीसदार जाग्याजुग्याचे वगैरे कितेक खटले मनास आणितात, आम्हांस किमपि कळों देत नाहीं, व गांवखर्चाची नेमणूक सरकारांतून आहे, व रयतीपासोन दाणे खर्चाचे घेतो, त्याचा गावखर्च आमचा आह्मीं पूर्वींपासून करितों, त्याप्रमाणें कमावीसदार करूं देत नाहीं; व भगवंत रामाजी वट्टकर गावांत चाळेकुचाळे करितात, व यांजकडे बाकी आह्मा-

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज ११

---

( 4 ) all the Darakdárs should always attend the cháwdi for the prompt transaction of their respective duties: in case any one failed to attend, the Amin Gangádhar Shámji should perform his duties;

( 5 ) all disputes arising in the city should be decided by the Kòtwál and fines ( from those against whom the decision was passed ) and presents ( from those in whose favour the decision was passed ) should be levied.

( 947 ) Rámáji Mahádeo Mokádam of Pimpalas in Tarf Korhále, and former Kamávisdár of the village represented that all disputes regarding houses, walls, easements, and sites in the village had till then been decided by him and that Pándurang

A. D. 1776-77.

कडे कमावीस मौजे मजकूरची होती ते वेळेची आहे, त्याजविशीं सालगुदस्तां ताकीदपत्रें नेलीं, परंतु वसूल देत नाहींत. येविशीं ताकीद जाली पाहिजे, ह्मणोन; त्याजवरून हें पत्र सादर केलें असें, तरी गावांत जागाजुगा, व घर देणें घेणें, व कजीया मनास आणणें, व गांवखर्च नेमणुकेप्रमाणें तो पेशजीपासून रामाजी महादेव करीत आले आहेत, त्याप्रमाणें यांचे हे करितील; तुह्मीं नवीन दिकत करितां ते न करणें. तुह्मीं जमाबंदी करून वसूल घेत जाणें, वरकड पेशजीप्रमाणें यांचे हे करितील. भगवंत रामाजी यांजकडे बाकीचा ऐवज येणें, त्यास ताकीद करून व्याजसुद्धां वसूल करून यांजकडे देणें ह्मणोन. पत्र १.

चिटणीसी.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

९४८ ( ३९९ )—शहर पुणें येथील कोतवाली तुम्हांकडे सांगितली होती, ते दूर करून सालमजकुरीं घासीराम सावळदास यांस सांगितली असे, तरी पेठांतील चावड्या जकीरासुद्धां यांचे हवालीं करणें. मशारनिल्हे अंमल करितील. तुम्हीं दखलगिरी न करणें म्हणोन, आनंदराव काशी यांचे नांवें रसानगी यादी छ. १६ जिल्हेज. सनद १.

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २९

९४९ ( ७३८ )—बाजी बल्लाळ यांस तालुके अंजणवेल येथील न्यायाधिशी सालमजकूर अव्वल सालापासून सांगोन तैनात सालीना खेरीज शिरस्ता रुपये १०० शंभर रुपये करार करून देऊन हे सनद सादर केली असे, तरी मशारनिल्हेपासून तालुके मजकूर येथील न्यायाधिशीचें कामकाज घेऊन सदरीलप्रमाणें तैनात पाववीत जाणें. यांचे हाताखालीं मनसुबीचे कामकाजास प्यादे असामी दोन देविले असेत, तरी तालुके मजकूरचे शिबंदीपैकीं नेमून देणें म्हणोन, त्रिंबक कृष्ण यांचे नांवें. सनद १.

इसन्ने समानीन मया व अलफ सफर ३

रसानगी यादी.

---

Trimbak, the present Kamâvisdár, was interfering with his practice and had decided some such disputes himself. Pándurang Trimbak was directed to allow the old practice to continue.

( 948 ) The office of Kotwál of Poona City was taken from Anandrao Káshi and conferred on Ghásirám Sáwaḷdás.

A. D. 1776-77.

( 949 ) Báji Ballál was appointed to the office of Judge (Nyáyádhish) of Táluká Anjanwel on a salary of Rs. 100 a year besides the usual grants, and 2 peons were placed at his disposal.

A. D. 1781-82.

९५० ( ७९० )—तालुके अंजणवेल येथील न्यायाधिशी सालगुदस्त बाजी बल्लाळ यांस सांगोन सनद सादर जाहाली असतां, न्यायाधिशाचें काम मशार निल्हेचे हातें सुरळीत होत नाहीं ह्मणोन हुजूर विदित जाहालें. त्यास न्यायाधिशाचें काम काज येणेंप्रमाणें घेणें. कलमें.

सलास समानीन मया व अलफ रबिलाखर २७

मुलकी कजिये वतनाचे वगैरे येतील त्यांचें वर्तमान तुह्मीं आईकोन, मनास आणावयास न्यायाधिशाकडे सांगावें. त्यांणीं हरदू जणांचे कतबे करीने, व पुरसीसा व जामीन, व सख्या घेऊन, पांच ग्रहस्थ मेळऊन, वाजवी मनास आणून, तुह्मांस समजाऊन फडशा करावा. कोणी धटाईस आला तर तुह्मीं निक्षून ताकीद करणें. कोणाचा कोणीं पक्ष करूं नये. सरकार कामाविशीं प्यादे, व पंचाईतीस चार जमीदार परनिष्ठ, न्यायप्रकरणीं उपयोगीं असतील ते नेमून देत जाणें. न्याय वतनाचे वगैरे फार, तर्फ मजकुरीं तटले आहेत, त्यांचे निवाडे करून वाजवीचे रीतीनें फडशा करून हुजूर समजवावें, तेथें कोणी धटाईस आला तर, जाहला मजकूर हुजूर समजावणें. कलम १.

न्यायाधिशीसंबंधें कागदपत्र होतील ते, मशारनिल्हेनीं आपले निसबतीस ठेऊन कजीया विल्हेस लागलीयावर कागदाचें फेरिस्त घालून, सरकाराचे दप्तरांत ठेवीत जावें, त्याची खबरदारी वरचेवर मशारनिल्हेनीं करीत जावी. कलम १.

कजिया संबंधेंची चिठी मसाला करणें त्याची याद यांजपासोन ल्याहावी, याजवर मखलाशी होऊन चिठी होत जावी. कलम १.

कजियासंबंधें वादीयास आणणें, व निरोप देणें, व नेमोतर घेणें, ते न्यायाधिशीकडे घेववून निरोप देत जाणें. कलम १.

वतन कोणाचें जप्त करणें, व मोकळीक करणें, यांचे विद्यमानें वर्तमान मनास आणून वाजवी असल्यास करीत जाणें. कलम १.

( 950 ) Bâji Ballâḷ had been appointed Judge at Táluká Anjanwel, and Government was informed that the Táluká officer, Trimbak Krishṇa, did not allow Bâji to do the duties of his office. The following instructions were therefore issued to the Táluká officer:—The Táluká officer should receive all civil disputes relating to watan &c. and hand them over to the Judge for adjudication. The Judge should record the statements of the parties and the evidence of witnesses, and should decide with the assistance of five independent persons and after explaining the matter to the Táluká officer. In case any one objected to submit to the Judge's authority, the Táluká officer should issue a strict warning to him. Partiality should not be shown to any person. The Pancháyat should consist of 4 Jamindárs who should be

A. D. 1782-83.

एकूण कलमें पांच. सदरहू लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें म्हणोन, त्रिंबक कृष्ण यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

९५१ ( ८३२ )–सटवोजी गावडे पागा यांचे नांवें सनद कीं, तुम्हीं लोकांचे कजिये कफावती मनास आणून फडशे करितां. त्यामध्यें हरकी गुन्हेगारी, व कर्जचौथाई वगैरे कमाविशीबद्दल मागील ऐवज जमा जाहला असेल तो, व पुढें जमा होईल तो, तुम्हांकडील पागेचे हिशेबीं जमा करीत जाणें म्हणोन. सनद १.

अर्बा समानीन
मया व अलफ
मोहरम १३

सदरील अन्वयें नानाजी रघुनाथ कारकून, दिंमत मशारनिल्हे यांस कीं, तुम्हीं चौकशीनें कमाविसीचा ऐवज जमा होईल त्याचा हिशेब राखून, पागेचे हिशेबीं जमा करवीत जाणें म्हणून. सनद १.

२

रसानगी याद.

९५२ ( ९७४ )–शहर जुन्नर येथील कोतवालीची असामी रामचंद्र शिवाजी यांजकडे आहे. त्यास वेतनाचा ऐवज चार पांच सालां राहिला आहे, व यांचे कारकुनाचे हातून कोतवालीचें कामकाज तुम्हीं घेत नाहीं, म्हणोन मशारनिल्हेनीं हुजूर विदित केलें; त्याजवरून हें पत्र तुम्हांस सादर केलें असे, तरी कोतवालीचे असामीचें वेतन मागील सालचें राहिलें असेल तें देणें; व पुढें वरकड दरकदारांस पावेल त्याप्रमाणें यांस देत जाणें, व कोतवालीचें कामकाज मशारनिल्हेकडील कारकुनाचे हातून सुदामत चालत आल्याप्रमाणें घेत जाणें,

तिसा समानीन
मया व अलफ
जिल्हेज ६

---

men of pure character and conversant with law. The watan and other cases pending disposal should be decided in the right manner and the decision should be communicated to the Huzur. Papers relating to the adjudication of cases should remain with the Judge and should be sent to Government, together with a list after the decision had been passed.

( 951 ) Satwoji Gáwde of the cavalry used to receive complaints and decide them. He levied fines and presents from sucessful litigants and fees for recovering details. He was directed to credit the sums so levied to Government.

A. D. 1783-84.

( 952 ) The Office of Kotwál in the town of Junnar belonged to

फिरोन बोभाटा येऊं न देणें म्हणोन, बाळाजी महादेव तालुके शिवनेर यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

## ७ न्यायखातें.

### ( इ ) पोलीस.

९५३ ( १४ )–तालुके विजयदुर्ग येथें गोपाळजी आंगऱ्या याणें चोर सोबतीस मेळऊन, प्रांतांत चोरी करितो, व घरें जाळितो, व रयतीपासून पैका घेतो, व वाणी उदमी जिन्नस भरून वर घांटें आणितात त्यांस उपद्रव करितो, ह्मणून हुजूर विदित जालें; त्याजवरून त्याचे बंदोबस्ताचीं कलमें येणेंप्रमाणें.

अर्बा सबैन मया व अलफ रमजान ३०

हुजुरून बंदोबस्ताबद्दल असामी १०० ऐकशें पाठविल्या आहेत, त्यांस रोजमरा नेमणूक जावत्याप्रमाणें लोक तेथें राहतील तोंपर्यंत तालुके मजकूरपैकीं देत जाणें येणेंप्रमाणें. कलम १.

जदीद असामी १०० एकशें दर असामीस आदा सरसालांत पन्नास रुपये पडत असा शेरा करून ठेऊन चोरांचा बंदोबस्त करणें. महिना दोन महिने ठेऊन बंदोबस्त जालियावर पुढें दूर करणें. कलम १.

आंगऱ्या मजकूर याजकडील चोर धरून आणून, साहेब काम करील त्यास बाक्षिस कार्याकारण पाहून देणें. मजुरा पडेल. कलम १.

A. D. 1788-89. Rámchandra Shiváji. Báḷáji Mahádev of Shivner was directed to pay him the emoluments of his office and to send his kárkun to do duty under him.

( E ) Police.

( 953 ) Government having been informed that Gopálji Ângre, with his accomplices, was committing robberies, burning houses and extorting money from the ryots in Tàluká Vijaydurga, and harassing the traders carrying merchandise above the Ghàts, the following arrangements were made:-

A. D. 1773-74.

( 1 ) One hundred men were sent from the Huzur and one hundred more were ordered to be entertained for a month or two, to put down the robbers;

येणेंप्रमाणें तीन कलमें करार करून दिल्हीं असेत, तरी सदरीलप्रमाणें वर्तणूक करणें म्हणोन, महादाजी रघुनाथ यांचे नांवें. छ. ९ रमजान. सनद १.

रसानगी यादी.

९५४ ( ५६ )—कसबे सुपें येथें चोरांचा उपद्रव आहे, त्यास रखवालीस बेरड करार करून दिल्हे, त्यास दरमहा. रुपये.

अर्बा सबैन मया व अलफ रबिलावल २२

| | | |
|---|---|---|
| १० | नाईक | १ |
| १३॥ | बेरड असामी | ३ |
| २३॥ | | ४ |

एकूण साडे तेवीस रुपये चार असामींस दरमहा देविले असेत, तरी गांवखर्चाखेरीज पटी खानेसुमारी देखील ब्राह्मण याप्रमाणें करून, बेरड मजकूर यांचा मुशाहिरा सरकार ऐवजाशिवाय देऊन गांवची रखवाली करवणें म्हणोन, आनंदराव त्रिंबक सुभेदार, परगणे मजकूर, यांचे नांवें छ. २६ सफर. सनद १.

रसानगी यादी.

९५५ ( ११४ )—कसबे नाशिक, परगणे मजकूर, येथील फौजदारीची असामी अंबादास गिरमाजी यांस सांगोन, वेतन सालीना रुपये १५० दीडशें करार करून पाठविले आहेत, तरी त्यांचे निजबतीस महालाचे शिबंदीपैकीं प्यादे देऊन, कसबे मजकूर येथील फौजदारीचें कामकाज यांचे हातें घेऊन, सदरहू दीडशें रुपये सालीना पाठवित जाणें म्हणोन, विसाजी हरी कमाविसदार, परगणे मजकूर यांस. सनद १.

खमस सबैन मया व अलफ सवाल १७

रसानगी यादी.

( 2 ) sanction was accorded to the payment of rewards for the apprehension of the robbers.

( 954 ) The village Supá being infested by robbers, one Náik ( pay Rs. 10 a month ) and 3 Berads ( pay Rs. 13-8 a month for the three ) were permitted to be entertained for watching the village. The amount of their pay was ordered to be recovered by a special rate imposed upon the residents (Bráhmins included.)

A. D. 1773-74.

( 955 ) The Office of Fauzdár of Kasbe Nàsik was given to Ambàdás Girmáji on a salary of Rupees 150 per annum.

A. D. 1774-75.

## मुतालिक ह्यांचे रोजनिशीपैकीं.

९५६ ( ३ ) श्रीसिद्धेश्वर महादेव, वास्तव्य कसबे पैठण, येथें देवालयांत श्रीचे पुजेचीं उपकर्णें, व वस्त्रें, व पूजेचें साहित्य नेहेमीं असतें, व देवालयांत रात्रीं गरीब वाटसरू वगैरे राहतात; याजकरितां देवालयाजवळ रात्रीस चौकी पाहारा नेहमीं ठेवावयाचा करार करून हे सनद तुम्हांस सादर केली असे, तरी परगणे मजकूरचे नेमणूकचे प्याद्यांपैकीं दोन मराठे व दोन महार एकूण चार असामी श्रीचे देवालयाजवळ चौकीस रात्रीं दररोज देऊन चौकी पाहारा करवीत जाणें म्हणोन, कमाविसदार वर्तमान, व भावी परगणे पैठण यांस. सनद १.

खमस सबैन मया व अलफ रमजान २२

रसानगी यादी.

९५७ ( २१९ ) क्षेत्र पंढरपूर येथें चोरांचा उपद्रव होतो, सबब तेथील रखवालीस सनदी प्यादे असामी २५ पंचवीस ठेवावयाची तुम्हांस आज्ञा केली असे, तरी पंचवीस प्यादे चांगले पाहून दीड महिना ठेऊन क्षेत्र मजकूर येथील चोरांचा बंदोबस्त करणें. क्षेत्र मजकूर येथील ऐवजीं तुम्हांस मजुरा पडेल ह्मणोन, चिंतो रामचंद्र कमाविसदार, क्षेत्र मजकूर, दिंमत परशराम रामचंद्र यांचे नांवें. सनद १.

खमस सबैन मया व अलफ जमादिलाखर २८

परवानगी रूबरू.

९५८ ( ४९५ )–कृष्णरांव अनंत यांचे नांवें पत्र कीं, शहर सातारा येथील रखवा-

### FROM THE MUTÁLIK'S DIARY.

( 956 ) The Kamávisdár of Paithaṇ was directed to keep a guard consisting of 2 Maráthá peons and 2 Mahárs at night at the temple of Siddheshwar Mahádeo at Paithaṇ to protect the property belonging to the deity as also the poor travellers who stopped at the temple.

A. D. 1774-75.

( 957 ) There being many thieves at Pandharpur, the Kamâvisdár was directed to entertain 25 additional peons and to put down the thefts.

A. D. 1774-75.

( 958 ) Krishṇarao Anant engaged 33 Mángs and Berads to keep watch in the town of Satárá on a salary of Rs. 263 per month and a half. He was directed to levy the amount, which came to Rs. 2104 a year, from merchants and traders and well-to-do people in the town. No contribution was to be levied from the poor. It was ordered that a security bond should be taken from the

A. D. 1777-78.

समान सबैन मया व अलफ रमजान ८ लीस मांग, व बेरड असामी ३३ तेहतीस यांस रोजमरा दीड माही रुपये दोनशेंत्रेसष्ट करून तुह्मीं ठेविले आहेत, त्यास एक रोजमरा शहरांत पटी करून दिल्हात. पुढें रोजमरीयास ऐवज पाहिजे त्याचा आकार सरसालचे रोजमरे आठ एकूण रुपये २१०४ एकविसशें चार होतात, त्यास शहरांत मातबर सावकार, व ग्रहस्थ, व वाणीउदमी मातबर पाहून सदरहू ऐवजाची पटी ठरावून ऐवज वसूल करून बेरडांस देत जाणें. गोरगरीबांवर पटी न करणें ह्मणोन. पत्र. १

शहरांत अगर भवरगावीं चोरी जाल्यास बेरडांनी भरून द्यावी याप्रमाणें त्यांचा कागद लिहून घेऊन पक्का जामीन घ्यावा. याप्रमाणें करून मग पटी करून रोजमरियाचा ऐवज देणें म्हणोन पत्रांत लिहिलें असे.

९५९ ( ५१८ )–बाळाजी गणेश यांस सनद कीं, पिलाजी, व तानाजी ताकपीर, शिलेदार यांस पथकसुद्धां चोरांच्या पारपत्यास तालुके देवगड येथें पाठविले आहेत. स्वार असामी.

समान सबैन मया व अलफ जिल्काद ३०

७ खासे.
२ कारकून.
११६ स्वार.

१२५

एकूण सवाशें असामी रवाना केले आहेत, तरी यांजपासून चाकरी घेत जाणें, यांचे रोजमरीयाची बेगमी हुजूर जिल्हेज अखेरपर्यंत जाली आहे, तुह्मी त्यांची गणती घेऊन हुजूर पाठवणें, आणि गणतीप्रमाणें चाकरी घेत जाणें, पुढें रोजमरा यांस हुजरून पावत जाईल, ह्मणोन, छ. २७ सवाल. सनद १.

परवानगी रूबरू.

९६० ( ७७२ )–पांडुरंग धोंडजी कमाविसदार परगणे नाशिक यांचे नांवें सनद कीं, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. नाशिकांत चोऱ्या होतात, व दरवडे पडतात यांचे बंदोबस्तास हुजूरून लोक पाठवावे ह्मणोन लिहिलें; त्याजवरून गाडदी रोहिले दिंमतहाय. असामी.

सलास समानीन मया व अलफ साबान २७

३१ दिंमत रणबाजखान.
३० दिंमत मीर अबास.

---

Berads promising to make good all property stolen in the town or in its neighbourhood.

( 959 ) Piláji and Tanáji Tákpir Silledár were sent with their detachment of 116 horse to punish robbers in Táluká Dewgad, and their expenses were paid from the Huzur.

A. D. 1777-78.

( 960 ) Thefts and dacoities having occurred in Násik, the Kamávis-

२० दिंमत अबदुलसतार.

२० दिंमत सेरजमालखान.

---

१०१

एकशएक असामी पाठविले असत, तरी यांस नाशिकांत ठेऊन चोऱ्यांचा, व दरवड्यांचा बंदोबस्त चांगला करणें. गाड्यांस पर्जन्य काळानिमित्य राहावेंयास निवारा करून देणें ह्मणोन, मशारनिल्हेचे नांवें. सनद १.

परवानगी रूबरू.

९६१ ( ८२२ )–मौजे करंजगांव, तर्फ नाणेंमावळ, येथें वेदमूर्ती हरभट उपाध्ये यांचे घरीं दरवडा पडला, सबब मौजे मजकुरीं रखवालीस शिपाई देविले असेत, तरी नेमून देऊन रुजू दोन महिनेंपर्यंत तेथें ठेवणें म्हणोन. सनदा.

अर्बा समानीन मया व अलफ. सवाल ५

१ तालुके राजमाची, निसबत रामराव नारायण यांजकडून राजमाचीपैकीं कर्णेकरीसुद्धां असामी ६ सहा देविले त्याविशीं.

१ किल्ले विसापूर निसबत भिकाजी गोविंद यांजकडून किल्ले मजकूरपैकीं असामी ५ पांच देविले त्याविशीं.

रसानगी, सदाशिवभट नानल.

९६२ ( ८२३ )–तालुके चास येथें सटवाजी हजारी वगैरे कोळी यांणीं दंगा करून, रयतीपासून खंड घेऊन, घरें जाळलीं, यांजकरितां पेशजीं हुजुरून कोळ्यांचे बंदोबस्तास पन्नास लोक हशमी पाठविले आहेत, त्या शिवाय तालुके मजकूरचे माहितगार लोक जदीद छ. २० रजबपासून असामी ३० तीस एकूण दरमहा दर असामीस तैनात रुपये ५ पांच निवळ आकरमाही

अर्बा समानीन मया व अलफ सवाल १४

---

A. D. 1782-83. dár asked for assistance from the Huzur. A force of 101 Rohilá Gárdis was sent to him for the purpose.

( 961 ) A dacoity having occurred at Karanjgaum in Turf Náṇe-Máwal at the house of a priest, Harbhaṭ Karve. 11 peons were sent for two months to protect the village.

A. D. 1783-84.

( 962 ) Saṭwáji Hajári Koḷi was making attacks on the village of Táluká Chás, levying black-mail and burning houses. Fifty soldiers were therefore sent from the Huzur to

A. D. 17[illegible]3-84.

शिरस्तेप्रमाणें करून ठेविले आहेत, त्याप्रमाणें हुजुरून लोक करार करून दिल्हे पाहिजेत, ह्मणोन तुह्मीं विनंती केली; त्याजवरून तुमचे ठेवणुकेप्रमाणें तीस असामी सदरहू तारखे-पासून करार करून, हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी चोरांचा बंदोबस्त होईतों-पर्यंत लोक ठेवणें. बंदोबस्त जाल्यावर लोक दूर करणें; आणि सदरहू लोकांचा आकार होईल तो तालुके मजकूरचे हिशेबीं खर्च लिहिणें, मजुरा पडेल ह्मणोन, नीळकंठराव रामचंद्र यांचे नावें. सनद १.

रसानगी यादी.

९६३ ( ८८१ )–शहर अमदानगर येथें चोरांचा उपद्रव होऊन दरवडे पडतात, याजकरितां शहर मजकूरचे रखवालीस माणसें ठेवावयाकरितां शहरांत बाहेरील बिछाइती वाणी किराणा, भुसार वगैरे जिन्नस आणून विक्री करितात, त्यांस बिछाइतीची अडत शहर मजकूर येथील जो उदमी करील त्यास त्यांणीं पोटास द्यावें, याप्रमाणें पेशजीं पासून चालत आहे, त्यास बिछाइतीयाची अडत एकाचे जिमेस लाविल्यास हजार बारासें रुपये पर्यंत दरसाल उत्पन्न होतील. यास्तव बिछाइतीयांची अडत एकाचे जिमेस लाऊन देऊन, आकार होईल तो शिबंदीखर्चास नेमून द्यावा. ह्मणजे शहर मजकूरचे दरवड्यांचा वगैरे बंदोबस्त होईल, ह्मणोन तुम्हांकडील कारकुनांनीं विनंति केली; त्याजवरून शहर मजकुरीं बिछाइती वाणी येतात, त्यांची अडत एकाचे जिमेस लाऊन, त्यास काम सांगून आकार होईल त्याची शिबंदी ठेऊन, दरवड्यांचा वगैरे शहरचा बंदोबस्त करणें, एक हजार निदान बारासें रुप-यांवर जाजती आकार जाल्यास सरकारांत जमा करीत जाणें ह्मणोन, विठ्ठल नारायण मामलेदार, तालुके अमदानगर यांचे नावें. सनद १.

खमस समानीन मया व अलफ जमादिलावल २४

रसानगी यादी.

९६४ ( ९९३ )–श्रीत्रिंबकेश्वरीं सिंहस्थाकरितां गोसावी वगैरे जमा होतात.

---

put down the Kolis, and sanction was accorded to the entertainment of 30 additional men at Rs. 5 each for the same purpose.

( 963 ) Owing to the prevalance of dacoitics at Ahmednagar, the employment of Rakhwáldárs was sanctioned and provision was made for their pay out of the revenue realized by the sale of the brokerage monopoly of goods brought for sale from outside the town.

A. D. 1784-85.

( 964 ) It being the Sinhastha year, it was expected that Gosávis would flock in large numbers to Trimbakeshwar, and that quarrels and disputes would take place. Two

A. D. 1788-89.

तिसैन समानीन मया व अलफ सवाल ८ त्यांत कजेकफावती करतील, याजकरितां त्यांचे बंदोबस्तास सरकारांतून गाडदी, निसबत राघो विश्वनाथ वगैरे यांजकडील असामी २०० तुह्मांकडे पाठविले आहेत, यांस तेथें चौक्या नेमून देऊन बंदोबस्त राखून गोसावी यांचा वगैरे परस्परें कज्या होऊं न देणें ह्मणोन, धोंडो महादेव यांचे नांवें. सनद १.

रसानगी, राघो विश्वनाथ कारकून शिलेदार.

९६५ ( ९९४ )—कसबे नाशिक येथें सिंहस्थाचे यात्रेचा वगैरे बंदोबस्त जाला पाहिजे, याकरितां गाडदी निसबत राघो विश्वनाथ असामी १०० शंभर पाठविले आहेत, तरी कसबे मजकुरीं यांजपासून चाकरी घेऊन, यात्रा गावांत व गांवाबाहेर राहील तिचा बंदोबस्त चांगला करणें ह्मणोन, कृष्णराव गंगाधर कमाविसदार परगणा नाशिक यांचे नांवें. सनद १.

तिसैन समानीन मया व अलफ जिल्काद २

रसानगी, त्रिंबकराव नारायण कारकून निसबत दफ्तर.

९६६ (११२१)—धोंडो केशव यांजकडे मौजे पाडळी, संमत कोरेगांव, प्रांत वाई, हा गांव सरकारांतून आहे. तेथें पेंढारी वगैरे यांचा उपद्रव जाहला आहे, याजकरितां किल्ले चंदनपैकीं लोक असामी १० दहा उपद्रव मोडेतोंपर्यंत गांवचे रखवालीस नेमून देणें ह्मणोन, पांडुरंग त्रिंबक दिंमत विठ्ठलराव मल्हार यांचे नांवें. सनद १.

खमस तिसैन मया व अलफ. रजब २६

रसानगी, त्रिंबक नारायण परचुरे कारकून निसबत दफ्तर.

## ७ न्यायखातें.

### ( एफ ) तुरुंग.

९६७ ( ४७ )—हरी सखोजी, व त्याची स्त्री हीं उभयतां किल्ले सिंहीगड येथें अट-

---

hundred soldiers were therefore sent to the place to assist the Kamávisdár, who was directed to see that no disturbance took place.

( 965 ) 100 Gárdis were sent to Násik for keeping order among the pilgrims coming to Násik during the Sinhastha year.

A. D. 1788-89.

( 966 ) The village of Pádali in Samat Koregaum being infested by Pendháris, 10 sepoys from fort Chandan were sent to protect the village.

A. D. 1794-95.

( F ) Prisons.

( 967 ) Hari Sakhoji and his wife who were in prison at fort

अर्बा सबैन मया व अलफ. रबिलावल २२

केस आहेत, त्यास हरी सखोजीस समाधान नाहीं, मूत्रावरोध जाहला, व त्याचे स्त्रीस संग्रहणीची वेथा जाहली. दोघांचीही अवस्था भारी आहे, ह्मणोन विदित जाहलें; त्याजवरून हें पत्र सादर केलें असे, तरी हरी सखोजी व त्याची स्त्री ऐसी मौजे उरवडें येथें पोहोंचऊन देणें, मौजे मजकुरीं विठ्ठल येशवंतराव खासनीस, दिंमत हुजुरात, यांची मातोश्रीचे स्वाधीन करून पावती घेणें ह्मणोन, आनंदराव जिवाजी यांचे नांवें चिटणिसी छ. १४ जिल्हेज. पत्र १.

## नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

९६८ ( ६५ )—भवानीदास बलराम जेजालंदाज, किल्ले रामगड, तालुके विजयेदुर्ग,

खमस सबैन मया व अलफ. जमादिलाखर २९

याजकडे पितृतीथ होती, याजकरितां किल्ले मजकूर येथील दरवाज्यास कोठीनजीक जातीचे चार लोक बोलाऊन, तटावर अग्नींत आउती देऊन बिऱ्हाडास आला, तों वाऱ्यानें किटाळ कोठीवर उडोन कोठींतील जिन्नस जळाला. बीतपसील.

| | | | |
|---|---|---|---|
| गल्ला कैली साडेतिसेरी. | | वजन. | कचे. |
| ४॥३॥१॥= | नागली. | ॥·॥४८१॥ | दारु. |
| ।·॥१॥= | वरी. | ८॥७॥ | काथागबाळ. |
| ॥·॥१।≡ | मीठ. | ८८६। | ताग. |
| ५॥·८१॥≡ | | ·॥१॥७॥१॥ | |

सुमारी. सुमार.

४२ कले, चर्मी.
३ बुधले.
३ अधवडी.
३ गोळ्यां शिसें.

५१

A. D. 1773-74.

Sinhgad being seriously ill, it was ordered that they should be released and sent to the village of Urawade.

## FROM NÁRO APPÁJI'S DIARY.

( 968 ) Bhawánidás Balrám Jejálandáj of fort Rámgad in Táluká

A. D. 1774-75.

Vijayadurga on the anniversary of his father's death made a fire on the rampart and threw offerings on it. A spark was blown by the wind to the store-room which took fire and a considerable quantity of grain, gunpowder &c. was burnt. Bhawánidás

एकूण गल्ला केली पावणें सहा खंडी, पावणें दोन पायली, तीन सीपें वजन कचे साडे-अकरा मण, पावणें आठ शेर दीड टांक, व सुमारी एकावन याप्रमाणें कोठींतील जिन्नस जळाला, त्याजवरून जेजालंदाजास अटकेंत ठेविला आहे, त्यास चार वर्षे जाहालीं. त्याज-पासून सदरहू जिनसांची किंमत घ्यावी, तरी बायको व माणसें कोणी नाहींत, जरजर जाहला आहे, अडसेरी मात्र द्यावी लागते, कांहीं उत्पन्न व्हावयाचें नाहीं, यास्तव सोडून द्यावयाची आज्ञा केली पाहिजे ह्मणोन तुह्मी विनंतीपत्र पाठविलें; त्याजवरून मनास आ-णितां जेजालंदाज मजकूर याचें कोणी नाहीं, व तोही मरावयासी जाहला आहे, सबब सदरहू जिन्नस नुकसान जळित खर्च लिहून, जेजालंदाजास सोडून देणें ह्मणोन, महादाजी रघुनाथ यास छ. १ रविलाखर. सनद १.

९६९ ( १२९ )–धोंडभट गाडगीळ, वस्ती रेवदंडा, यांणीं हुजूर विदित केलें कीं, जंजीरें मजकूरचे चोरांनीं दोन चोऱ्या केल्या, ते चोंर सांपडले, त्यास एक चोरी खत्री याचे घरची चोरानें झाडून भरून दिली. दुसरी चोरी आमचे घरीं केली ते कबूल जाले, परंतु त्यास द्यावयास अवकात नाहीं. तिघे ब्राह्मण चोर सहा महिनें अटकेंत आहेत, बहुत श्रमी होतात, याज-करितां ब्राह्मणांस सोडावें, आह्मीं चोरी भरून पावलों, मागत नाहीं, वाईट बरें यांस जालें तर दुर्निमित्य येईल, असें रेवदंड्याचे अंमलदारास ह्मटलें, परंतु ते ऐकत नाहींत, व सर-कारांत चोरीची तिजाई द्या ह्मणतात, येविशीं आज्ञा जाली पाहिजे ह्मणोन, ऐशास धोंड-

खमस मबैन
मया व अलफ
मोहरम २०

---

was therefore thrown into prison and kept there for 4 years. At the end of that period, it was reported that the man had no wife or other relations, that there were no means of recovering the value of the property from him, that he was much emaciated, and that his daily ration was a useless charge on Government. He was therefore ordered to be released.

(969) Three Brahmins of Janjire had committed two thefts, one at the house of a Khátri and the other at the house of Dhond Bhaṭ Gádgil of Revadandá. They produced the property of the first theft, but were unable to produce that of the second, though they confessed that they had committed the theft. They were therefore imprisoned and remained in confinement for 6 months. At the end of the period Dhoṇḍ Bhaṭ waived his claim to the property stolen and applied for the release of the prisoner on the ground that should they die, he would incur the odium of causing their death. The Officer of Rewadandá refused to comply with the request unless the value of a third share of the stolen property was paid to Government as usual. The matter was taken to the Peshwa by Dhoṇḍ Bhaṭ. The Officer

A. D. 1774-75.

भटाकडे चोरी जाली सबब त्याणें चोरांस अटकेंत ठेवविलें; हल्लीं चोरांपासून ऐवज येत नाहीं, चोर ब्राह्मण उपास करितात यास्तव चोरी भरून पावली, यांस सोडावें असें ह्मणतात हेंच खरें किंवा अंतस्थ चोरीचा ऐवज भरून घेतला, आणि सोडावयाविषईं रदबदली करितात, येविशींची चौकशी करून, उगेंच सोडावें हेंच खरें असल्यास चोरांस सोडून देणें. भटास तिजाईचा तगादा न लावणें. खंड गुन्हेगारी घेतली असेल ती सरकारांत जमा करणें ह्मणोन आनंदराव शिंदे, जंजीरे रेवदंडा यांचे नांवें. पत्र १.

९७० ( १६७ )—कसबे नारायणगांव येथें जंगमाचे घरीं दरवडा पडला होता, त्यास मौजे आरवी, कसबे मजकूर, येथें बेरड वस्तीस राहिले होते, त्यांस नारायणगांवकरी यानीं धरून हुजूर पाठविले. असामी १० दहा ते जुन्या कोटांतील बंदीखान्यांत बिड्या घालून ठेविले आहेत; त्यांचें वर्तमान मनास आणतां त्यांजकडे कांहीं मुद्दा लागूं होत नाहीं, सबब जामीनकतबा घेऊन बेरड सोडविले असत; तरी सदरहू दहा असामींच्या बेड्या तोडून सोडून देणें ह्मणोन, शिवराम रघुनाथ निसबत खासगी यांस छ. ११ जिल्काद. सनद १.

खमस सबैन
मया व अलफ
मोहरम ६

रसानगी, गोंदजी गाड्या प्यादा, दिंमत बहिरजी मोरे.

९७१ ( २०१ )—किल्ले सिंहगड येथें रामचंद्र विठ्ठल याचीं मुलें माणसें. असामी.

खमस सबैन
मया व अलफ
रबिलाखर ५

२ तीर्थरूप व मातुश्री.
२ भावजया.
३ मुलें.
२ कुणबीण व पोरगा.

of Rewadanḍá was ordered to ascertain whether the Bráhmins were really unable to restore the stolen property and were starving themselves or whether they had privately restored the stolen property to Dhonḍ Bhaṭ who was now interceding on their behalf. In the former case, the prisoners were directed to be set at liberty.

( 970 ) A dacoity having occurred at Náráyangàon, 10 Berads living in Âravi, a neighbouring village had been arrested and kept in the prison in Junákot. As nothing could be proved against them, they were ordered to be set at liberty.

A. D. 1774-75.

( 971 ) The parents and other relations of Rámchandra Viṭhal were imprisoned at fort Sinhgaḍ. The parents being old and unable to stand the cold climate of the place were

A. D. 1774-75.

एकूण नऊ असामी किल्ले मजकुरीं अटकेंत आहेत, त्यास मशारनिल्हेचे तीर्थरूप व मातुश्री यांचा वृद्धापकाळ, किल्याची हवा सर्द, मानत नाहीं, याजमुळें बहुतेक हैराण आहेत, ह्मणोन विदित जालें; त्याजवरून हें पत्र तुह्मांस लिहिलें असे, तरी सदरहू नऊ असामी किल्ल्याखालीं उतरणें. हीं आपले घरीं, मौजे उरवडें येथें, येऊन राहतील, त्यांचे मुबदला रामचंद्र विठ्ठल याचे बंधु व्यंकोजी विठ्ठल यास किल्ल्यावर ठेवणें; व मशारनिल्हेची बहीण पेशजी भेटावयास गेली आहे तिजलाही जाऊं देणें ह्मणोन, आनंदराव निंबाजी किल्ले सिंहगड यांचे नांवें चिटणिसी छ. १८ रजब. पत्र. चिटणिसी पत्र येऊन सदरहू-प्रमाणें सनद लिहून दिल्ही.

परवानगी रूबरू.

९७२ ( ३७४ )—हरी आपाजी काणे, याणीं हुजूर विदित केलें कीं, आपला भाऊ गदाधर आपाजी, वस्ती कसबे खेड, तालुके सुवर्णदुर्ग, हा तोतयाकडे गेला होता, याजमुळें त्यास कैद सरकारांत केलें होतें, तेथून भयेंकरून पळोन गेला यास्तव सुभां आपल्यास नेऊन गुन्हेगारी पन्नास रुपये घेतले, परंतु आपला भाऊ आलाहिदा, त्याचे कन्येचें लग्न होणें, याकरितां सरकारांतून कौल देववावयाची आज्ञा जाली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून हें पत्र सादर केलें असे, तरी याचा भाऊ भयेंकरून गेला आहे, घरीं कन्येचें लग्न व्हावयाचें आहे, सबब यास कौल देऊन घरीं आणवणें; कन्येचें लग्न होऊं देणें; मग जीवन पाहून भावापासून गुन्हेगारी घेतली आहे, त्याअन्वयें याचें जीवन पाहून गुन्हेगारी घेणें ह्मणोन, मोरो बापूजी यांस. पत्र १.

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज १२

चिटणिसी.

९७३ ( ४१७ )—बाजीराव गोविंद वर्वे हैदरअली यांजकडे गेले, सबब त्याच्या

---

permitted to reside in their house in Urawade and Rámchandra's brother was ordered to be imprisoned in their stead.

( 972 ) Gadádhar Appáji Káne of Khed, in Táluká Suwarnadurga, having joined the Pretender was arrested and imprisoned. He escaped from prison and his brother Hari was fined Rs.50 by the Subhá. Hari Appáji represented that Gadádhar had to perform his daughter's marriage and prayed that a pass might be given permitting him to return home for this purpose. Moro Bàpuji was instructed to give the safe-pass as requested and to levy a reasonable fine from Hari after the celebration of the marriage.

A. D. 1776-77.

( 973 ) Bájirao Govind having gone over to Haidar Ali, his two wives were kept in custody at Mangalwedhe. Bájirao's father Govind Gopál represented that Bájirao's daughter

A. D. 1776-77.

सबा सबैन मया व अलफ मोहरम ६ — स्त्रिया दोन किल्ले मंगळवेढें येथें अटकेंत ठेविल्या आहेत, त्यास मशारनिल्हेची कन्या उपवर जाली, लग्न कर्तव्य, ह्मणोन गोविंद गोपाळ, मशारनिल्हेचे तीर्थरूप यांणीं हुजूर विनंती केली, त्याजवरून मशारनिल्हे यास सरकारांत जामीन घेऊन, हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी दोघी स्त्रिया कन्येसहवर्तमान पुण्यास पावते करणें ह्मणोन, मेघःशामराव यांचे नांवें. सनद १. रसानगी यादी.

९७४ ( ४२३ )—त्रिंबक गणेश भट याची बायको, व लेक अटकेस आहे, त्यास मूल आठ वर्षांचा जाला, त्याचा व्रतबंध जाह्ला पाहिजे, ह्मणोन लिहिलें त्यास त्याचे सोइरे आप्त कोणी जामीन देऊन मुंज करतील, तरी बायको व मुलास पक्का जामीन घेऊन त्यांचे हवाला करणें, मुंज जाह्ल्यावर पुन्हां पूर्ववतप्रमाणें अटकेस ठेवणें.

सबा सबैन मया व अलफ सफर २

९७५ ( ४२९ )—रघ सावंत भोसले, व केसो बाबाजी यांस सनद कीं, अंताजी केशव जोशी निसबत रामराव नारायण यांस किल्ले विसापूर येथें अटकेस ठेवावयास पाठविले आहेत, तरी त्यास बेडी घालून पक्क्या बंदोबस्तानें किल्ले मजकुरीं अटकेस ठेऊन पोटास शेर शिरस्तेप्रमाणें सनेद पैवस्तागिरीपासून देत जाणें. किल्ले मजकूर नाजूक जागा; अंताजी केशवचा लेक फार लबाड आहे; फितवाफांद्यास व निघोन जाण्यास चुकणार नाहीं. यास्तव चौकीचे लोक मजबूत चांगले नेमून देणें; आणि बेडी रोज तुह्मी आपले रूबरू पाहात जाणें; लोहारास

सबा सबैन मया व अलफ सफर १६

had attained the marriageable age and that she must therefore be married. He was asked to stand security for the ladies and orders were issued that the ladies and the girl should be sent to Poona.

( 974 ) Trimbak Bhat's wife and son were imprisoned in the fort of Ratnàgiri. The boy having attained the age of 8 years, permission was given to release both him and his mother in order that his thread-ceremony might be performed. It was further ordered that security should be taken from them before their release and that after the ceremony they should again be imprisoned.

A. D. 1776-77.

( 975 ) Antáji Keshav Joshi, in the employ of Rámrao Nàráyan, was sent to prison in the fort of Visápur. Ragh Sáwant Bhosle and Keso Bábáji were informed that he was an intriguing person, that he was sure to attempt to escape, that a trusty guard should therefore be kept over him, that his fetters should every day be inspected by them in person, that the blacksmith should be strictly warned to be careful in rivetting the fetters, that Antáji should

A. D. 1776-77.

चांगली ताकीद करून ठेवणें; चौकीचे लोकांजवळ त्यांचें भाषण न व्हावें, त्यांजवळ यांचें भाषण न व्हावें, चौकीचे लोकांशिवाय दुसऱ्यानें कोणीं जाऊं नये, असा पक्का बंदोबस्त करून ठेवणें ह्मणोन. सनद १.

परवानगी रूबरू.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

९७६ ( ४४५ )—धोंडो गोपाळ केळकर किल्ले घनगड येथें अटकेंत आहे, त्याचे पाय सुजले आहेत, उठवत बसवत नाहीं, ह्मणोन तुह्मीं विनंतीपत्र पाठविले तें पावलें. ऐशीयास मशारनिल्हेस फार बरें वाटत नाहीं, याजकरितां पायांतील बिडी तोडून औषधउपाय करणें; आणि चौकीचा बंदोबस्त चांगला करून, लोकांचे फेरफार वरचेवर करून बरा जाहाला ह्मणजे फिरोन पायांत बिडी पूर्ववतप्रमाणें घालणें ह्मणोन, गोविंद रघुनाथ किल्लेमजकूर यांचे नांवें. सनद १.

सबा सबैन मया व अलफ रविलावल २९

९७७ ( ४५५ )—धोंडो गोपाळ केळकर, तोतयाचे फितुरांतील, किल्ले घनगड येथें अटकेस होता, तो मृत्यू पावला, त्याची क्रिया जाहली पाहिजे, याजकरितां त्याची बायको तालुके रत्नागिरी येथें अटकेंत आहे; तीस जामीन घेऊन क्रिया करण्याबद्दल मोकळीक करणें, क्रिया जाहालीयावर पोटीं संतान असल्यास अटकेस ठेवणें, संतान नसेल तर जामीन पक्का घेऊन मोकळीच असों देणें ह्मणोन, सदाशिव केशव यांचे नांवें. छ. ८ रविलाखर. सनद १.

सबा सबैन मया व अलफ रविलाखर २६

परवानगी, राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस.

---

be prevented from speaking to the guard, and that no other persons should be allowed to approach him.

## FROM JANÁRDAN APPÁJI'S DIARY.

( 976 ) Dhondo Gopál Kelkar, a prisoner in the fort of Ghangad, having swollen feet was unable to move. The officer of the fort represented the matter to Government, and orders were issued to remove the fetters and to keep Dhondo under medical treatment. It was further ordered that after his recovery fetters should be put on again.

A. D. 1776-77.

( 977 ) Dhondo Gopál Kelkar, who was confined in the fort of Ghangad for conspiring with the Pretender died. Orders were therefore issued to release his wife from custody at Ratnágiri in order that she might perform the funeral rites of the deceased. It was further ordered that she might be allowed to remain at large if she had no issue, that otherwise she should be sent back to prison after the performance of the obsequies.

A. D. 1776-77.

९७८ ( ४९७ )—अर्जोजीराव ढमाले हवालदार, व कारकून किल्ले घनगड यांस सनद कीं, सखाराम हरी हे किल्ले पुरंदर येथें अटकेस होते, ते हल्लीं येथून तुह्मांकडे बेडीसुद्धां पाठविले आहेत, तरी किल्ले मजकुरीं बेडीसुद्धां पक्क्या बंदोबस्तानें अटकेस ठेऊन, पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें. याची बेडी तुह्मीं आपले दृष्टीनें रोजचे रोज पाहत जाणें. याचे चौकीस लोक ठेवाल ते एका दो रोजीं हेरफेर करून दुसरे लोक चौकीस नेमीत जाणें; आणि याची रखवाली बहुत खबरदारीनें करणें. सखाराम हरी याचे रखवालीस लोक राहातील त्यांणीं त्याशीं बोलूं नये, याप्रमाणें लोकांस चांगली ताकीद करणें, याजबरोबर रखवालीस स्वार दिंमत सदाशिव धोंडदेव, व गाडदी दिल्हे आहेत, हे किल्ले मजकुरीं पोहोंचऊन हुजूर येतील ह्मणोन.

समान सबैन मया व अलफ रमजान १५

सनद १.

परवानगी रूबरू.

९७९ ( ५३१ )—महादाजी गणेश फडके किल्ले चंदनगड येथें अटकेंत आहेत, त्यास बरें वाटत नाहीं, याजकरितां मशारनिल्हेची स्त्री, व कुणबीण त्यांजकडे जात आहे, त्यांस किल्यावर घेऊन, स्त्रीस सिधा मध्यम प्रतीचा, व कुंणबिणीस अडशेरी देत जाणें ह्मणोन, शामराव जगजीवन यांचे नांवें. छ. ७ जिल्काद.

समान सबैन मया व अलफ सफर २६

सनद १.

रसानगी यादी.

९८० ( ५४४ )—नरसिंगराव गोविंद किल्ले पाली येथें अटकेस आहे, त्याची मातुश्री पुणियांत होती, ते मृत्यु पावली, तिची क्रिया करण्याबद्दल ब्राह्मण तेथें अस्थी घेऊन येईल. अस्थी आलियावर नरसिंगराव याचे पायांतील बेडी काढून, चौकी चांगली बंदोबस्तानें ठेऊन क्रियेस ब्राह्मण

समान सबैन मया व अलफ सफर २६

**( 978 )** Sakhárám Hari was sent in custody from fort Purandhar to fort Ghangad. The officer of the fort was directed to see personally every day that Sakhárám was properly fettered and to allow no communication with him and to see that he was very carefully guarded.

A. D. 1777-78.

**( 979 )** Mahádáji Ganesh Phadke, a prisoner at fort Chandangad being indisposed, his wife with her female attendant was permitted to come and reside with him. She was given the usual ration.

A. D. 1777-78.

**( 980 )** Narsingrao Govind, a prisoner at fort Páli, lost his mother residing in Poona. Her bones were sent to him with a Brahmin, in order that he might perform the obsequies

A. D. 1777-78.

मेळऊन वीस रुपयेपर्यंत क्रिया करण्यासी देऊन क्रिया करवणें. क्रिया जाहलीयावर पूर्ववतप्रमाणें बेडी घालून ठेवणें ह्मणोन, बाजी गोविंद यांचे नांवें. छ. ८ जिल्हेज. सनद १.

परवानगी रूबरू. राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस.

९८१ ( ५७२ )—मोरो बाबूराव यांस किल्ले अमदानगर येथें ठेवावयास पाठविले आहेत, समागमें विसाजी आपाजी फौज सुद्धां दिल्हे आहेत, तुम्हांजवळ येऊन पोहचल्यावर हवालीं करून घेऊन किल्यांत ठेवणें; घर चांगलें असेल त्याचा बंदोबस्त करून राहावयास देणें; समागमें खिजमतगार, ब्राह्मण वगैरे विसाजी आपाजी सांगतील त्याप्रमाणें ठेवणें; तेथें पोहचाऊन विसाजी आपाजी माघारे हुजूर येतील. तुह्मीं बंदोबस्त चांगला करणें. मोरो बाबूराव यांजकडील हत्यारेंबंद माणूस जवळ नसावें, तुह्मी आपल्या कडील एक शाहाणा इतबारी मर्द माणूस जवळ ठेवणें; त्याणें रात्रंदिवस जपत जावें. बाहेरील माणूस किल्यांत जाईल त्याची चौकशी करीत जाणें, किल्याचा बंदोबस्त चांगला करावा. किल्याबाहेर शहरांत बेकार लोक राहात असतील, त्यांचा बंदोबस्त करणें. सारांश गोष्ट तुह्मी इतबारी यास्तव तेथें रवानगी केली आहे. सावधपणें राहून बंदोबस्त चांगला राखणें, वर्तमान लिहीत जाणें. मोरो बाबूराव खासा, व दोन भिक्षुक ब्राह्मण, व एक आचारी, व एक ब्राह्मण, व एक शागीर्द, व दोन खिजमतगार बिन हत्यारी, याप्रमाणें असामी ठेऊन, भोजनाचें साहित्य वगैरे उत्तम करून देत जाणें, व न्हावी एक लागेल तेव्हां तुह्मी आपणांकडील विश्वासू पाठवित जाणें; वरकड बंदोबस्ती चांगली वरचेवर करीत जाणें ह्मणोन महादाजी नारायण यांचे नांवें. सनद १.

(तिसा सबैन मया व अलफ, जमादिलाखर २९)

परवानगी रूबरू.

९८२ ( ५७३ )—बाबूराव हरी, व सखाराम हरी अटकेस आहेत. त्यास त्यांचे मातुश्रींचें वर्षश्राद्ध श्रावण शु॥ अष्टमीस आहे, त्यास श्राद्धांबद्दल खर्चास दर असामीस रुपये ५ पांच प्रमाणें देविले असेत. ते देऊन, श्राद्धाचें दिवशीं पायांतील बिडी काढून श्राद्ध करवणें. श्राद्धाचे दिवशीं एक दोन ब्राह्मण, व एक ग्रहस्थ, व दोन माणसें येतील त्यांस किल्ल्यावर घेऊन,

(तिसा सबैन मया व अलफ, जमादिलाखर ३०)

---

of the deceased. His fetters were ordered to be removed while performing the ceremony.

( 981 ) Moro Báburao was sent with his attendants to prison in fort Ahmednagar. The officer of the fort to give him first class diet and to keep a very careful watch over him: if a barber was required, a trustworthy man must be sent. (A. D. 1778-79.)

( 982 ) Baburao and Sakhárám Hari were imprisoned at fort

श्राद्ध जालीयावर त्यांचे दिवशीं पायांतील बेड्या उतरून देणें; आणि पूर्वीप्रमाणें उभयतांस बंदोबस्तानें ठेवणें ह्मणोन सनदा.

किल्ले प्रतापगड.

१ जयराम कृष्ण यांस सनद कीं, बाबूराव हरी यांस श्राद्धास पांच रुपये खर्चास देणें ह्मणोन.

१ अर्जोजीराव ढमाले हवालदार, व कारकून किल्ले घनगड यांस सनद कीं, सखाराम हरी यांस श्राद्धाबद्दल खर्चास रुपये पांच देणें ह्मणोन.

परवानगी रूबरू.

९८३ ( ५८९ )–मामले कोहोज येथें बंदीवान अटकेस आहेत, त्यांपैकीं डोकीं मारावयाचीं, व शास्त्रें करावयाचीं वगैरे. कलमें.

तिसा सबैन मया व अलफ सफर २३

डोकीं मारावयाच्या असामी.

२ खंड्या बेरड याचे पोर्गे आहेत ते.

१ फाजीलखान नूरमहमद याचा भाऊ यास, भिवराव येशवंत यांणीं तारापूरचे मुक्कामींहून पाठविला आहे तो, एकूण तीन असामींचीं डोकीं मारणें. कलम १.

शिवराम ब्राह्मण भिवराव येशवंत यांणीं तारापूरचे मुक्कामींहून पाठविला त्याचा जामीन घेऊन सोडणें. कलम १.

मोराजी भोई याणें भुतें घालून काळोजी भोई यास मारिलें. तो मामले मजकुरीं आहे, त्याचा एक हात तोडून सोडणें. कलम १.

कडेलोट करावयाचे.

भिवराव येशवंत याणें तारापूरचे मुक्कामींहून पाठविले ते.

१ बहादूरसिंग.

A. D. 1778-79. Pratápgad and Ghangad. Orders were issued to give them Rs. 5 each to enable them to perform the usual ceremonies on the anniversary of their mother's death, to remove their fetters on that day and to admit one or two priests into the forts for the occasion.

( 983 ) Sentences were passed on some of the prisoners at fort Kohoj, three were ordered to be beheaded, two to be thrown down the precipice. One prisoner, Moráji Bhoi, who had been convicted of murdering another man through the agency of spirits was sentenced to have one hand cut off. Another prisoner, Rámá Kánadá,

A. D. 1778-79.

नारायणजी शितोळा हुजुरून सन सलास सबैनांत अटकेंत ठेवण्यास पाठविला, त्याची सबब काय आहे ती लिहून पाठविणें.

१ देवसिंग खरकसिंगाचा कारभारी.

एकूण दोन असामींस कडेलोट करणें.

कलम १.

रामा कानडा ब्राह्मण ह्मणवितो, परंतु पुण्यांत गाईचीं पुच्छें कापीत होता; तो मामले मजकुरीं अटकेस आहे; त्यास कुजक्या नागली पोटास देत जाणें. कलम १.

एकूण सहा कलमें करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें. व यांखेरीज आणखी बंदीवान असतील त्यांचा झाडा हुजूर पाठवून देणें. सदरहू लिहिल्याप्रमाणें सरकारचे खिजमतगार भिवजी जगताप, व संताजी टिळेकर दोन असामी पाठविले आहेत, यांचे गुजारतींनें पारपत्य करून लिहून पाठविणें ह्मणोन, महादाजी रघुनाथ, मामले कोहोज यांस. सनद १.

रसानगी बरहुकूम पट.

९८४ ( ५९० ) किल्ले सिंहीगड येथें बंदीवान अटकेस आहेत, त्यांपैकीं हुजूर आणावयाचे वगैरे येविशीं.

तिसा सबैन
मया व अलफ
सफर २९

सुभाना ब्राह्मण, व मर्या जासूद हैदर नाईक यांजकडील फितुरी किल्ले मजकुरीं आहेत, त्यांचे पायांत बिडी घालून पक्या बंदोबस्तानें हुजूर पाठवून देणें. कलम १.

रामजी भागवत याची बायको, व सासू, किल्ले मजकुरीं अटकेस आहेत. त्या काय निमित्य ठेविल्या तें लिहून पाठविणें. कलम १.

एकूण दोन कलमें करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें, याखेरीज बंदीवान किल्ले मजकुरीं असतील त्यांची सबब लाऊन, नांव-

---

who though professing to be a Brahmin was caught cutting the tails of cows in Poona, was sentenced to be fed on rotten Nágli. The sentences were ordered to be carried out in the presence of two Khismatgárs sent from the Huzur. A complete list of the remaining prisoners was at the same time asked for.

( 984 ) A similar list of prisoners, with details of their offences,

निशीवार झाडा हुजूर लेहून पाठवणें ह्मणोन, नारो महादेव किल्ले मजकूर यांचे नांवें.

सनद १.

रसानगी यादी.

९८५ ( ५९३ ) बंदीवान तालुके, व किल्ले हाये येथें वगैरे जागीं अटकेस ठेविले आहेत, त्यांचे पारिपत्य करण्याविशीं. सनदा.

तिसा सबैन मया व अलफ रबिलावल ८

१ रघुनाथ सदाशिव, तालुके रायगड यांस कीं, गोपाळ सोनार ग्वाहागरकर हा सोनाराचे मुलास राघोबा विंझ्या याणें जिवें मारिला त्यांत होता, सबब किल्ले रायगड येथें ठेविला आहे. त्यास दादजी कंडारा, व मोराजी झुन्या खिजमतगार, दिंमत तानाजी पडवळ यांस पाठविले आहेत, त्यांचे गुजारतीनें सोनार मजकुराचा उजवा हात तोडून सोडून देणें ह्मणोन. कलम १.

१ अजीजीराव ढमाले हवालदार, व कारकून किल्ले घनगड यांस कीं, जग्या मारवाडी नागरगांवकर भुताला, सबब किल्ले मजकुरीं ठेविला आहे. त्यास दादजी लांडगा, व मोराजी झुन्या, दिंमत तानाजी पडवळ, खिजमतगार यांस पाठविले आहेत, यांचे गुजारतीनें एक बोट कापून, त्यास सोडून देणें ह्मणोन.

१ बाबाजी भिकाजी, तालुके अमदाबाद यांस कीं, तालुके मजकुरीं हरी बल्लाळ यांणीं स्वारींतून बंदीवान पाठविले ते. असामी.

- १ बाबाजी कदम.
- १ संताजी भोडवा.
- १ रामजी सिस्ता.
- १ भवानी बिचफरा.
- १ साबाजी पाडेकर.

A. D. 1778-79. was also called from fort Sinhgad. Two prisoners were ordered to be sent in fetters to the Huzur.

( 985 ) The following sentences were passed on certain prisoners confined in various forts:—

A. D. 1778-79.

( 1 ) Nagyá Márwáḍi who practised witchcraft to have one of his fingers cut off;

एकूण पांच असामी यांचे, राणोजी शेलार, व संभाजी मोकाता खिजमतगार, दिंमत संभाजी धायरीकर, पाठविले आहेत, त्यांचे गुजारतीनें एकेक हात तोडून त्यांस सोडून देणें ह्मणोन.

१ बाजी गोविंद तालुके सरसगड यांस कीं, संतू पवार कोळ्याचे मळईत होता, सबब किल्ले पीरगड, तालुके मजकूर येथें अटकेस ठेविला आहे, त्यास दादजी लांडगा, व मोराजी झुऱ्या खिजमतगार, दिंमत तानाजी पडवळ, यांस पाठविले आहेत, यांचे गुजारतीनें पवार मजकुराचें डोकें मारून हुजूर लेहून पाठवणें ह्मणोन.

१ नारायणराव कृष्ण, किल्ले चाकण यांस कीं, बहिरजी पवार, तुळाजी पवाराचा भाऊ, किल्ले मजकुरीं आहे, त्यास गोपाळजी शिंदा खिजमतगार, दिंमत तानाजी पडवळ, यास पाठविला आहे, त्याचे गुजारतीनें पवार मजकुराचा एक पाय तोडून त्यास सोडून देणें ह्मणोन. सनद १.

१ रामचंद्र कृष्ण, तालुके मुल्हेर यांस कीं, हरी बल्लाळ यांणीं स्वारींतून बंदीवान तालुके मजकुरीं सन सीत सबैनांत पाठविले ते. असामी.

१ अलाबकस वलद शेख सादन गाडदी.
१ भिवजी बिन बापूजी झांडा.
३ मांग.

 १ गोव्या.
 १ निंब्या.
 १ सेटी.
 ———
 ३

———
५

एकूण पांच असामींचा अनाजी राजगुरू, व कनाजी नलावडा खिजमतगार, दिंमत संभाजी धायरीकर, यांस पाठविले आहेत, त्यांचे गुजारतीनें एकेक हात तोडून त्यांस सोडून देणें ह्मणोन. सनद.

१ माधवराव कृष्ण यांचे नांवें कीं, तोफखान्यांत बंदीवान आहेत, त्यांपैकीं शासन करावयाचे असामी.

(2) Bápoo Bhái who was caught robbing a Brahmin woman of her ornaments to have one hand and one foot cut off;

२ एक हात व एक पाय तोडावयाचे.

१ रामा बेरड, मालजी नाईक बेरड आळंदीकर याजकडे चाकर होता तो.

१ बदली भोई ब्राह्मणाचे बायकोच्या आंगावरील वस्त्र चोरून नेत होता तो.

२ एकेक हात तोडावयाचे.

१ मल्हारी कुणबी खानापूरकर याणें चोरी केली सबब.

१ याकुबखान झारेकरी चोर ह्मणोन ठेविला आहे तो.

१ भिमा मांग जागेवाडीकर याणें खंडोजी भोसला जागेवाडीकर याची घोडी चोरली, सबब त्याचा एक पाय तोडावा.

पांच असामी यांस, देवजी शिंदा, दिंमत संभाजी धायरीकर, व ह्मसाजी निसवण, दिंमत रायाजी संकपाळ, खिजमतगार पाठविले आहेत, त्यांचे गुजारतीनें सदरहूप्रमाणें शासन करणें ह्मणोन. सनद.

सात सनदा रसानगी जाबता. याखेरीज बंदीवान असतील त्यांची सबब लाऊन नांवनिशीवार झाडे लिहून हुजूर पाठविणें, ह्मणोन सनदांत लिहिलें असे.

९८६ ( ६०४ ) किल्ले मजकुरीं सखाराम हरी अटकेस आहेत, त्यांस पोटास शिधा पावत आहे तो मना करून, जुन्या नागलीचें पीठ दररोज वजन पक्के ८८१ एक शेर प्रमाणें देत जाणें. पिठाशिवाय आणखी कांहीं न देणें. उपास करूं लागल्यास करूं देणें, मनास न आणणें. नवी बेडी येथून पाठविली आहे ही सखाराम हरी यांचे पायांत घालून, एक बंदोबस्तानें ठेवणें. बि-

तिसा सबैन मया व अलफ रबिलाखर २१

(3) Malhári kunbi who committed theft to have one hand cut off;

(4) Other prisoners (named) were to be beheaded, or have hands or feet, or both cut off as ordered in each case.

(986) The officers of fort Gangagad were directed to give prisoner Sakháram Hari one seer of old Nágli flour and nothing else, in lieu of the ration previously given to him, to let

A. D. 1778-79.

डीचा खिळा दररोज तुम्हीं पाहत जाणें, म्हणोन, अर्जोजीराव ढमाले, हवालदार व कारकून, किल्ले घनगड यांचे नावें. सनद १.

परवानगी रूबरू.

९८७ ( ६०५ )—बाबूराव हरी किल्ले प्रतापगड येथें अटकेस आहेत. ते किल्ले सुयारगड, तालुके सुवर्णदुर्ग, येथें अटकेस ठेवावयाचे करून हे सनद तुम्हांस सादर केली असे, तरी तुम्हीं तालुके मजकुरींहून पन्नास माणूस, व शाहाणा कारकून प्रतापगडास पाठऊन, बाबूराव हरी यास घेऊन जाऊन किल्ले सुयारगड येथें पक्के बंदोबस्तानें अटकेस ठेवणें; आणि पोटास शेर देत जाणें.

तिसा सबैन मया व अलफ रबिलाखर २३

जयराम कृष्ण यास सरकारचें पत्र अलाहिदा सादर केलें असे, तरी पत्र पावतांच तुम्हीं त्यांजकडे लोक, व कारकून पाठऊन, सदरहू लिहिल्याप्रमाणें मशारनिल्हेस घेऊन जाऊन किल्ले मजकुरीं पक्या बंदोबस्तानें बेडीसुद्धां ठेवणें म्हणून, मोरो बापूजी यांस. संनद १.

येविशीं जयराम कृष्ण किल्ले प्रतापगड यांस कीं, मशारनिल्हेकडून लोक, व कारकून तालुके सुवर्णदुर्गाहून तुम्हांकडे येतील त्यांचे हवालीं बाबूराव हरी यांस करून कबज घेणें म्हणून. सनद १.

२.

रसानगी, बाजी बल्लाळ कारकून, दिंमत जयराम कृष्ण.

मशारनिल्हेची स्त्री प्रतापगडास आहे, ते त्याजबरोबर आल्यास घेऊन जाऊन दोघांस एक जागा ठेवणें म्हणून मोरो बापूजी यांचे सनदेंत लिहिलें असे; व जयराम कृष्ण यांचे सनदेंत मशारनिल्हेची स्त्री किल्ले मजकुरीं आहे, ते त्याजबरोबर जात असल्यास सुयारगडास रवाना करणें, जात नसल्यास तिचे घरास पोहोंचाऊन देणें म्हणोन लिहिलें असे.

९८८ ( ६४१ )—सखाराम हरी किल्ले मजकुरीं अटकेस आहेत. त्यांचे पायांत बिडी थोर आहे ती काढून, लहान बिडी घालणें, व महिना पंधरा दिवशीं हजामत करवीत जाणें; बायको, व लहान पुत्र, व कुणबीण एक लहान पोरगी, अशीं तिघें पुण्याहून जातील. त्यांस किल्यावर घेऊन

समानीन मया व अलफ सवाल १३

him starve himself if he chose to do so, and to put on his legs the new fetters sent from the Huzur.

( 987 ) Báburao Hari a prisoner at Pratápgad was ordered to be sent to fort Suryágad. His wife who was with him was allowed to accompany him if she chose, otherwise she was ordered to be sent home.

A. D. 1778-79.

( 988 ) Orders were issued to the officer of fort Ghangad to remove

मशारनिल्हेजवळ ठेवणें; आणि मशारनिल्हेस, व बायकोस शिधा मध्यम प्रत, व कुणबीणीस शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें. औषधें वगैरे लागल्यास तुह्मांजवळ सांगतील, त्याप्रमाणें चौकशीनें आणून देत जाणें ह्मणोन, अर्जोजीराव ढमाले हवालदार, व कारकून किल्ले घनगड यांचे नांवें. सनद १.

रसानगी याद.

९८९ ( ७४० )—चिमणाजी दलपतराव, संस्थान पेठ, हे किल्ले त्रिंबक, तालुके मजकूर, येथें अटकेस आहेत. त्यांस त्रिंबक अनंत गोडबोले यांचे विद्यमानें गंगापुरांत ठेवावयाचा करार करून दरमहा खर्चास रुपये २५० अडीचशें देविले असेत, तरी तालुके मजकूरपैकीं देत जाणें. मशारनिल्हेनीं फंदफितूर करूं नये येविशीं पक्का जामीन त्रिंबक अनंत यांचे विद्यमानें घेणें ह्मणोन, धोंडो महादेव यांचे नांवें. सनद १.

इसन्ने समानीन मया व अलफ सफर १२

रसानगी यादी.

९९० ( ८१९ )—अर्जोजीराव ढमाले हवालदार, व कारकून किल्ले घनगड यांचे नांवें सनद कीं, ब्राह्मण बायका किल्ले मजकुरीं अटकेस आहेत, त्यांस लुगडीं, व चोळ्या व पांघरावयास कांबळी, सरदीची जागा याजकरितां देविली पाहिजेत ह्मणोन लिहिलें, त्याजवरून बायका असामी.

अर्बा समानीन मया व अलफ रमजान १४

१ कृष्णी.

१ कोंडी.

१ दारकी कायस्तीण.

१ कृष्णी पैठणकरीण.

४

A. D. 1779-80. the heavy fetters put on Sakhárám Hari and to substitute lighter ones in their place and to have him shaved every month or fortnight. Permission was also given to admit into the fort his wife, an infant son and a female servant and to allow them to stay with him. The officer was directed to supply him with such medicines as might be required.

( 989 ) Chimnáji Dalpatrao of Sansthân Peth who was a prisoner at fort Trimbak was allowed to reside at Gangápur on furnishing sufficient security.

A. D. 1781-82.

( 990 ) Clothes consisting of 2 sáris worth Rs. 2 each and 4

एकूण चार असामींस लुगडीं वगैरे वस्त्रप्रावर्णीं त्यांची किंमत. रुपये.

१६ लुगडीं, दर असामीस ४ प्रमाणें लुगडीं सुमार ८ दर २ प्रमाणें. रुपये.

२ चोळ्या, दर असामीस ४ प्रमाणें सुमार १६ दर ८= प्रमाणें. रुपये.

२ कांबळ्याबद्दल दर असामीस रुपया ॥· प्रमाणें. रुपये.

२०

एकूण वीस रुपयांचीं सदरहू लिहिल्याप्रमाणें सनगें देविलीं असेत. तरी खरेदी करून देणें. मजुरा पडतील ह्मणोन. सनद १.

परवानगी रूबरू.

९९१ ( ८८६ )–अर्जोजीराव ढमाले हवालदार, कारकून किल्ले घनगड यांचे नांवें सनद कीं, रामचंद्र गोविंद, माजी कारखानीस किल्ले मजकूर, हा अपराधी, सबब किल्ले विसापूर येथें अटकेस आहे. त्याचा लेक गोविंद रामचंद्र बारा वर्षांचा किल्ले मजकुरीं तुह्मांजवळ अटकेंत आहे, त्यास सोडावयाविशीं त्याचे आईनें हुजूर रदबदली केली, सबब सोडावयाचा करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी गोविंद रामचंद्र यास पोटखर्च रुपये २७।≈ सवा सत्तावीस तीन आणे जाहला आहे ह्मणोन तुह्मीं लिहून पाठविलें, त्यास पोटखर्चाचे सदरहू रुपये, व जामीन घेऊन सोडून देणें ह्मणोन. सनद १.

खमस समानीन मया व अलफ जमादिलाखर २८

रसानगी याद.

९९२ ( ९०३ )–माधवराव कृष्ण भिंगारकर हे किल्ले चावंद, तालुके शिवनेर येथें

A. D. 1783-84. boddices worth Rs. 0-2 each and one blanket worth Rs. 0-8-0 were ordered to be supplied to each of the 4 female prisoners at fort Ghangad.

( 991 ) Rámchandra Govind Kárkhánnis of fort Ghanagaḍ having been accused of some offence was imprisoned himself at fort Visápur, and his son Govind, aged 12 years, at fort Ghanagaḍ. At the intercession of the boy's mother Govind was released. It was ordered that diet expenses should be recovered and that a surety should be taken.

A. D. 1784-85.

( 992 ) Má thavrao Krishṇa, a prisoner in fort Cháwand, being old

सीत समानीन मया व अलफ जिल्काद ३० — अटकेंत आहेत, त्यास मशारनिल्हे वृद्ध, व अशक्त, सबब त्यांची स्त्री त्यांजवळ राहणार, त्यास किल्ले मजकुरीं मशारनिल्हेजवळ ठेऊन पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणून, बाळाजी महादेव यांचे नांवें.

सनद १.

रसानगी याद.

९९३ ( १०८४ )-मंडाजी गांड्या, मौजे टाकळी, तर्फ माहूर, व हरी पारगांवकर यांणीं मौजे मजकुरीं दावे करून जलेत केली, सबब किल्ले नारायणगड येथें अटकेस ठेविले आहेत. त्यास पोटगीचा ऐवज द्यावयास ताकत नाहीं म्हणोन तुह्मीं हुजूर विदित केलें, त्यास त्यांजपासून जीवन पाहोन ऐवज उत्पन्न होईल तो घेऊन, सरकारहिशेबीं जमा करणें; आणि हरदूजणांस जामीन घेऊन सोडून देणें ह्मणोन, रामचंद्र शिवाजी यांचे नांवें. — अर्बा तिसैन मया व अलफ मोहरम २१

सनद १.

रसानगी याद.

९९४ ( ११११ )—मोरो बापूजी यांचे नांवें सनद कीं, तुह्मीं छ. २५ जिल्हेजचें विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. पाद्री वैद्य पुण्यांत होता त्याचा भाऊ, मुशाबुरूज फिरंगी, परशराम रामचंद्र याजवळ लष्करांत चाकरीस होता, त्याची व दुसरे जमातदार यांची कटकट जाहाली, तेव्हां दोघे पाहारेयांत ठेविले. नंतर एक सोडला. फिरंगी मजकूर यास किल्ले धारवाड येथें लष्करांतून अटकेंत ठेविला, त्यास चौकशीकरितां सरकारी अपराध विशेष नाहीं; पोटास शेर, व चौकीस दहा बारा असामी आहेत, खर्च होऊन उपयोग नाहीं, त्याची — खमस तिसैन मया व अलफ मोहरम १३

---

A. D. 1785-86. and infirm, his wife asked permission to reside with him in the fort. The permission was granted and the fort officer was directed to arrange for her diet.

( 993 ) Mandáji Gàndyá of Tàkli in Máhur and Hari Párgaonkar, two incendiaries who were imprisoned in fort Náráyangad were unable to pay for their maintenance and the charge therefore fell on Government. Orders were issued to levy from them such amount as could be recovered and to set them at liberty after taking security. — A. D. 1793-94.

( 994 ) A Portuguese serving in the army under Parashrám Rámchandra, who was the brother of a Christan Doctor in Poona, having quarrelled with another officer, both were imprisoned. One of them was subsequently released but the other, viz. the Portuguese, remained in custody at Dhárwár. Moro Bápuji — A. D. 1794-95.

अबानी सेवेशीं पाठविली आहे, जामीन मिळत नाहीं, त्यास सोडावयाची आज्ञा व्हावी; व आणखी एक दोन असामी अटकेंत आहेत, आज्ञा जाहल्यास अन्याय पाहून फडशा करीन ह्मणोन लिहिलें, त्यास अपराधाची चौकशी चांगली करून फिरंगी मजकूर यास सोडून देणें, व आणखी एक दोन बंदीवान असतील त्यांचा अपराध असेल तसें पारपत्य करून, गुन्हेगारी घेऊन सरसुभांचे हिशेबीं जमा करणें; आणि जामीन घ्यावयाजोगे असतील त्यांचा जामीन घेऊन अपराधी अटकेंत आहेत त्यांस सोडून देणें ह्मणोन. सनद १.

रसानगी, त्रिंबक नारायण परचुरे कारकून निसबत दफ्तर.

## ८. सरकारी कामगार, व जहागिरदार यांचें गैरवर्तन.

### नारो आपाजीच्या

९९५ ( ६२ )—तालुके कल्याणभिंवडी, व तालुके नेरळ देखील परगणे नसरापूर, व तर्फ चोण, येथील पेशजीं रामाजी महादेव यांचे कारकीर्दींत सुटी पडल्या आहेत, त्यांची चवकशी माजी मामलेदारांनीं करून फडशा केला नाहीं, त्यास हल्लीं सुटीची चवकशी झाली पाहिजे, यास्तव याचा एख्तीयार तुह्मांवर आहे, तरी तुह्मीं बहुत रीतीनें चवकशी करून, कोणाची रुरयात न धरितां, रयतीस सूट पडोन दरम्यान ऐवज राहिला असेल, त्याचा बारीक शोध करून, लोभ न धरितां, व भीड संकोच न पडतां, सुटीचा ऐवज होईल तो साधावा. चवकशी करून हुजूर आणून समजाधाल त्याप्रमाणें फडशा होईल, दार असेल तो वसूल घेणें, नादार असेल तो हप्तेबंदी लाऊन वसुलांत आणणें, व केवळ बुडीत, व गयाळ असेल, व वसूल करावयासी ठिकाणच नाहीं असें असेल तें हुजूर आणून समजावणें. समजोन

अर्बा सबैन मया व अलफ रबिलावल २२

---

now reported that on inquiry he did not consider that the Feringee was much to blame, and recommended that as it was no use incurring the expense of feeding and guarding him, and as he was unable to find a surety, he might be set at liberty. The recommendation was accepted.

## VIII. Misconduct of Government officers and Jahágirdárs.

### FROM NÁRO APPÁJIS DIARY.

( 995 ) It was found that no inquires had been made by the former Mámlatdàr regarding the remissions granted from time to time to the ryots of Táluká Kalyán Bhiwandi and Táluká Neraḷ. A special officer was appointed to look into the matter. He was directed to make a very thorough and impartial inquiry and ascertain how much of the amount of sanctioned remissions had been

A. D. 1773-74.

फडशा करणें तो केला जाईल, ह्मणोन सालगुदस्तां हुजूरून करार जाला, त्यावरून सुटीची चवकशी करून, ऐवज घ्यावयाचा ठराऊन, दार, नादार, गयाळ, मयत यांचा झाडा तपशिलवार निवडून त्याप्रमाणें वसूल घ्यावा, तरी सरखोत, व फुटखोत पुढें सुटीचा कज्या राहिला नाहीं ह्मणोन कबजे मागतात, ह्मणोन तुह्मीं हुजूर विदित केलें; ऐशास सालमजकुरीं सुटीचे ऐवजीं मामलेदारापासून कर्जे रुपये ५०००० पन्नास हजार घ्यावयाचे करार केले आहेत, त्याप्रमाणें मामलेदार हुजूर भरणा करतील ते, व पेशजीं रामाजी महादेव, व दिनकर महादेव, यांजपासून सुटीचे ऐवजीं कर्जेदाखल रुपये ३५००० पस्तीस हजार सरकारांत घेतले आहेत ते, एकूण पंचायशी हजार रुपये ज्यांचे त्यांस पोहोंचले पाहिजेत, त्यास सालगुदस्तां सुटीची चवकशी तुह्मीं केली. त्यांपैकीं दार कुळांचा ऐवज वसूल घेऊन सालमजकुरीं पन्नास हजार रुपये मामलेदारांपासून घ्यावयाचा करार जाला आहे त्या ऐवजीं घेणें. नादार कुळांकडील तूर्त ऐवज यावयाचा नाहीं. त्यांचें जीवन पाहून हप्तेबंदी करून, तो ऐवज पेशजीं रामाजी महादेव, व दिनकर महादेव, यांजपासून पस्तीस हजार रुपये घेतले आहेत त्या ऐवजीं वसुलास नेमून देणें. नादारपैकीं एक दोन असामींचें फाजील सरकारांत मामलतसंबंधें येणें आहे, त्या ऐवजीं सुटीचा ऐवज त्या असाम्यांकडे ठरेल तो रदकर्जीं लिहिणें. गयाळ मयताचा झाडा हुजूर आणून समजावणें. सुटीपैकीं ज्या कुळांपासून वसूल घ्याल त्यांस पुढें सुटीचा लांझ्या राहिला नाहीं ह्मणोन जाब सरसुभ्याहून लिहून घेणें. येणेंप्रमाणें सुटीचा फडशा करून जाबता हुजूर समजावणें, त्याप्रमाणें विल्हेस लागेल. चवकशीमुळें पंचायशीं हजारांस ऐवज न पुरला तर, मागील मामलेदारांनीं सुटीपैकीं ऐवज साधणूक करून घेतला असेल, त्याची रुजुवात करून पस्तीस हजारांचें रदकर्जीं लिहिणें ह्मणोन, त्रिंबक विनायक सरसुभा प्रांत कोंकण यांचे नांवें. छ. १४ जिल्हेज.

सनद १.

रसानगी याद्री.

९९६ ( १८९ )—वेदशास्त्रसंपन्न राजश्री रघुनाथ दीक्षित यांचे नांवें कीं, मकाजी

---

collected from the ryots and misappropriated by the officers. In cases in which the person concerned in the fraud was able to repay the money misappropriated it should be recovered from him. If he was not able to pay, an agreement for the payment of the money by instalments should be taken. Cases in which the officers concerned were in extremely poor circumstances should be reported to the Government for orders.

A. D. 1774-75.

( 996 ) Makáji Teli of kasbá Khed owed some money to his creditors. They handed over the documents regarding the loan to Raghunáth Dixit. He forcibly recovered the

खमस सबैन मया व अलफ रबिलाखर ५

तेली, कजबे खेड, यानें हुजूर विदित केलें कीं, आपण सावकारांचें कर्ज देणें आहे. बारावयासीं आवाकांत नाहीं, असें असतां रघुनाथ दीक्षित यांणीं माझे सावकारांचीं खतें घेऊन मजला फार सक्त तगादा करून मजपासून ऐवज उगऊन घेतला.

६०० मल्हार भट पाठक, पुणेंकर, यांचे मुद्दल रुपये २०० त्याचा वसूल घेतला.
बरहुकूम.

३०० भटजीस दिले रुपये.
३०० दरम्यान आपण घेतले रुपये.

६००

४० महादेव भट दातार, खेडकर, यांचे मुद्दल रुपये २५ त्याचा वसूल तपशील.
१७ कान्हूचा कुणबी बनजाजी याचे मुद्दल रुपये १२ त्याचा वसूल.
३९ रामकृष्ण भट वैशंपायन यांचे मुद्दल रुपये १५ त्याचा वसूल.
१५ आपा सराफ, खेडकर, याचे मुद्दल रुपये १० त्याचा तपशील.

७११

एकूण सातशें अकरा रुपये वसूल घेतला, त्याची चवथाई सरकारांत द्यावी तेही न दिल्ही, आपणच मध्यें रुपये खाऊन मज गरीबास तसदी देतात. हल्लीं महिपतराव देशपांडे, चाकणकर, यांजपासून एकशेंचोवीस रुपयांचें माझें खत घेऊन, त्यांचें तीनशें रुपये देणें ह्मणोन तसदी केली आहे, याजमुळें मी परागंदा होऊन फिरतों. लोकांची खतें घेऊन यास तसदी न देणें, ह्मणोन पेशजीं सरकारचें पत्र सादर जाहलें असतां मानीत नाहींत, मजला जबरदस्तीनें बुडवितात. येविसींची आज्ञा जाहली पाहिजे ह्मणोन; ऐशीयास एकवेळ तुह्मांस सरकारांतून ताकीदपत्र सादर जाहलें असतां फिरोन लोकांचे कर्जाकरितां या गरीबास तगादा करून देशधुडी लाविला हे कोण रीत? दरमियान रुपयेही गरीबाचे खातां हें परिच्छिन्न, उत्तम नसे. हल्लीं हें पत्र सादर केलें असे, तरी या उपरीं असे तगादे एकंदर न करणें. पेशजीं सातशें अकरा रुपये वसूल घेतला आहे, त्यापैकीं दरम्यान

amount due but did not pay one fourth of it to Government. He further tried to compel Makáji to pass a bond for Rupees 300, in consideration of a sum of Rupees 124 obtained by him from Mahipatrao Deshpánde of Chàkan. Makáji therefore left the village and complained to the Peshwâ who issued orders to Raghunâth to stop oppressing the man. The orders were set at naught and the man complained again. Raghunáth Dixit was severely reprimanded for his conduct and was directed not

तीनशें रुपये घेतले आहेत ते, व बाकी चवथाई हुजूर पाठऊन देणें, येविशींचा बोभाट फिरोन हुजूर न येत असें करणें ह्मणोन. चिटणिशी. छ. २६ मोहोरम. पत्र १.

## मुतालिक ह्यांचे रोजनिशीपैकीं.

९९७ ( १ )—निंबाजी व तान्हाजी महाजन, कसबे नसिराबाद, परगणे मजकूर, यांणें हुजूर विदित केलें कीं, आपलें कर्ज काळो बाबाजी कुळकर्णी, कसबे मजकूर, यांजकडे येणें होतें तें नारो केशव, दिंमत कमाविसदार, परगणे मजकूर यांणी चौकशी करून चौथाई सरकारांत घेऊन आपलें कर्ज वसूल करून दिल्हें. त्यास हल्लीं नारो केशव दूर होऊन, मशारनिल्हेचे तर्फेनें हिराजी रणसोड परगणे मजकुरीं आले आहेत. ते कुळकर्णी मजकुराची बळासी करून कर्जापैकीं कुळकर्ण्याकडील ऐवज आपल्यास पावला आहे, तो माघारा देवितात. येविशीं ताकीद जाली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून हें पत्र तुह्मांस सादर केलें असे, तर वाजवी कर्ज असतां चवथाई सरकारांत घेऊन निकाल करून देविला, तो फिरोन मनास आणावयास प्रयोजन काय ? तर महाजनास कर्जाचा तगादा न करणें, व याखेरीज महाजनाचें कर्ज लोकांकडे येणें तें वाजवी मनास आणून चौथाई सरकारांत घेऊन कर्जाचा निकाल करून देवणें. फिरोन बोभाट येऊं न देणें ह्मणोन, हिराजी रणसोड, दिंमत महादाजी केशव कमाविसदार, परगणे मजकूर, यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

सुमस सबैन मया व अलफ साबान १२

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

९९८ ( ३४२ )—फकीर महमद माजी कमाविसदार, मौजे केम, परगणे वांगी, याज-

to molest the man and to remit to Government a fourth of the loan recovered by him.

## FROM THE MUTÁLIK'S DIARY.

( **997** ) A debt due to Nimbáji and Tànáji Mahájan of Nasirábàd from Kálo Bàbáji Kulkarni was recovered for them by Náro Keshav, an agent of the Kamávisdár, and a fourth of it was as usual credited to Government. Náro Keshav was subsequently recalled by the Kamávisdár and Hiráji Ransod was appointed in his place. Hiràji siding with the Kulkarni asked Nimbáji and Tánáji to restore to the Kulkarni the money levied by them. They applied to the Huzur. Hiràji was informed that his action in raking up an old matter was improper, and he was directed not to press Nimbáji and Tánáji to return the money.

A. D. 1774-75.

## FROM JANÁRDAN APPÁJI'S DIARY.

( **998** ) The Mokádams of Kem in Parganá Wángi laid a complaint

सबा सबैन मया व अलफ रमजान २९ — कडे तुह्मीं अन्याय लाऊन द्यावे, अन्याय लाऊन न दिल्यास रुपये पांच हजार रुपये गुन्हेगारी सरकारांत तुह्मीं द्यावी, याप्रमाणें सन खमस सबैनांत कबूल केलेंत; त्याजवरून कलमें लागूं करावयाची चौकशी कमळाकर भास्कर याजकडे सांगितली; त्यांणीं मनास आणितां कलमें लागूं न जाहलीं, तुह्मीं खोटे पडलेत, सबब सदरहू पांचहजारांची वरात राणूजी नाईक निंबाळकर यांची सालगुदस्त बापूजी जैन कमाविसदार, मौजे मजकूर, यांजवर करून ऐवज सरकारांत घेतला असे, तरी सदरहू पांच हजारांचे व्याजसुद्धां बापूजी जैन यांस पावते करून कबज घेणें ह्मणोन, मोकदम मौजे मजकूर यांस छ. १२ रजब. सनद १.

रसानगी अजमास.

९९९ ( ४६२ )—त्रिंबक कृष्ण व भवानी हरी कमाविसदार, तर्फ हवेली, प्रांत संगमनेर, यांस पत्र कीं, शिंपी, रंगारी, साळी वगैरे उदमी रयत कसबे संगमनेर यांणीं हुजूर विदित केलें कीं, कमाविसदाराकडून, व कसबे मजकूरचा केरोजी पाटील गुंजाळ यांजकडून आपल्यास जाजती उपद्रव लागतो, त्याचा बंदोबस्त सरकारांतून जाल्यास आमची नांदणूक होईल; नाहीं तरी होत नाहीं; त्याजवरून याचें वर्तमान मनास आणून कलमें करार करून दिलीं असेत. बीतपशील.

समान सबैन मया व अलफ जमादिलावल १०

| किता. | कलमें. | किता. | कलमें. |
|---|---|---|---|
| १ | कसबे मजकूरचे उदम्यांपासून गुदस्तां मोहोतर्फ्याशिवाय एकसालां पट्टी सरकारांत घेतली असतां सालमजकुरीं | १ | कसबे मजकूरचे उदमी बाजारास परगणे मजकुरीं जातात, त्यांस मना करूं नये. कलम. |

---

A. D. 1776-77. against the late Kamávisdár of the village, Fakir Mahomed, and agreed to forfeit Rs. 5000 to Government if they failed to substantiate it. Kamlákar Bháskar was then deputed to inquire into the matter, and he found that the charges were not true. The complainants were therefore directed to pay in the amount agreed upon.

( 999 ) The tailors, dyers, weavers and other traders of Kasbá Sangamner represented that they were much harassed by the Kamávisdár and by Keroji Pátil. The Kamávisdár was therefore addressed as follows:—

A. D. 1777-78.

( 1 ) The levy in the preceeding year from the traders, in addition to Mohotarf, was for one year only: It should not be made in the current year;

दुसरे पट्टीचा तगादा केला आहे तो न करणें; वसूल घेतला असेल तो माघारा देणें. कलम.

१ आंबराईचे कलमांचा ऐवज मागों नये; पुदामत याची चाल कशी आहे ते सरकारांत समजाऊन द्यावी; मनास आणून आज्ञा येईल त्याप्रमाणें वसूल घ्यावा, फडशा होई तोंपर्यंत वसुलाचा तगादा न करणें. कलम.

१ मोहोतफर्याशिवाय अलीकडे रुपये सहाशें काळीचे तोट्यास घेतां, त्यास त्याचें कारण सरकारांत समजाऊन द्यावें; मनास आणून आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करावी, याचा ठराव होई तोंपावेतों वसुलाचा तगादा न करणें. कलम.

३ हरएक बेगार कसबे मजकूरचा पाटील घेतो ते लाऊं नये.

१ हजीर बेगार.

१ काळीची बेगार हरएक कामाची कसबे मजकुरीं पडल्ये, ते काळीपासून घ्यावी, उदम्यांजवळ घेऊं नये.

१ तट्टु बैल बेगारीचे घेणें ते तर्फ हवेलीचे सरहद्देपावेतों घ्यावे, दूरचे बेगारीस घेऊं नये.

१ कापड व हराजिन्नस तुह्मीं घेतां, त्याची किंमत उदम्याचे निरखाप्रमाणें द्यावी.

(2) no amount should be levied on account of mango trees: the previous practice in this matter should be reported and orders would then be issued;

(3) explanation should be furnished as to why Rs. 600 were levied annually from the traders in addition to Mohotarf to make up the loss in the land revenue;

(4) the levy should be postponed till the matter was finally decided by Government;

(5) handkerchiefs should be taken from the dyers and tailors only once on the Dasará day, not monthly;

(6) the traders should not be prevented from attending other markets in the Parganá;

(7) the traders should not be compelled to render forced service for the following purposes:—

(a) for carrying furniture from one place to another,

(b) for purposes connected with land-revenue administration; similarly the traders should not be called upon to supply ponies and bullocks for service grátis, except when required for use upto the limits of Tarf Haveli and no further;

१ दसरेयाचे रुमाल शिंपी, रंगारी, यांजपासून दसऱ्यास द्यावयाचा कायदा आहे, त्याप्रमाणें एक वेळ घ्यावे; बारमाही रुमालांचा उपद्रव न करणें.
कलम.

१ तेलीयाची पेंड कसबे मजकुरीं विकत नाहीं, सबब बाहेर विकावयास नेतात; त्यास मुदामत जकात घ्यावयाचा शिरस्ता नसिल्यास न घेणें.
कलम.

१ सराफांपासून खुर्दा घेणें तो खरेदीचे निरखानें घ्यावा, सराफांस खुर्दा देणें तो विक्रीचे निरखाप्रमाणें द्यावा.
कलम.

३ किता कलमें.
  १ चरुरंगाचे सतेल.
  १ पडदा खादीचा.
  १ मेण.

तीन कलमें घेऊं नयेत.

१०

येणेंप्रमाणें चवदा कलमें लिहिल्याप्रमाणें करणें, व केरोजी पाटील यास अलाहिदा सरकारचें आज्ञापत्र सादर जाहलें आहे, त्याप्रमाणें पाटील मजकुरास वर्तवणें, जाजती उपसर्ग करूं न देणें. येविशीं फिरोन बोभाट येऊं न देणें ह्मणोन, चिटणिसी. पत्र १.

१००० ( ५४६ )—मोरोबा देव यांचें नांवें पत्र कीं, मौजे रांजणगांव, तर्फ पाबळ

---

( 8 ) full value according to the prices current, should be paid for any clothes or other articles purchased by the Kamávisdár;

( 9 ) if it should be the custom to exempt oil cakes carried by oilmen for sale elsewhere from octroi the custom should be respected. The Kamávisdár was directed to act up to these instructions himself and to see that they were obeyed by Keroji Pátil also and it was stated that complaints in these matters in future would not be tolerated.

( 1000 ) Morobá Dev, a Kamávisdár of Ránjangaum Tarf Pábal was

समान सबैन मया व अलफ सफर २६ — प्रांत जुन्नर, येथील निमे अंमलाची कमावीस तुम्हांकडे होती, त्यास तुमचें व गांवकरी यांचें बनत नाहीं, यास्तव कमावीस दूर करून विष्णु महादेव याजकडे सांगितली असे, तरी मशारनिल्हे अंमल करितील, तुम्हीं दखलगिरी न करणें म्हणोन, चिटणिसी छ. २८ जिल्हेज. पत्र १.

१००१ ( ५५१ )—पांडुरंग कृष्ण यांचे नांवें सनद कीं, परगणे लोहनेर, वाखारी, वोतूरपाळे, येथील तेजकरी यांचे रुजुवातीस तुम्हांस पाठविलें आहे, त्यास कोणाची रुरयात न करितां रुजवात चांगली करणें, फिरोन रुजवातीची चौकशी करावी लागेल असें न करणें; व सदरहू महालाचे साहुकार, वाणी, उदमी, यांजपासून कर्जपट्टी घ्यावयाची आज्ञा पेशजी तुम्हांस केली आहे, त्यास कर्जपट्टी जीवन पाहून वासुदेव नारायण व जगदीश व्यंकटेश कमाविसदार परगणे मजकूर यांचें विद्यमानें ठरावीत जाऊन वसूल घेणें. आजपर्यंत कर्जपट्टीचा ऐवज वसूल जाहला असेल तो हुजूर पाठवणें, व पुढें होईल तोही हुजूरच पाठवीत जाणें. या ऐवजावर वराता जाहल्या असतील त्यास ऐवज न देणें, म्हणोन. सनद १.

(समान सबैन मया व अलफ रबिलावल २२)

रसानगी यादी.

१००२ ( ७०४ )—निंबाजी देवजी देशपांडे आकोलेकर, निसबत महादजी शिंदे, यांणीं हुजूर विदित केलें कीं कसबे मजकूर येथें आमचे घरीं फाल्गुन वद्य पंचमीस सालगुदस्त लग्न जाहलें, ते दिवशीं शामाबाई ब्राह्मणबाईको पाहुण्यांचे स्वयंपाकास ठेविली होती; तिजला न्यावयासी गांवकरी, कमाविसदाराची परवानगी घेऊन आले, तेव्हां ती घराबाहेर निघाली; त्याजवर तिची अब्रू त्यांणीं घेतली, सबब तिणें प्राण दिल्हा; त्याचे चौकशीस हुजूर उभयतां

(इसन्ने समानीन मया व अलफ रजब २३)

---

A. D. 1777-78. — removed from office because he was not on good terms with the villagers.

( 1001 ) Pándurang Krishṇa was deputed to make full and impartial inquiry regarding peculations in Parganá Lohner, Wakhari, Woturpaḷe. He was also directed to recover *karjpaṭṭi* from merchants and traders. (A. D. 1777-78.)

( 1002 ) Nimbáji Dewaji Deshpànḍe of Akolá engaged Shámá a Brahmin woman, as a cook for a marriage--feast. One day, the village officers, under orders from the Kamávisdár came to take her away, and when she came out of the house, they outraged her modesty. She therefore committed suicide. Visáji Hari and Dhonḍo Náráyaṇ were sent from the Huzur to inquire into the matter. They levied from Nimbáji Rs. 100 as process fee, and in- (A. D. 1781-82.)

मशारनिल्हे यांस पाठविलें आहे, त्यास त्यांणीं, तिजला बाहेर काढून कां दिल्हें हें निमित्य ठेऊन मजपासून शंभर रुपये मसाला घेतला, व एक हजार रुपये गुन्हेगारीचे लाविले आहेत; त्यास ती मोलकरीण, तिजला आपण अडथळा कसा करावा; ती आपले संतोषें निघोन बाहेर गेली, येविशींचा अपराध मजकडे नाहीं, मसाला व गुन्हेगारी माफ केली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून मनास आणून रदबदलीमुळें गुन्हेगारीचा ऐवज मशारनिल्हेस माफ केला असे; तगादा न लावणें; शंभर रुपये मसाला घेतला आहे, त्यापैकीं पन्नास रुपये माघारी देविले असत; देणें, आणि यांचे घरीं माणसें बसविलीं असतील ते उठवणें ह्मणोन, विसाजी हरी, व धोंडो नारायण यांस. सनद १.

रसानगी यादी.

१००३ ( ७७४ )—गणेश बल्लाळ व हरी गणेश यांचे नांवें सनद कीं, तालुके अवचितगड व बीरवाडी येथील मामलत, बाबूराव पासलकर, व विश्वनाथ भास्कर यांजकडे होती, ते त्यांजकडून दूर करून सालमजकुरीं तुम्हांकडे सांगितली असे, तरी इमानें इतबारें वर्तोन अंमल चौकशीनें करणें. मामलत संबंधें कलमें.

सलास समानीन मया व अलफ सवाल १९

मामलत संमंधें तुम्हांपासून रसद सरकारांत घ्यावयाचा करार. रुपये.

| | | |
|---|---|---|
| २५००० | तालुके अवचितगड. | रुपये. |
| १०००० | तालुके बीरवाडी. | रुपये. |
| ३५००० | | |

बाबूराव पासलकर व विश्वनाथ भास्कर यांजकडे तीन सालां मामलत होती. त्यास जमाखर्चाची, व कमाविसीची वगैरे कुलकलमांची चौकशी करून द्यावयाची राव्जी पांडुरंग यांणीं करार केला आहे, त्याऐवजी तुम्हांपासून रुपये २०००० वीस

flicted on him a fine of Rs. 1000, on the ground that he turned the woman out of his house. He complained to the Peshwà, urging that the woman left his house of her own accord, and that he had no power to stop her. The fine was remitted and half the amount of the process fee was ordered to be refunded.

( 1003 ) The Màmlat of Táluká Avchitgaḍ and Birwáḍi was taken away from Báburao Pásalkar and Viswanáth Bháskar and conferred on Gaṇesh Ballál and Hari Gaṇesh. The salary of the office was Rs. 2209 The previous Mámlatdárs held office for three years and it was alleged by Ráwji Pándurang that they had during that period obtained by false accounts and by

A. D. 1782-83.

याशीं मुदती.
२५००० श्रावण वद्य पंचमी.
५००० भाद्रपद वद्य पंचमी.
५००० अश्विन वद्य पंचमी.

३५०००

एकूण पस्तीसहजार रुपये सदरहू मुदतीप्रमाणें सरकारांत भरणा करून पावलीयाचा जाब घेणें. कलम १.

तुम्हांस वेतनाची नेमणूक माजी मामलेदाराप्रमाणें. रुपये.
१७५९ तालुके अवचितगड येथील मामलतींचें वेतन रुपये.
१७५० नक्त मोईन पालखीसुद्धां. रुपये.
९ तेल दिवटीस दरमहा वजन पक्के ८८३॥। प्रमाणें बारमाही वजन पक्के ८१८५
दर रुपयास वजन ८८५ प्रमाणें. रुपये.

१७५९
४५० तालुके बीरवाडी येथील मामलतींचें वेतन.

२२०९

एकूण दोन हजार दोनशेंनऊ रुपये सालमजकूर अवल सालापासून करार असेत. घेत जाणें. कलम १.

हजार रुपये सरकारांत घ्यावयाचे करार केले असेत, तर भाद्रपद वद्य पंचमीचे मुदतीनें सरकारांत भरणा करून पावलीयाचा जाब घेणें. करारप्रमाणें तफावत लागूं जांहाली तर सदरहु वीस हजार रुपये मामलतीकडे रसदेंत जमा धरून तुम्हांस पावतील. रुजुवातमुळें ऐवज विसाहजारांस कमी जाल्यास तितका ऐवज तुह्मांस देऊं नये. अजीच तफावत लागूं न जाली तरी अगदींच ऐवज तुह्मांस देऊं नये. सरकारांत कमावीस जमा धरावा. कलम १.

माजी मामलेदाराचे निसबतीस दोन कारकुनांच्या आसाम्या होत्या, त्या तुह्मांकडे करार केल्या असे. तर तुह्मीं आपले कारकून ठेऊन, चाकरी घेऊन, नेमणुकेप्रमाणें वेतन देत जाणें. कलम १.

सालमजकुरीं तुह्मांपासून रसद घेतली आहे, हा ऐवज तुमचा व्याजसुद्धां फिटे तोंपर्यंत मामलतीची घालमेल होणार नाहीं. कलम १.

माजी मामलेदाराकडे ईस्तकबिल सन समानीन तागाईत सन इसन्ने समानीन एकूण तीन सालां मामलत होती, तेथील इजमाहाली वहिवाटी दुसालां सरकारांत आल्या, व एकसालां येणें आहे, त्यांत जमाखर्चांत वगैरे चाळीस हजार रुपये माजी मामलेदार व महालकरी यांजवर तफावत लागू करून घावयाचा करार केला

appropriation of fines &c. Rs. 40000. The Mámlatdárs accounted for Rs. 19474 as the amount paid as secret money. Ráwji Pándurang was

रसदेस व्याज एकोत्रा शिरस्तेप्रमाणें करार केलें असेत. तरी हिसेब बमोजीम मजुरा पडेल. कलम १.

तालुके मजकरचे लोकांची हजिरी घेऊन, गाहाळ, नाकारे माणूस असेल तें दूर करून चांगलें माणूस त्याचे ऐवजीं त्या शेऱ्यांत ठेऊन, जाबता हुजूर पाठवणें. कलम १.

माजी मामलेदाराकडे दोहों तालुक्यांपैकीं खोतीनें गांव असतील, ते तुह्मीं आपले हवालीं करून घेऊन, जमाबंदीप्रमाणें वसूल तालुके मजकुराकडे घेत जाणें. कलम १.

पालखीचे व आफ्तागिराचे सामानाबद्दल. रुपये.

१५० पालखीस.

२५ आफ्तागिरांस.

---

१७५

एकूण पावणे दोनशें रुपये एकसालां तालुके मजकूरपैकीं घेणें. कलम १.

माजी मामलेदारांनीं अंतस्ताची गोष्टी सांगून सरकारांत आणून दिल्ही आहे; त्याखेरीज बशर्त वीस हजार रुपये तफावत लागू करून द्यावयाचा करार रावजी पांडुरंग यांणीं केला आहे, सबब त्यांस बक्षीस रुपये २००० दोन हजार रुपये, वीस हजार तालुके तफावत लागू करून दिल्यास सरकारांतून बक्षीस दिल्हे जातील. कलम १.

हुजुरून कारकून रुजुवातीस जाईल, त्याचे विद्यमानें सहा महिन्या अलीकडे आहे, तर जमाखर्चांत वगैरे चौकशी करून सदरहू चाळीस हजार रुपये लागू करावे. त्यापैकीं माजी मामलेदारांनीं तीन सालां मिळोन अंतस्ताची याद पेस्तर १९४७४। एकुणीस हजार चारशें सवा चवऱ्याहात्तर रुपयांची, व याखेरीज सालाबादी दरबारखर्चाची याद लिहून दिली आहे, त्यास दरबारखर्चाची याद खेरीज करून, अंतस्ताचे यादींचे रुपये तुह्मांस चाळीस हजारांत मजुरा देऊन, बाकी वीस हजार पांचशें पावणे सव्वीस रुपये लागू करून द्यावे त्यांत बशर्त वीस हजार रुपये सरकारांत तुह्मांपासून घ्यावयाचे करार केले असेत, त्यांस रुजुवातमुळें तफावत लागू होईल तितका ऐवज विसा हजारांत तुह्मांस पावेल; रुजुवातीमुळें जाजती ऐवज विसा हजारांशिवाय जाहल्यास सरकारांत घेतला जाईल, व कमी विसाहजारांस जाल्यास तितका ऐवज तुह्मांस देऊं नये. कलम १.

दोहों तालुक्याचे बेहडे अलाहिदा होतील, त्याप्रमाणें वर्तणूक करणें. बेहडेयांस उफाल ऐवज राहील, तो तुह्मीं रदकर्जी घेत जाणें. कलम १.

directed to prove the charge in regard to the remaining amount of Rs.

रुजुवात करावी. आकस आदावत कोणाची करूं नये. कलम. १.

माजी मामलेदार यांचे निसबतीचे लोक व कारकून असतील त्यांपैकीं गैर उपयोगी असतील ते दूर करून, चांगले सरकार उपयोगी पाहून ठेवणें. कलम १.

एकूण चौदा कलमें करार करून हे सनद सादर केली असे, तरी सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें म्हणोन. सनद १.

रसानगी यादी.

१००४ ( ८१० )–तर्फ राहुरी, परगणे संगमनेर, येथील मामलत जनार्दन बाहिरव व

अर्बा समानीन मया व अलफ. साबान १५

भिकाजी धोंडदेव यांजकडे होती, त्या सालची तफावतीची रुजवात नरसिंगराव बल्लाळ सरसुभा, प्रांत गंगथडी, यांणीं केली आहे; त्याबेरीज तुम्ही पांच हजार रुपये जाजती मशारनिल्हेकडे लाऊन द्यावयाचे करून, सरसुभा मुचलका लिहून दिला आहे; त्याचे रुजवातीस, व रयत फिर्याद आली होती त्याचे चौकशीस हुजुरून राघो नारायण कारकून शिलेदार यांस पाठविले आहेत त्यांस, व त्यांजबरोबर प्यादे व जासूद दिल्हे आहेत त्यांस रोजमरा साल गुदस्त सन सलास समानीन पासून रुपये.

५० राघो नारायण कारकून शिलेदार यास रोजमरा दुमाही छ. १ जमादिलाखरापासून.

२१॥ रोजमरा दीडमाही. रुपये.

१५॥ प्यादे दिंमत जयाजी नाईक गोवेकर यांस छ. १० जमादिलाखरापासून. रुपये.

८॥ विठोजी बुधजी पेडणेकर.

७ शिवजी नेवाजी म्हाले.

१५॥

---

20000 and was promised a reward of Rs. 2000 if he succeeded in doing so.

(1004) The Sirsubhá of Gangathaḍi made an inquiry into the

A. D. 1788-84.

mis-appropriation committed by Mámlatdárs, Janárdan Bahirao and Bikáji Dhondeo of Tarf Ráhuri in Parganá Sangamner. Wásudeo Rámkrishṇa offered to bring home to the

६ कृष्णाजी पवार जासूद जथे आणाजी नाईक यास. छ. २० जमादिलाखरापासून . रुपये.

२१॥

७१॥

एकूण साडे एकाहत्तर रुपये रोजमरा सदरहू तेरखांपासून देविला असे. तरी मशारनिल्हे तेथें रुजुवार्तीचे व चौकशीचे कामांस राहतील, तों पावेतों दुमाही व दीडमाही मिळोन साडेएकाहत्तर रुपये रोजमरा तर्फ मजकूरपैकीं देत जाणें ह्मणोन, वासुदेव रामकृष्ण कमाविसदार, तर्फ मजकूर यांचे नांवें. सनद १.

रसानगी यांदी.

१००५ ( ८४७ )—परगणे मनोर व कारखाना कोलई येथील मामलत सुभाहून, व

अर्बा समानीन मया व अलफ रजब १२

तर्फ आगाशी येथील फडणिशी बाळाजी विठ्ठल फडके याजकडे होती, त्या सबंधें आपाजी लक्ष्मण पेंढारकर याणीं तफावतीची यादी लिहून दिल्ही. त्याची हुजूर चौकशी होऊन, त्यांत लोकांचा ऐवज फडके यांणीं जबरदस्तीनें घेतला होता, सबब ज्याचा त्यास माघारा द्यावयाचा केला, त्या पैकीं नारो राम फडके यांजकडे कांहीं लांड्या नसतां भात, गुरें, ढोरें, वस्तवानी, जरा बाजरा जप्त करून, बाळाजी विठ्ठल यांणीं नेली; त्यापैकीं मशारनिल्हेनीं कबूल केले त्याप्रमाणें रुपये ११०८।≈ पैकीं चौथाई सरकारांत घ्यावयाचे ते वजा रुपये २७७≈, बाकी रुपये ८३१। आठशें सवा एकतीस रुपये देविले असेत. तरी फडके यांजकडील तफावतीचे ऐवजापैकीं तुह्मीं हवाला घेतला आहे, त्याऐवजीं नारो राम यांचे पुतण्ये गोविंद बल्लाळ

---

Mámlatdárs misapropriation of Rs. 5000 which had escaped the notice of the Sirsubhá. A kàrkoon was sent from the Huzur for inquiry.

( 1005 ) Appáji Laxman Pendhárkar complained of extortion

A. D. 1783-84.

committed by Báḷáji Viṭhal Fadke during his term of the office of Mámlat of Parganá Manor and of the office of Faḍnis of Tarf Agáshi, and gave in a memo of the sums extorted. An inquiry was made at the Huzur and the complaint was found to be true. The money extorted from different persons was ordered to be refunded to them. In one case Báḷáji Viṭhal had, as admitted by him, confiscated without any reason property worth Rs. 1108-7 belonging to Nắro Rám Fadke. A fourth part of the sum was

फडके यांस पावते करून, पावलीयाचें कबज घेणें ह्मणोन, बाळकृष्ण हरी गद्रे व परश-
राम नारायण सोवनी यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी, तफावतीची एकंदर.

१००६ ( ८५४ )—परगणे एरंडोल वगैरे महाल, देखील परगणे पाचोरे व वरण-
खमस समानीन मया व अलफ रमजान १८
ग्रांव, येथील मामलत घनःशाम त्रिंबक यांजकडे इस्तकबील सन तिसा सबैन तागाईत सन सलास समानीन एकूण पांच सालां होती, त्यास मशारनिल्हेकडे तफावतीचा ऐवज जमीदाराचे कारभाऱ्यांनीं लागू करून द्यावयाचा करार केला आहे, त्याचे रुजुवातीस हुजुरून महादाजी रामचंद्र, व नारो-बाजीराव कारकून शिलेदार यांस पाठविले आहेत, व बराबर जासूद व प्यादे दिल्हे आहेत, त्यांस रोजमरा. रुपये.

२०७ दुमाही. रुपये.

१६१ कारकून.

१११ महादाजी रामचंद्र यांस छ. १५ जमादिलाखर साल-गुदस्तां सन अर्बापासून. रुपये.

१०० खुद्द.

११ दिवट्या, आफ्तागिऱ्या मिळोन असामी २ रुपये.

१११

५० नारो बाजीराव यांस छ. १५ सवालापासून.

१६१

४६ प्यादे दिंमतहाय यांस छ. १ सवालापासून. रुपये.

२८ दिंमत सुर, सावंत.

७ तुकोजी राणोजी गोळे.

६॥ नानोजी तानाजी सपस.

ordered to be credited to Government and the rest to be refunded to the owner.

( 1006 ) The office of Mámlatdár of Parganá Erandol, Páchore, Warangaon &c. was held by Ghanashám Trimbak for 5 years. The agents of the Jamindárs having offered
A. D. 1784-85.

७॥ भगवंत निसणस.
७ पदाजी धुमाळ.

२८

१८ दिंमत रामजी यादव. रुपये.
६ गण सावंत.
६॥ खंडोजी जगथाप.
५॥ यमाजी माहाडीक.

१८

४६

२०७

२६ जासूद जथेहाय यांस दीडमाही छ. १ साबानापासून. रुपये.
६॥ कान्होजी खंडोजी जथे निंबाजी नाईक उंबरे.
६॥ संताजी लक्ष्मणजी जथे बयाजी गणजी.
१३ जथे लिंगोजी नाईक.
६॥ संताजी भिवजी.
६॥ मळोजी तुकोजी.

१३

२६

२३३

एकूण दोनशेंतेहेतीस रुपये रोजमरा दुमाही व दीडमाही तेरा असामींस सदरहू तेरखांपासून देविला असे, तरी तेथें रुजुवातीचे कामास राहातील तोंपावेतों देत जाणें ह्मणोन, भिकाजी विश्वनाथ कमाविसदार परगणे एरंडोल वगैरे महाल यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

---

to bring home to him certain misappropriation of money, two karkuns were sent from the Huzur to inquire into the matter.

१००७ ( ८६७ )–समस्त ब्राह्मण व रयत मौजे माणकेश्वर, परगणे भूम, यांणीं हुजूर विदित केलें कीं, मौज मजकूर हा गांव सेख आबुबकर पीरजादे याजकडे आहे; त्यास आमचा हिंदुधर्म चालों देत नाहीं, ब्राह्मणांचे अग्निहोत्रांस नानाप्रकारचें उपद्रव करितो, व ब्राह्मणसंतर्पणसमईं पंक्तींतून हाडें टाकावीं, ब्राह्मणस्त्रिया पाणी आणावयास जातात त्यांस स्पर्श करावा, गांवांत हरीकीर्तन केल्यास कुफराणा करितात ऐसें ह्मणोन धोंडेमार करावा, लग्नाची मिरवणूक होऊं देत नाहीं, कुणब्यांच्या बायका बळेंच घरांत घालून बाटविल्या, गांवांत दारूच्या भट्या नेहमीं लावितो, व महावधाचीं कर्में करितो, व वतनदारीचीं मिराशी शेतें घेतलीं आहेत व देवळाचे धोंडे काढून आणिले, गावांत देवघेव करूं देत नाहीं, हिंदु धर्माचा उच्छेद करून पीडा बहुत केली आहे, त्यास स्वामींनीं कृपाळू होऊन येविशींचा बंदोबस्त केला पाहिजे ह्मणोन, त्याजवरून पीरजादे याची वर्तणूक सुधी नाहीं, याजकरितां मजकूरचा स्वराज्याचा अंमल पीरजादे याजकडे आहे, तो जप्त करून जफ्तीची कमावीस तुह्मांस सांगितली असे. तरी स्वराज्याचा अंमल, मुकासा बाबती, सावोत्रा, घासदाणा, व हुजूर चौथाई व सुभेखर्च सुद्धां जप्त करून, मौजे मजकुरीं ठाणें बसऊन, हिंदुधर्म चालऊन समस्त ब्राह्मणांस व रयतेस उपद्रव लागों न देणें; आणि स्वराज्याचे अंमलाचा आकार होईल तो सरकारांत पावता करून जाब घेत जाणें ह्मणोन, आपाजी बनाजी, निसबत गोविंद भगवंत पिंगळे, यांचे नांवें.

खमस समानीन मया व अलफ सफर १२

सनद १.

रसानगी यादी.

पीरजादे याजकडे मौजे मजकूर येथील स्वराज्याचा अंमल आहे याचा दाखला दफ्तरीचा निघाला नाहीं, परंतु जफ्ती करावयाकरितां सनद लिहून दिल्ही. पुढें मोकळीक होते समईं दाखला पाहून मोकळीक करावी.

परवानगी रूबरू.

( 1007 ) The Brahmins and ryots of Máṇkeshwar in Parganá Bhum complained that the village was in the possession of Sayad Abubakar Pirjáde, that he obstructed the Brahmins in their sacrifices, that he threw bones in the midst of Brahmins while dining, that he touched Brahmin women while going to draw water, that he stopped marriage processions that he forcibly took away kunbi women and polluted them, that he opened liquor distilleries, that he removed stones from temples, that he did other acts calculated to subvert the Hindu religion. His amal in the village was therefore attached.

A. D. 1784-85.

१००८ ( ८८३ )—प्रांत कल्याणभिंवडी येथील मामलत तुह्मांकडे आहे, त्यास परगणे गोरठ, खेरीज तर्फ सुर्याराव करून, व तर्फ कोरकडा, प्रांत भिंवडी, या हरदु महालांत सालाबादशिवाय जाजती पट्या करून वगैरे ऐवज तुह्मीं घेतला, व महालकरी यांणीं घेतला आहे, तो माघारे देवावा ह्मणोन जमीदार यांणीं हुजूर येऊन अर्ज केला, व यादी समजाविली; त्यावरून रयतेचें हरद्र मनास आणून इस्तकबील सनं समानीन तागाईत सन सलास समानिनच्या सालांत गैरवाजवी, जमीदार, व रयतेपासून ऐवज घेतला आहे त्यापैकीं माघारा द्यावयाचा त्याचीं वगैरे कलमें.

खमस समानीन
मया व अलफ
जमादिलावल २९

× × × ×

एकूण चार कलमें करार करून, हे सनद सादर केली असे, तरी सदरीलप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, गोविंद राम यांचे नांवें. सनद.

रसानगी यादी.

## मुतालिकांचे रोजकीर्दीपैकीं.

१००९ ( २४ )—गिरमाजी लक्ष्मण कुळकर्णी, परगणे मजकूर, याची मूल नरसो आणांजीनीं लग्न करावयाकरितां पळऊन नेली, हें वर्तमान मुलीच्या आईनें कसबे मजकूरच्या गांवकरांस सांगितलें असतां, त्यांणीं मुलीचा शोध केला नाहीं, ह्मणोन व्यंकाजी राम यांणीं हुजूर विदित केलें, सबब कसबे मजकुरास शंभर रुपये मसाला करून तुह्मांस पाठविले असतां, गांवकरी हुजूर आले, त्यांचे व व्यंकाजी राम याचे रुजुवातीनें सदरहूचा मजकूर मनास आणितां, मूल पळऊन नेली हें गांवकरांस सांगितलें नाहीं, असें ठरलें; त्याजवरून मसाला मना करून हें

समान समानीन
मया व अलफ
सवाल १

( 1008 ) The Mámlatdár of Pránt Kalyáṇ Bhiwaṇḍi was accused by the Jamindárs of having levied unauthorized cesses and having otherwise extorted money from the ryots. The money so collected was ordered to be refunded to the parties concerned.

A. D. 1784-85.

## FROM THE MUTÁLIK'S DIARY.

( 1009 ) Narso Aṇṇáji kidnapped a daughter of Girmáji Laxmaṇ kulkarṇi of Sawarde in Pránt Miráj with a view to marry her. It was reported to Government that the girl's mother complained about the matter to the village officers but that they made no inquiries. They were sent for and a process fee of Rs. 100 was imposed. They came to the Huzur and proved that no

A. D. 1787-88.

आज्ञापत्र सादर केलें असे, तरी गांवकरी यांस मसाल्याचा तगादा न करितां उठोन येणें ह्मणोन, गाडदी, दिंमतहाय, कामगारी कसबे सावर्डे प्रांत मिरज यांस छ. १ रोजीं मनाचिठ्ठी १.

१०१० ( ९९१ )–प्रांत जुन्नर येथील मामलत रामराव त्रिंबक याजकडे इस्तकबील सन सबा सबैन तागाईतं सन सबा समानीन, अकरा सालें होती. त्यास मामलेदार व महालकरी, व फुटगांवचे कमाविसदार, यांणीं हिशेब व अंतस्ताच्या यादी लेहून दिल्ह्या आहेत, त्याशिवाय तफावत लागू करून देऊं, याप्रमाणें बाबाजी रघुनाथ जोशी, चाकणकर, यांणीं कबुलात लेहून दिल्ही आहे, त्याचे रुजुवातीस सरकारांतून भिकाजी राम कारकून, निसबत राघो विश्वनाथ पाठविले आहेत, यांस व बरोबरचे लोकांस रोजमरा. रुपये.

तिसेन समानीन मया व अलफ रमजान १६

१६३ रोजमरा एकमाही छ. १ रमजानचा वगैरे.
१५५ दिंमत सकुल्लाखान.
३५ भिकाजी राम कारकून यास.
२५ जातीस.
१० खेरीज तैनात माणसांस. छ. १ सवालचा.
६ ब्राह्मण असामी १
४ पोरगा असामी १

---

१०

---

३५

१२० गाडदी असामी १० दर १२ प्रमाणें.

---

१५५

८ लोक माजी सातारकर असामी दोन एकूण.
४॥ लक्ष्मण बगदर, दिंमत संक्राजी बगदरे.
३॥ संताजी माळगुरे, दिंमत शेकोजी फडतरे.

१६३

---

complaint about the kidnapping of the girl had ever been made to them. The process-fee was therefore remitted.

( 1010 ) The Mámlat of Junnar was held by Rámrao Trimbak, for 11 years. Bábáji Raghunáth Joshi of Chákan offered to prove that accounts rendered by the Mámlatdár,

A. D. 1788-89.

१३॥ जासूद जथेहाय, यास रोजमरा दीडमाही छ. १ रमजानचा.
६॥ मानाजी नारायणजी जथे निंबाजी नाईक उंद्रे.
७ जोत्याजी सुतानजी, जथे हरजी नाईक.

१३॥
४ दिंमत पागा हुजूर पैकीं पोरगा असामी १ यास रोजमरा दुमाही छ. १ सवालचा.

१८०॥

एकूण एकशें साडेऐशी रुपये सदरहू तेरखांचा रोजमरा देविला असे, तरी देणें. पुढें रुजुवातीचे कामास राहतील तोंपर्यंत रोजमरा एकमाही, व दीडमाही, व दुमाही, तेरीख भरलीयावर सदरहूप्रमाणें. याखेरीज मशारनिल्हेस हुजूरपागेपैकीं घोडी बसावयास दिल्ही आहे, तीस चंदी दररोज कैली ८८१ एक पायली, महिन्याच्या एकादशा दोन वजा करून एक हिसा हरभरे व दोन हिसे बाजरी, सनद पैवस्तगिरीपासून प्रांत जुन्नर येथील ऐवजीं देत जाणें ह्मणोन, आनंदराव विश्वनाथ यांचे नांवें. सनद १.

रसानगी याद.

१०११ ( १०४८ )–तालुके उंदेरी येथील मामलत महादाजी कृष्ण यांजकडे होती त्यास मामलेदार, व निसबतीचे कारकून, व दरकदार वगैरे यांजकडे तफावत लक्ष्मण विठ्ठल यांणीं लागू करून द्यावयाचा करार केला, त्याचे रुजवातीस कृष्णाजी नारायण कारकून पाठविले. त्यांणीं रुजवात लेहून आणिली, त्याचा फडशा होऊन दरकदार वगैरे कारकुनांकडून ऐवज सरकारांत घ्यावयाचा ठरला. रुपये.

इसन्ने तिसैन मया व अलफ सवाल १२

| | |
|---|---|
| ४२२।≈ | लक्ष्मण आपाजी दिवाण. |
| १८६॥≈ | सदाशिव नारायण मजमदार. |
| २११२॥≈। | विठ्ठल पांडुरंग, निसबत फडणीस. |
| ५॥≈॥ | बाळाजी त्रिंबक. |
| ३३२८≈॥ | महालकरी निसबतवार. |
| ४५ | त्रिंबक नारायण. |

the District officers and the Kamâvisdárs of villages during the above period were incorrect and that more money was received than brought to account. A kárkun was sent from the Huzur to inquire into the matter.

( 1011 ) Laxman Vithal charged the Mámlatdár of Underi and

| | |
|---|---|
| ३१।≡ | अबाजी हरि. |
| ४२३। | माजी रायगडकरी लोक तालुके मजकुरीं आहेत त्यांजकडे. |
| ३४९।।।≡।। | भास्कर गणेश दप्तरदार. |
| ८०।।।≡। | शामजी कृष्ण. |
| १५१।। | वासुदेव लक्ष्मण. |
| ६।।। | बापूजी मुकुंद. |
| १२२।≡ | दामोदरभट ह्मसकर. |
| १९।- | नारो रघुनाथ. |
| ३०८।≡।। | गणेश बल्लाळ ओक. |
| ७० | बाळकृष्ण चिमणाजी. |
| ४३८।।≡।।। | कुळकर्णी गांवगन्नाचे यांजकडे कसरेपैकीं. |
| २३।।।- | बच्याजी बल्लाळ. |
| ७ | सीदी अल्ली. |
| ३६५।। | जनार्दन नारायण ओक. |
| ३६३।।।≡ | विठ्ठल भिकाजी कारखानीस. |
| ८७।।। | पांडुरंग विश्वनाथ. |
| ९ | भवानजी विश्वासराव हवालदार. |
| १९।।≡ | गोपाळ नारायण. |
| २५ | दादाजी मुकुंद कुळकर्णी अवसरकर. |
| ९७।- | रामजी जाधव. |
| १० | निळो येशवंत पोतनीस. |
| १५ | लक्ष्मण विठ्ठल यास घडीयाळ नाकारे आहेत, देऊन घ्यावे. |
| २३०।।।≡ | गोविंद नारायण सबनीस. |
| ६३६२८।। | |

एकूण सहाहजार तीनशेंबासष्ट रुपये अर्धा आणा कारकून वगैरे यांजकडून वसूल घ्यावयाचे करून, हे सनद सादर केली असे, तरी सदरहूप्रमाणें वसूल घेऊन, तालुके मजकूर येथील सन इसन्ने तिसैन सालमजकूरचे लोकांचे रोजमरे याचा ऐवज देणें आहे त्या ऐवजीं देऊन, झाडा हुजूर समजावणें ह्मणोन, लक्ष्मण कृष्ण यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी, तर्फ उंदेरी येथील तफावतीचे फडशाची.

A. D. 1791-92. the Darakdárs with having misappropriated certain sums of money. Inquiry was made and various sums, amounting in all to Rs. 6362, were ordered to be recovered from the persons concerned.

# सवाई माधवराव पेशवे
# यांची रोजनिशी
## ( भाग ६ वा. )
## ९ इनाम, नक्तनेमणुकी, वतनें वगैरे.
### ( अ ) देणग्या.
### ( १ ) नोकरी केल्याबद्दल, अगर नुकसानी झाल्याबद्दल अगर मेहेरबानीदाखल.

१०१२ ( २१ ) माजी लोक, रायगडकरी व माहाडकरी सालगुदस्तां किल्ले रायगडचे लढाईंत ठार जाहाले, त्यांचे मुलांस बालपर्वेसी सालमजकुरापासून मोईन सालीना.

अर्बा सबैन
मया व अलफ.
सवाल २८

| रायगडकरी. | नक्त रुपये. | गल्ला भात. साडे तिशेरी. |
|---|---|---|
| वडोजी येरडकर, बाजी येरडकर याचा लेक, उमर वर्षे ९. | १५ | ·।।।· |
| रामजी माहाडीक, धर्मोजी माहाडीक याचा लेक, उमर वर्षे, १० | ८ | ·।।· |
| येसजी वानरा, कुसाजी वानरा याचा लेक, उमर वर्षे, ५ | ८ | ·।।· |
| कृष्णाजी बारणे, संताजी बारणा याचा लेक, उमर वर्षे, ५ | १५ | ·।।।· |

IX Grants and continuance of Ináms, allowances, watans &c.

( A ) Grants.

( 1 ) For service done or injury received or as a mark of favour.

( 1012 ) In the battle of Ráygaḍ fought during the preceeding

माहाडकरी.

| | | |
|---|---|---|
| तान्हाजी कदम, धोंडजी कदम याचा लेक, उमर वर्षे, १० | १० | ·॥· |
| गंगाजी उमरकर, रामजी उमरकर याचा लेक, उमर वर्षे, ५ | ८ | ·॥· |
| गुणाजी मोरे, मोतजी मोरे याचा लेक, उमर वर्षे, ६ | ८ | ·॥· |
| ७ | ७२ | ४। |

एकूण सात असामी बालपर्वेसी, सालीना मोईन नक्त बहात्तर रुपये, व गल्ला साडेती-सेरी बारुलें मापें भात सवाचार खंडी करार केलें असे, तरी तालुके रायगडपैकीं पावीत जाणे ह्मणोन, गणपतराव कृष्ण यांचे नांवें. सनद.

रसानंगी यादी.

## नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

१०१३ ( ८२ ) संभाजी वल्लद ब्रह्माजी पाटील खोकराळा, मौजे हिंवरें, तर्फ नारा-यणगांव, प्रांत जुन्नर, याणें हुजूर येऊन अर्ज केला कीं, जंजीरे वि-जयदुर्ग सरकारांत घेतला ते वेळेस आपण सरकारचाकरी एकनिष्ठ-पणें केली; यास्तव श्रीमंत कैलासवासी नानासाहेब मेहेरबान होऊन आपल्यास मौजे मजकूर येथें धरण बांधिलें आहे, त्याचे पोटची जमीन साडेचार बिघे इनाम देऊन, सरकारचीं पत्रें करून दिलीं होतीं, त्याप्रमाणें जमीन इनाम आपलेकडे चा-लत आहे, परंतु सन सलास सितैनांत मोगलाचा दंगा जाहला, त्यांत जमीनीचीं इनामपत्रें आपले जवळून गहाळ जाहलीं, याजकरितां सरकारांत येऊन अर्ज करून प्रांत मजकूरचे सुभास पेशजींप्रमाणें जमीन चालवण्याविशीं सन अर्बा सितेनांत पत्र नेलें, त्याजवरून त्याणीं मनास आणून पेशजींपासून भोगवटा चालत आहे त्याबरहुकूम चालवणें, ह्मणून सुभाचीं पत्रें करून दिलीं आहेत; त्याप्रमाणें जमीन चालत आहे, परंतु आपले जवळ भोगवटियास सरकारचीं पत्रें नाहींत, याजकरितां साहेबीं मेहेरबान होऊन सरकारचीं पत्रें भोगवटियास

खमस सबैन मया व अलफ. जमादिलाखर २९

---

A. D. 1773-74. year, some men from fort Ráygaḍ and some from Maháḍ were killed. Allowances were given to their infant sons.

### FROM NÁRO APPÁJI'S DIARY.

( 1013 ) The late Peshwá Nánásáheb granted to Sambháji wd.

करून दिलीं पाहिजेत, ह्मणून; त्याजवरून मनास आणतां यार्णे सरकारचाकरी एकनिष्ठपणें केली, यास्तव यास तीर्थरूप कैलासवासी नानासाहेब यांणीं जमीन इनाम देऊन पत्रें करून दिलीं होतीं, त्यास सन सलास सितैनांत मोंगलाचा दंगा जाहला त्यांत याजवळून पत्रें गहाळ जाहलीं; त्याजवर सरकारांत येऊन अर्ज करून सरकारचें पत्र प्रांत मजकूरचे सुभास सुदामतप्रमाणें चालवावयासी घेतलें, त्याजवरून सुभाहून सदरहू जमीन चालत आल्याप्रमाणें चालवणें ह्मणोन भोगवटियास पत्रें करून दिलीं आहेत. तीं यानें हुजूर आणून दाखविली. ती पाहून व भोगवटा मनास आणून याजवरी मेहेरबान होऊन, मौजे हिंवेरं, तर्फ नारायणगांव, प्रांत मजकूरपैकीं धरणाचे पोटची जमीन पेशजींची बिघे ८४॥ साडेचार बिघे स्वराज्य व मोंगलाई एकूण दुतर्फा बंदोबस्त, कुलबाब कुलकानू, हलीं पट्टी व पेस्तर पट्टी देखील इनाम तिजाई खेरीज हक्कदार करून इनाम दिल्ही असे, तरी सदरहू साडे चार बिघे जमीन चतुःसिमापूर्वक पेशजींप्रमाणें यास, व याचे लेकराचें लेकरीं इनाम चालवणें, दरसाल ताजे सनदेचा उजूर न करणें, या सनदेची प्रती लिहून घेऊन हे अस्सल सनद याजवळ भोगवटियास परतोन देणें ह्मणोन, छ. २० जमादिलाखर.
सनदा व पत्रें.

२ सनदा.

१ नांवाची.

१ मोकदम मौजे मजकूर.

---

२

२ चिटणिसी. पत्रें.

१ देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी, प्रांत जुन्नर यांस.

१ देशमुख व देशपांडे तर्फ नारायणगांव प्रांत जुन्नर.

४

रसानगी यादी.

१०१४ ( १६८ ) प्रांत वसई पैकीं साष्टीचे कुमकेस लोक गेले होते, त्यांपैकीं तेथें

A. D. 1774-75. Brahmáji Pátil Khokarale of Hiwre in Tarf Náráyangaon an Inám for services on the occasion of the capture of fort Vijayadurga by Government.

( 1014 ) Visáji Keshav of pránt Bassein was directed to employ, in

खमस सबैन मया व अलफ मोहरम ६ — कामास आले; त्यास ज्याचे पुत्र व भाऊ असतील त्यांजपासून चाकरी घेऊन तैनाता पेशजींप्रमाणें चालवणें, ज्याचे भाऊ पुत्र नसतील त्याचे आई व बायकोस बालपर्वेसी पेशजींचे शिरस्तेप्रमाणें करून देऊन चालवणें, ज्याचे पुत्र व भाऊ चाकरीवर ठेवाल त्यास हुजूर अखेरसालीं आणून ठेवणें, व बालपर्वेसी करून द्याल त्याचा झाडा तपशीलवार हुजूर समजावणें ह्मणोन विसाजी केशव, प्रांत वसई; यांचे नांवे छ. १२ जिल्काद. सनद १.

रसानगी यादी.

१०१५ ( १६९ )—कोट ठाणे साष्टी येथें इंग्रज मुंबईकर याचे लढाईत लोक सरकार कामास आले त्यांचीं कलमें.

खमस सबैन मया व अलफ मोहरम ६

सरदार ठार जाहले त्यांचे ऐवजीं पुत्र व भाऊ असामी.

१ भास्कर विठ्ठल, विठ्ठल भास्कर यांचे पुत्र.

१ अमृतराव घाटगे, रामाजीराव यांचे पुत्र.

१ दुलबाजीराव खानविलकर, मानाजीराव खानविलकर यांचे बंधु.

१ कासीमजी, अबुरहिमान उंदेरकर यांचा पुत्र.

एकूण चार असामी पैकीं तीन पुत्र व एक भाऊ करार करून, यांस पेशजींप्रमाणें तैनाता करार केल्या असेत, तरी बेहड्याचे नेमणुकेप्रमाणें पाववीत जाणें; आणि सदरहू चार असामी अखेर सालीं हुजूर आणून भेटवणें. कलम १.

कोटांत इंग्रजांस लोक सांपडले त्यांचीं वस्त्रें व हत्यारें गेलीं, सबब त्यांस द्यावयाबद्दल रुपये ३८५ तीनशें पंचायशीं रुपयांची नेमणूक करून दिल्ही असे, तरी लढाईत सरकार उपयोगी पडले असतील त्यांस कार्याकारण देऊन, सदरहू नेमणुकेंत खर्च करणें, मजुरा पडतील. कलम १.

इंग्रजांचे लढाईत लोक ठार जाहले, त्यांचे लेक व भाऊ कोणीं उमेदवार नाहीं अशा तऱ्हेचे जे असतील, त्यांची चौकशी करून त्यांचे बायकांस व आईस बालपर्वेशी पेशजींचे शिरस्त्याप्रमाणें चालवणें, आणि झाडा अखेरसालीं हुजूर आणून

A. D. 1774-75. place of the men from his province who had lost their lives at Sálsetti, their sons and brothers, and in case the deceased had left no such relations, to continue the usual allowances to their wives and mothers.

**( 1015 ) Similar orders were issued in regard to officers and men of**

हिरोजीराव खानविलकर, खुद्द सरदार यांची तरवार लढाईत गोळी लागोन मोडली, सबब रुपये १५ पंधरा रुपये देविले असेत, तरी देणें; मजुरा पडतील. कलम १

समजावणें; त्याप्रमाणें सरकारांतून करार करून दिल्हा जातील.. कलम १.

एकूण चार कलमें करार करून हे सनद सादर केली असे, तरी सदरहू लिहिल्याप्रमाणें करणें म्हणोन, आनंदराव राम, तालुके साष्टी, यांचे नांवें. छ. १३ जिल्काद. सनद १.

रसानगी यादी.

१०१६ ( २७२ )—शामराव जगजीवन यांस सनद कीं, मालोजी महाडीक शिलेदार यांस हिंदुस्थानचे स्वारींत पातशहाचे लढाईत गोळा लागोन पाय जाया जाला, त्यामुळें तीन वर्षें घरींच राहिले, चाकरी करण्यास सामर्थ्य नाहीं, याजकरतां किल्ले चंदनगडचे सरंजामपैकीं पेस्तरसाल सन सबा सबैनापासून बालपर्वेसी दाखल रुपये २०० दोनशें द्यावयाचा करार करून हे सनद सादर केली असे, तरी पेस्तरसालापासून सालीनां दोनशें रुपये प्रमाणें दरसाल पावीत जाणें म्हणोन. सनद.

सीत सबैन मया व अलफ मोहरम ६

रसानगी यादी.

१०१७ ( ३२१ )—पर्वतराव डुबल शिलेदार हे सन खमस सबैनांत आनंदमोगरीवर इंग्रजांचे लढाईत ठार जाले, सबब त्यांचे पुत्र हणमंतराव डुबल यांस बालपर्वेसी रुपये १६२ एकशेंबासष्ट रुपयांची जमीन कमाल सालचे आकारची मौजे खोडसी, प्रांत कराड, येथील देशमुखी व सरदेशमुखीचे इनामापैकीं सालमजकुरापासून करार करून देऊन हे सनद सादर केली असे, तरीं सदरहू ऐवजाची जमीन कमाल बेरजेची मौजे मजकूरपैकीं लाऊन देऊन मशारनिल्हेकडे चालवणें, दरसाल ताजे सनदेचा उजूर न करणें म्हणोन, श्रीनिवास शामराव कमाविसदार, प्रांत कराड, यांचे नांवें. सनद १.

सबा सबैन मया व अलफ रजब १८

रसानगी यादी.

---

A. D. 1774-75. Sálsetti and Shiwaner killed at fort Sálsetti in a battle with the English.

( 1016 ) Máloji Mahádik three years previously had lost a leg in a battle with the Emperor in Hindustan. Being disabled from doing his duty, he was given a maintenance allowance of Rs. 200 a year.

A. D. 1775-76.

( 1017 ) Parwatrao Dubal Silledár having been killed in A. D. 1774-75 in the battle of Ánand Mogri with the English, land assessed at Rs. 162 was granted to his son for maintenance.

A. D. 1776-77.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

१०१८ ( ३९७ )-लक्ष्मण महादेव उकिडवे हरकारा हा तीर्थस्वरूप भाऊसाहेब यांचे

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २९

स्वारींत पाणपतांत नाहींसा झाला, सबब त्याचे आईस व बायकोस तालुके रत्नागिरीपैकीं बालपर्वेसी वीस रुपये, व दोन खंडी गल्ला पावतो ह्मणोन हुजूर विदित जालें, त्यास मशारनिल्हेकडील कोणीं तोतयाकडे गेलें नसल्यास, बेहडेयाचे नेमणुकेप्रमाणें वीस रुपये व दोन खंडी गल्ला पावता करणें, दिकत न करणें ह्मणोन, सदाशिव केशव यांचे नांवें चिटणिसी छ. १० जिल्हेज. पत्र १.

१०१९ ( ४१८ )-आलीशा वल्लद राजेशा खटावकर शिलेदार, दिंमत पागा हुजूर

सबा सबैन मया व अलफ मोहरम ७

हे सन खमस सबैनांत आनंदमोगरीवर इंग्रजांचे लढाईत सरकारकामास आले, सबब त्यांचे मुलामाणसांस बालपर्वेसी मौजे तावसी, परगणे मजकूर, येथें जमीन कमाल आकाराची रुपये १५० दीडशें रुपयांची जमीन सालमजकुरापासून करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी मौजे मजकुरीं सदरहू दीडशें रुपयांची जमीन याजकडे नेमून देऊन चालवणें, दरसाल नवीन सनदेचा उजूर न करणें, या सनदेची प्रत लेहून घेऊन असल सनद यांजकडे भोगवटियास देणें ह्मणोन, गोपाळ भगवंत कमाविसदार परगणे इंदापूर यांचे नांवें सनद १.

१०२० ( ४६० )-त्रिंबकराव राणो, वस्ती मौजे चिंचवण तर्फ पाथरूड, दिंमत

सबा सबैन मया व अलफ रबिलावल १२

हशम, हे किल्ले चेनरायदुर्ग येथें चाकरीस होते, ते सन खमस सबैनांत हैदर नाईकाचे लढाईत किल्ले मजकूर येथील मोर्च्यांत सरकारकामास आले, त्यांचे पुत्र जयराम त्रिंबक लहान होते, सबब बालपर्वेसी परगणे बीड येथील चोथाई व सरदेशमुखीचे ऐवजीं सालीना पाऊणशें ७५ रुपये दर-

---

FROM JANÁRDAN APPÁJI'S DIARY.

( 1018 ) Laxmaṇ Mahádeo Ukidwe, a messenger, was missing on

A. D. 1776-77.

the battle-field of Pánipat and an allowance consisting of Rs. 20 and 2 khandies of grain had been sanctioned for the maintenance of his mother and wife. Orders were now issued to continue the allowance if inquiry showed that they were not concerned in the conspiracy of the Impostor.

( 1019 ) Silledár Álishá Wallad Rájeshá Khaṭávkar, attached to the

A. D. 1776-77.

Huzur cavalry, having lost his life in an engagement with the English at Ánand Mogri, land assessed at Rs. 150 was given for the support of his relations.

( 1020 ) Trimbakrao Ráno employed at fort Chenráydurga having

साल द्यावयाचा करार करून, हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी पाऊणशें रुपये पेस्तरसाल सन समान सबैनापासून परगणे मजकूर येथील सदरहू अंमलाचे ऐवजीं दरसाल पाववीत जाणें ह्मणोन, वेंकाजी गणेश यांचे नांवें. . . सनद १.

रसानगी यादी.

१०२१ ( ४६५ )–मुकुंद बिन येमाजी जिनगर, दिंमत पागा हुजूर, याणें चिरगुटाचा घोडा तयार करून सरकारांत आणिला, सबब यास प्रांत पुणें पैकीं हरएक गांवीं तीस रुपये आकाराची जमीन द्यावयाचा करार करून हे सनद सादर केली असे, तरी सदरहू आकाराची जमीन यास नेमून देऊन याचे नांवें इनाम खर्च लिहित जाणें; आणि चतुःसीमेचा जाबता हुजूर पाठवणें; तेणेंप्रमाणें इनामपत्रें करून दिल्हीं जातील ह्मणोन, रामचंद्र नारायण यांचे नांवें.

समान सबैन
मया व अलफ
जमादिलावल २४

सनद १.

रसानगी यादी.

## मुतालीक यांचे रोजनिशींपैकीं.

१०२२ ( १० )–शेख इभराम जुन्नरकर शिलेदार, निसबत निळकंठराव रामचंद्र, याणें सरकारांत चाकरी बहुत दिवस केली, ह्मातारपण जालें, स्वारीस यावयाचे उपयोगीं नाहीं, व दोघे पुत्र व एक पुतण्या सरकार कामावर ठार जाले, सबब घरचे बेगमीस परगणे मजकूरपैकीं एक गांव कमाल आकाराचे बेरजेचा रुपये ६०० सहाशें रुपयांचा गांव देविला असे, तरी सदरहू लिहिल्याप्रमाणें गांव नेमून देऊन आकार मशारनिल्हेचे नांवेंबद्दल मुशाहिरा खर्च लिहीत

समान सबैन
मया व अलफ
जिल्काद ५

---

A. D. 1776-77. been killed in the siege laid by Haidar Náik in A. D. 1774-75, an allowance of Rs. 75 was granted to his son for maintenance.

( 1021 ) Mukunda Yemáji Jinngar of the Huzur cavalry, presented to Government a figure of a horse made of cloth. Land assessed at Rs. 30 was therefore given to him in Inám.

A. D. 1777-78.

FROM THE MUTÁLIK'S DIARY.

( 1022 ) Shek Ibharám, a Silledár of Junnar, had served for a long time under Government. In consideration of his old age which rendered him unfit for further service, and the fact that his two sons and a nephew had lost their lives in the

A. D. 1777-78.

जाणें म्हणोन, भवानी हरी, व हरी मोरेश्वर कमाविसदार, परगणे संगमनेर, यांचे नांवें.
सनद १.

नरसिंगराव बल्लाळ माडोगणे यांस. सनद १.

---

२.

१०२३ ( ९२१ )—केशव रणसोड यांस, वसई तालुका इंग्रजांकडे गेला होता ते
सबा समानीन समयीं हे इंग्रजांकडे चाकरीस राहिले होते. याशी आबाजी यादव
मया व अलफ यांणीं संदर्भ लाविला कीं, किल्ले तांदुळवाडी व काळदुर्ग व महालचा
मोहरम २२ अंमल इंग्रजांकडे आहे, तो सरकारांत घेऊन दिल्यास आसाम्या
व पालखी वगैरे द्यावयाचा करार केला; त्यावरून मशारनिल्हे यांणीं सरकार लक्ष राखोन सन इसने समानीनांत कामकाज केलें, सबब आबाजी यादव यांणीं करार केला त्यापैकीं.

जातीस तैनात व पालखी द्यावयाचा करार त्यापैकीं जातीस तैनात सालगुदस्तां सन सीत समानीनांत वसईकडे नेमून दिल्ही. पालखीची तैनात होणें राहिली. ते हल्लीं मोईन सालीना रुपये ५०० पांचशें रुपये, पालखीची मोईन सालीना खेरीज शिरस्ता सालमजकूर अवलसालापासून करार केली असे, तरी तालुके वसई-सदरहू मोईन निवळ पावीत जाणें.
कलम १.

मशारनिल्हेचे बंधूस तीन असाम्या द्यावयाचा करार, त्यापैकीं सालगुदस्तां, सन सीत समानीनांत, रंगो रणसोड यास असामी मामले कोहज येथें नेमून दिल्ही आहे; बाकी दोन असाम्या द्यावयाच्या, त्यापैकीं हल्लीं सदाशिव रणसोड यास परगणे माहिम प्रांत वसई येथील दफ्तरदारी सांगोन सालीना मोईन रुपये १०० एकशें रुपये मोईन सालीना करार करून दिल्ही असे, तरी यांचे हातून परगणे मजकूर येथील दफ्तरदारीचें कामकाज घेऊन सदरहू मोईन सनद पैवस्तगिरीपासून परगणे मजकूरपैकीं पावीत जाणें. कलम १.

service of Government, he was given a village worth Rs. 600 for his house-hold expenses.

( 1023 ) When the Táluká of Bassein was taken by the English,
A. D. 1786-87. Keshav Ranchhod accepted service under that Government. A message was sent to him by Abáji Yádav promising him a palanquin and some appointments, if he would arrange to secure the forts of Tándulwádi and Kàldurg and the Mahál (Salsett

एकूण दोन कलमें करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी सदरहूप्रमाणें करणें ह्मणोन, गणपतराव जिवाजी यांस. सनद १.

रसानगी याद.

१०२४ ( ९६४ )—सालाजी बिन सुभानजी सुपेकर यांणें हुजूर विनंती केली कीं, सरकारांतून श्रीगंडकीस पाठविलें तें काम करून आलीयावर, पुरंदरचे मुक्कामाहून त्रिंबकराव विश्वनाथ यांजकडे, व मोगलांकडे, व आणखी दहा ठिकाणीं जरुरीचे वगैरे कामगारीस पाठविलें ते साहेबांचे प्रतापें कामें करून आलों. ते समयीं आज्ञा होती कीं सरकार कामें करून आलीयावर बक्षीस देऊं, त्यास सरकार कामें एकनिष्ठेनें केलीं आहेत, साहेबांनीं कृपा करून माझे व मुलांलेकरांचे पोटास वंशपरंपरेनें कालक्षेप चाले असा इनाम करून दिल्हा पाहिजे ह्मणोन; त्याजवरून तीर्थस्वरूप कैलासवासी नारायणरावसाहेब यांणीं गंडकीस पाठविलें, त्याजवर पुरंदरचे मुक्कामींहून त्रिंबकराव विश्वनाथ यांजकडे नाजूक कामास, व नबाब निजाम अलीखान याजकडे वगैरे कामास पाठविलें; तेथून जपोन चाकरी करून आला; सरकार चाकरी केलीयावर बक्षीस द्यावें असें ते समयीं बोलण्यांत आलें होतें, त्यावर सालगुदस्तां कर्णाटकचे स्वारीस राजश्री हरी बल्लाळ यांजबरोबर गर्जेंद्रगडास मेहनत करून कामकाज चांगलें केलें, याकरितां कामाचा माणूस मेहनती, मर्द, इतबारी जाणोन याजवर कृपाळू होऊन घरच्या बेगमीस मौजे भाजे, तर्फ नाणेंमावळ, तालुके लोहगड, येथें पंचायशी रुपयांची जमीन नूतन इनाम, स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा, खेरीज हक्कदार करून, कुलबाब कुलकानु हलीपट्टी पेस्तरपट्टी देखील इनाम तजाई, जल, तरू, तृण, काष्ठ, पाषाण, निधी, निक्षेप सहित, दरोबस्त इनाम करार करून देऊन, हे सनद सादर केली असे, तरी मौजे मजकूरपैकीं अवल जमीन मातशेताच्या धाऱ्याची असेल, त्याप्रमाणें खराब जमीनीस सदरहू धारा लाऊन चतुःसीमापूर्वक पंच्यायशीं रुपयाचे आकाराची जमीन नेमून देऊन मोजणी जाबता हुजूर लिहून पाठवणें, त्याप्रमाणें इनामपत्रें

समान समानीन मया व अलफ सफर ३०

---

for the Peshwá. On this Keshav did service for the Government during the year A. D. 1781-82. The promised reward was therefor given.

( 1024 ) Sáláji bin Subhànji Supekar was sent by Peshwá Náráyanráo to Shri Gandaki on some errand. He was afterwards sent from fort Purandhar to Trimbakrao Vishwanáth and to Nawab Nizam Alikhán on some delicate missions. He executed these successfully. He also did good service at Gajendragad, while serv-

A. D. 1787-88.

करून दिल्हीं जातील, सदरहू जमीनीचा आकार होईल तो यांचे नांवें इनाम खर्च लिहीत जाणें ह्मणोन, बाळाजी जनार्दन यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

१०२५ ( १०७० )—गोविंद कृष्ण यांचे नांवें सनद कीं, तीर्थस्वरूप राजश्री बाजीराव साहेब यांजवळ लहानपणापासून ल्याहावयास व पढावयास सोबतीस आहेत, त्यास तैनात सालीना.—

सलास तिसैन मया व अलफ साबान २६

| | नक्त रुपये. | कापड आंख. |
|---|---|---|
| गोविंद चिमणाजी | १०० | ५० |
| त्रिंबक गोविंद. | १०० | ५० |
| | २०० | १०० |

एकूण दोन असामींस दोनशें रुपये नक्त, व एकशे कापड आंख सालमजकूर अवलसालापासून करार करून देऊन हे सनद तुम्हांस सादर केली असे, तरी तेथील वाड्यांतील कारकुनाबरोबर सदरहूप्रमाणें तैनात सालीना देत जाणें ह्मणोन. सनद १.

रसानगी याद.

## ९ इनाम, नक्तनेमणुकी, वतनें वगैरे.

### ( अ ) देणग्या.

### २ धर्मकृत्यें व नवस.

१०२६ ( १०८ )—जगन्नाथ बैरागी, वास्तव्य मठ मौजे गंगापूर, परगणे नाशिक, यांणीं हुजूर किल्ले पुरंदर येथील मुक्कामीं येऊन विदित केलें कीं, आपण मौजे मजकुरीं मठ बांधोन स्वामींस, व स्वामींच्या राज्यास कल्याण चिंतून आहे; त्यास मठांत अतीत अभ्यागत येऊन, अन्नाविण विन्मुख होऊन जातात, याकरितां कृपाळू होऊन गांवगन्ना देहे बीतपशील.

खमस सबैन मया व अलफ रमजान १४

---

ing under Hari Ballál in Karnátic. Inám land assessed at Rs. 85 was therefore given to him.

( 1025 ) Govind Chimnáji and Trimbak Govind, the two companions of Bájiráo saheb who received religious and secular instruction with him from his infancy, were granted each an allowance of Rs. 150 per annum.

A. D. 1782-83.

2. Grants for charitable purposes and in fulfilment of vows.

( 1026 ) At the request of Jagannáth Bairági of the Math at Gangá-

४ परगणें नाशिक.

१ कजबे मजकूर.

१ मौजे पाथरडी.

१ मौजे गंगापूर.

१ मौजे ओंढें.

२ परगणें दिंडोरी

१ मौजे जानोरी.

१ मौजे गिरनारें

२

१ मौजे वोझर परगणे चांदवड.

७

एकूण देहे सात येथें बाजार आहेत. तेथे बाजाराचे दिवशीं रस्त्यांत नवी दुकानें मांडून बसतील त्यांस दाण्याचे दुकानास गल्ला एकमूठ व वाणी व चाटी व साळी व सराफ उदमी यांचें दुकानांस शिवराई रुके ३ तीन याप्रमाणें नूतन धर्मार्थ करून दिल्ह्यानें यानें अतीत अभ्यागत विन्मुख जाणार नाहींत ह्मणोन; याजवरून मनास आणितां, मौजे मजकुरीं बैरागी मठ बांधोन राहिला आहे, तेथें अतीत अभ्यागत येऊन अन्नाविण विन्मुख जातात, त्यास अन्न दिले यानें श्रेयस्कर जाणोन, कजबे नाशिक सुद्धां देहेसात येथील बाजाराचे दिवशीं रस्तेयांत नवीन दुकान मांडून बसतील त्यांस दाण्याचे दुका-नास गल्ला एक मूठ, व वाणी, व चाटी, व साळी, व सराफ, वगैरे उदमी यांचें दुकानांस शिवराई रुके ३ प्रमाणें नूतन धमार्थ सरकार जमाबंदी शिवाय करार करून दिल्हे असे तरी वाणी व चाटी, व साळी, व सराफ वगैरे उदमी यांस ताकीद करून, सदरहूप्रमाणें बैरागी याजकडे चालवणें. प्रतिवर्षीं नूतन पत्राचा आक्षेप न करणें, या पत्राची प्रति

---

A. D. 1774-75. pur in Parganá Násik permission was given to him to levy from all new traders frequenting kasbe Násik and 6 other villages on bazár days, and occupying a portion of the road for trade purposes, the following contributions:—

from each grainshop—one handful of grain;

from each other trader—three Shivrái Ruke.

लिहून घेऊन हें असल पत्र याजवळ भोगवटियास परतोन देणें ह्मणोन, परगणें नाशिक, व दिंडोरी, व चांदवड, सरकार संगमनेर यांस. सनदा.

१ मोकदम.

१ कमाविसदार, वर्तमान व भावी यांस.

२

रसानगी यादी.

## नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

१०२७ ( १९६ )—वेदमूर्ती राजश्री जनार्दनभट व सदाशिवभट गाडगीळ यांणीं हुजूर विदित केलें कीं, आपले तीर्थरूप बापूभट गाडगीळ यांस वाई पैकीं आंबे सुमार पंधराशें पावत होते. त्यास गनिमाचे गडबडीमुळें वाईतून कोकणांत गेलों. पुढें तीर्थरूप वारले. हल्लीं आपण वाईत राहण्यासी आलों आहों. तरी पूर्ववत्प्रमाणें चालवावें ह्मणोन; त्याजवरून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी आंबे सुमार,

खमस सबैन मया व अलफ रबिलाखर ५

१००० आंबे पिकले.

५०० हिरवे, लवणशाकेस.

१५००

एकूण दीड हजार आंबे सुमार देविले असेत, तरी कसबे वाई येथील शेरीपैकीं पेशजींप्रमाणें भटजींस पावते करणें ह्मणोन, हैबतराव भवानीशंकर यांचे नांवें छ. २२ रबिलावल. रसानगी यादी. सनद १.

१०२८ ( ४१६ )—दलबादलशा फकीर याचा तकिया मौजे कवडी येथें गांवाजवळ आहे. त्या तकियाचे चिराखबत्तीस मौजे लोणी तर्फ हवेली, प्रांत पुणें, पैकीं नूतन इनाम जमीन बिघे ४ चार बिघे करार करून देऊन, वर्तमान भावी कमाविसदार यांचे नांवें अलाहिदा सनद सादर जाहली आहे, त्या-

सबा सबैन मया व अलफ मोहरम २

The concession was granted to enable him to feed travellers coming to his Math.

FROM NÁRO APPÁJI'S DIARY.

( 1027 ) At the request of Janárdan Bhat and Sadáshiva Bhat Gádgil, orders were issued to the officer of Wái to give them 1000 ripe, and 500 unripe mangoes from the Sheri lands of Wái.

A. D. 1774-75.

( 1028 ) Inám lands were given for the lighting of the mosque at Kawadi.

A. D. 1776-77.

२४

प्रमाणें मौजे मजकूरपैकीं सदरहू चार बिघे जमीन याचे दुमाला करून देऊन आकार होईल तो दरसाल यांचे नांवें इनामखर्चे लिहिणें ह्मणोन, रामचंद्र नारायग यांचे नांवें.

सनद १.

रसानगी यादी.

दलबादलशा फकीर यांणीं हुजूरनंजीक पुणें येथील मुक्कामीं येऊन अर्ज केला कीं, आपण दोन तीन वर्षे लष्करांत दुवा देऊन आहें, त्यास आपला तकिया मौजे कवडी येथें गांवाजवळ आहे त्यास तकियाचे चिराखबत्तीस कांहीं नूतन इनाम जमीन देऊन चालविलें पाहिजे ह्मणोन; त्याजवरून मनास आणून फकीर दुवागीर तीन वर्षे लष्करांत आहे हें जाणून याजवर मेहेरबान होऊन मौजे लोणी, तर्फ हवेली, प्रांत मजकूरपैकीं नूतन इनाम जमीन बिघे ४ चार बिघे जमीन अवल दूम सीम तीन प्रतीची कुलबाब कुलकानू, हल्लीपट्टी, व पेस्तरपट्टी खेरीज हकदार करून दरोबस्त इनाम करार, करून देऊन, हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी सदरहू चार बिघे जमीन मौजे मजकूरपैकीं चतुःसीमापूर्वक नेमून देऊन, याचे दुमाला करून इनाम चालवणें. दरसाल ताजे सनदेचा आक्षेप न करणें. या सनदेची नकल लिहून घेऊन असल सनद याजवळ भोगवटियास परतोन देणें ह्मणोन, कमाविसदार वर्तमान भावी प्रांत पुणें यांस. सनद १.

रसानगी यादी.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

१०२९ ( ४८७ )–२००० रुपये खासगी निसबत शिवराम रघुनाथ यांजकडे श्रावण मासचे दक्षणेचें साहित्य, फुटाण्यास हरबरे व खिचडीस डाळ, व रोषनाईस तेल व विड्यांस सुपारी, व छपरें खरेदी करावयाबद्दल, व तांदूळ सडणावळ वगैरे मजुरीबद्दल, परवानगी रूबरू.

समान सबैन मया व अलफ रजब ३०

१०३० ( ४८८ )–धर्मादाय दक्षणा श्रावणमास मुक्काम पुणें. रुपये.

समान सबैन मया व अलफ रजब ३०

---

## FROM JANÁRDAN APPÁJI'S DIARY.

( 1029 ) Rs. 2000 were given to Shiwarám Raghunáth for purchases in connection with the Daxaṇá distributed in the month of Shrávaṇ—such as grain, rice, pulse, oil, leaves, betelnut and for erecting huts.

A. D. 1777-78.

( 1030 ) The following sums were distributed as Daxaṇá in the month of Shrávaṇ. The distribution commenced on the 6th of Shráwaṇ Shudha at about 9 or 10 A. M:—

A. D. 1777-78.

३०,५१० पर्वतीस रमण्यांत दक्षणा ब्राह्मणांस दिल्ही, प्रारंभ छ. ५ रजब श्रावणशुद्ध षष्ठी मंदवासरे प्रातःकाळ दीड प्रहर दिवस. रुपये.

१०२८१ विद्यमान जनार्दन आपाजी, दरवाजा पहिला, ब्राह्मण असामी ६३९३. शेरा सरासरी १॥۰॥ प्रमाणें. रुपये.

४७१० विद्यमान रामशास्त्री, दरवाजा दुसरा, ब्राह्मण असामी २२५० एकूण शेरा सरासरी २८۰॥ प्रमाणें. रुपये.

५७०० विद्यमान अमृतराव विश्वनाथ पेठ्ये, दरवाजा तिसरा, ब्राह्मण ३३०५ एकूण शेरा सरासरी १॥। प्रमाणें. रुपये.

५६३० विद्यमान विसाजी कृष्ण, दरवाजा चौथा, ब्राह्मण असामी २९७० शेरा सरासरी १॥।=। प्रमाणें. रुपये.

४१८९ विद्यमान भिवराव येशवंत, दरवाजा पांचवा, येथें काशिनाथ शास्त्री यांणीं दक्षणा वाटिली; असामी १९२२ एकूण शेरा सरासरी २८=॥। प्रमाणें. रुपये.

३०,५१० १६,८४०

शेरा सरासरी १॥।۰ प्रमाणें. रुपये.

२२,१७४ वाड्यांत ब्राह्मणांस दक्षणा दिल्ही, विद्यमान वासुदेवभट कर्वे उपाध्ये नांवनिशीवार तपशीलवंद आलाहिदा ४८ एकूण ब्राह्मण असामी २२२० एकूण रुपये.

२१०२६ निसबतवार ब्राह्मण २०२४ असामी. रुपये.

१००१ क्षेत्रींचे ब्राह्मणांस दक्षणा पाठविली असामी १४५ रुपये.

१४७ वाड्यांतील असामी ५१ एकूण रुपये.

२२,१७४ २२२०

Rs. 30510 distributed to those assembled at the Parvati temple:—

| | | | |
|---|---|---|---|
| 10281 | By Janárdan Appáji | 1st door | No. of recipients **6393.** |
| 4710 | ,, Rámshástri | 2nd ,, | ,, **2250.** |
| 5700 | ,, Amritrao Vishwanáth Pethe | 3rd | **3305.** |
| 5630 | ,, Visáji Krishna | 4th ,, | ,, **2970.** |
| 4189 | ,, Bhiwrao Yeshwant | 5th ,, | ,, **1922.** |
| 30510 | | | **16840.** |

**22174** distributed in the palace (including the sum sent out to Brahmins of holy places). No. of recipients 2250.

३०० शंकराचार्य स्वामी शृंगेरीकर यांच्या समाधी पंचवटींत श्री गोदातीरीं दोन आहेत, तेथील पूजन व अर्चन व पुण्यतिथी दोन, मिळोन दरसाल तीनशें रुपये श्रावणमासीं द्यावयाचा करार करून, सालमजकूरचे. रसानगी याद. रुपये.

१०१५ रमण्यांत ब्राह्मण दक्षणेस गेले नाहीं, त्यांस घरोघर जाऊन दक्षणा दिल्ही, व देवांपुढें दक्षणा ठेविली, गुजारत कारकून, निसबत रामचंद्र नारायण सुभा प्रांत पुणें, व बाळ दीक्षित गडबोले, बरहुकूम याद. रुपये.

२ श्री देवांपुढें ठेविली.

·।।· ओंकारेश्वर.

·।।· गणपती.

·।।· रामचंद्र.

·।।· किरकोळ.

१०१३ ब्राह्मण दुखणेकरी वगैरे असामी ६९० एकूण शेरा सरासरी दर असामीस १।≡।। प्रमाणें रुपये.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४३६ | प्रत असामी | ४३६ | दर १ प्रमाणें. |
| ३९२ | प्रत असामी | १९६ | दर २ |
| १५३ | प्रत असामी | ५१ | दर ३ |
| २० | प्रत असामी | ५ | दर ४ |
| ७ | प्रत असामी | १ | एकूण. |
| ५ | प्रत असामी | १ | एकूण. |

१०१३ ६९०

१०१५

५३९९९ १९७५१

300 sent for the expenses of 2 worships at two Tombs of Shankarácháryás of Shringeri at Panchwaṭi;

1015 sent to Brahmins who on account of illness were unable to attend in person—No. of recipients 690 &; offered to four deities at 8 annas each;

४९१२। खुर्दा रमण्यांत उलफ्या बरोबर पांच रोजा, व दक्षणे समयीं दिल्हा, गुजारत नारो महादेव गद्रे. खुर्दा खरेदी गुजारत बाळाजी नाईक, दिंमत पोतदार. टके.

१७५५७ उलफ्यास पांच रोजा ब्राह्मण असामी एकूण. रुपये.

१३९७८। ब्राह्मण ५५९१३ असामी, दर असामी टका ·। · प्रमाणें रुपये.

| | | |
|---|---|---|
| ८५७५ | दरवाजा पहिला असामी | ३४३०० |
| ४२२० | दरवाजा दुसरा असामी | १६८८० |
| ११८३। | दरवाजा तिसरा | ४७३३ |
| १३९७८। | | ५५९१३ |

तपशील तेरखा.

| | | |
|---|---|---|
| २१२३॥ | छ. २९ जमादिलाखर | ८४९४ |
| २६९१॥ | छ. १ रजब | १०७६६ |
| २८१०॥ | छ. २ रजब | ११२४२ |
| ३०४२। | छ. ३ रजब | १२१६९ |
| ३३१०॥ | छ. ४ रजब | १३२४२ |
| १३९७८। | | |

३५७८।।। बायका, दरवाजा चौथा, दर असामी ·। · प्रमाणें. टके.

| | | |
|---|---|---|
| ६२८ | छ. २९ जमादिलाखर | २५१२ |
| ६२८।।। | छ. १ रजब | २५१५ |
| ७४७ | छ. २ रजब | २९८८ |
| ७२८॥ | छ. ३ रजब | २९१४ |
| ८४६॥ | छ. ४ रजब | ३३८६ |
| ३५७८।।। | | १४३१५ |

१७५५७ ७०२२८

4912–4 paid to Brahmins on account of feeding charges at anna 1 per diem for 5 days–women numbering 14315 also received this allowance at the same rate;

२०९६।।।६ दक्षणे समयीं ब्राह्मणांस दर असामी रुके ८६ प्रमाणें, इस्तकबील छ. ५ रजब तागाईत छ. ६ मिनहू दक्षणेस असामी १६८४० पैकीं ब्राह्मणांस खुर्दा पावला नाहीं ते वजा ६५ असामी बाकी १६७७५, एकूण दरवाजेवार असामी, एकूण टके.

| | | |
|---|---|---|
| ७९९८६ | दरवाजा पहिला | ६३९३ |
| २७७।।।६ | दरवाजा दुसरा असामी | २२२३ |
| ४१३८६। | दरवाजा तिसरा असामी | ३३०५ |
| ३६६।। | दरवाजा चौथा | २९३२ |
| २४०। | दरवाजा पांचवा असामी | १९२२ |
| | | टके. |

२०९६।।।६ १६७७५

१९६५३।।।६ ८७००३

पैकीं वजा खुर्द्याचें माप घेतां व खर्च खातें कसर वाढली खुर्दा टके ३।।।९ बाकी टके १९६४९।।।९ एकूण दर रुपयास टके ४ चार प्रमाणें रुपये ४९१२।=।।.

पैकीं वजा सूट ८३।।। बाकी. रुपये.

११८२ पुरंदरीं ब्राह्मणांस दक्षणा दिल्ही. रुपये.

१५ गोविंदभट निजसुरे.
१५ कृष्णभट वैद्य.
१५ कृष्णंभट जोग.
१० आपाभट बापट.
८ सदाशिवभट मोघे.
७ बाळजोशी संगमेश्वरकर.
७ दादंभट काणे.

असामी.

११०५ किता

१९ प्रत १९ दर १ प्रमाणें.

1182 distributed at Purandhar, number of recipients 372;

२८० प्रत १४० दर २
२३१ प्रत असामी ७७ दर ३
३२० प्रत ८० दर ४ प्रमाणें.
१९५ प्रत ३९ दर ५
६० प्रत असामी १० दर ६
रुपये.

१९०५ ३७२

११८२
दर सरासरी ३८=॥ प्रमाणें.
४५४। किरकोळ पोता वगैरे तहाबंद अलाहिदा

६०५४७॥ २
१०००० बाळकृष्णशास्त्री आश्रित यांस कर्ज वारावयाबद्दल एकसालां तैनाते खेरीज.
रुपये.

७०५४७॥
२० पीर कसबे पुणें यास सालगुदस्तांप्रमाणें सालमजकुरीं, रसानगी याद.
रुपये.

१० शेखसला.
१० शेखसादत.

२०
१७२। पोस्त खर्च, प्यादे वगैरे रमण्यांत ब्राह्मणांचे बंदोबस्तास होते, त्यांस मिठाईबद्दल दर असामीस रुपये८= प्रमाणें रसानगी यादी तीन
रुपये.

५९॥= किल्लेहायचे लोकांस.
२॥। किल्लेहायचे लोकांस असामी २२

---

454–4 Miscellaneous
Number of receipients 20,152

total60547–8

20 were sent as presents to Pirs Shek Sallá and Shek Sádat;
172–4 were paid to peons No. 1378 from different forts and Tálukás

| | | | |
|---|---|---|---|
| | १। | किल्ले घनगड असामी | १० |
| | ०॥= | किल्ले चाकण असामी | ५ |
| | २॥= | किल्ले कोरीगड | २१ |
| | ५ | किल्ले चंदन वगैरे निसबत शामराव जगजीवन असामी | ४० |
| | ३०८= | किल्ले पुरंदर. | |
| | | ८॥। नेहमी लोक किल्ले मजकूरचे असामी | ७० |
| | | ८।= कानडे प्यादे असामी | ६७ |
| | | २॥ माजी वंदनकर | २० |
| | | १०॥ हुजूर हशम | ८४ |
| | | ३०८=. | |
| | १७॥ | किल्ले सिंहीगड असामी | १४० |
| | ५९॥।= | | ४७९ |
| २५॥ | | तालुकेहाय. | |
| | ८।= | तालुके शिवनेर | ६७ |
| | ४॥। | प्रांत राजपुरी | ३८ |
| | २॥= | अवचीतगड | २१ |
| | ५ | तालुके रायगड | ४० |
| | ४॥। | तालुके सुवर्णदुर्ग | ३९ |
| | २५॥ | | २०४ |
| २९ | | किता लोक. | |
| | ४॥ | माजी चंदनगडकरी | ३६ |
| | ०॥।० | खास बारदार दिंमतहाय असामी | ६ |

who were deputed to keep order at the Parwati temple at the time of the assembly.

| | | |
|---|---|---|
| १॥ | जासूद जथेहाय असामी | १२ |
| ३।= | प्यादे दिंमत विठोजी गुंड असामी | २७ |
| ३।= | प्यादे दिंमत अबदुल असामी | २७ |
| १ | प्यादे दिंमत पिरुजी भिलारे असामी | १६ |
| १८= | प्यादे दिंमत रामजी यादव | ९ |
| ३८= | दिंमत तोफखाना | २५ |
| ४॥। | दिंमत देवजी सावंत वगैरे माहाले लोक | ३८ |
| १ | बहिरजी मोरे | ८ |
| ·।· | प्यादे दिंमत बालोजी सालोखे | २ |
| १८= | प्यादे निसबत विसाजी घोडदेव जोग | |
| ८= | चाकणकर असामी | |
| १ | फूटलोक असामी | |
| २९ | | २३२ |

| | | |
|---|---|---|
| ५४८= | दिंमत हुजूर हशम ४३२ | |
| ३॥। | खिजमतगार निसबत खास जिलीब असामी ३० | |
| | एकूण | |
| १७२। | | १३७८ |

२६२ तैवज खर्च श्रावणमासचे उत्साहाबद्दल ब्राह्मणांस विडे द्यावयास विड्याचीं पानें हिरवीं खरेदी केलीं, गुजारत प्यारजी तांबोळी पानें सुपारी.

२००००० छ. ३० जमादिलाखर.

१००००० छ. १ रजब.

१००००० छ. ४ रजब.

१२४००० छ. २६ रजब.

५२४०००

दर रुपयास पानें २००० दोन हजार प्रमाणें.
रसानगी यादी.

---

४५४।

१०३१ ( ५२३ )—धूम्रपानी गोसावी चौऱ्यायशीं आसनें करून योगसाधनेंत आनंद-
समान सबैन मया व अलफ मोहरम २३
वलीस नेहमीं राहतो. त्यास पेशजीं रोजमरा दरमहा वीस रुपये व पांच शेर लांकडें वजन दररोज पावत होतें, त्यास अलीकडे पावत नाहीं, ऐशास हल्लीं पेशजींप्रमाणें दरमहा रोजमरा रुपये २० वीस, व लांकडें दररोज वजन पक्के ८८५ पांच शेर देविले असे, तरी सनद पैवस्तगिरीपासून गंगापुराहून देत जाणें ह्मणोन, रामचंद्र बल्लाळ नारळीकर यांस. सनद १.
रसानगी यादी.

१०३२ ( ५३९ )—मौजे सिंगवें, परगणें नाशिक, हा गांव श्री रामचंद्र संस्थान पंच-
समान सबैन मया व अलफ सफर २६
वटी यांजकडे आहे, त्यास श्रीचा पुजारी याणें आपले कर्जाचे ऐवजीं सावकाराकडे गांव गहाण ठेऊन, गांवचा वसूल सावकार परभारा घेतो, ह्मणोन हुजूर विदित झालें; याजवरून मौजे मजकूरचे बंदोबस्तास हुजुरून श्रीनिवास नर्सी कारकून शिलेदार पाठविले असत. तरी मशारनिल्हेसी रुजू होऊन, मौजे मजकूरचा श्रीकडील अंमल सुरळीत देणें, पुजारी याजकडे व त्याचे सावकाराकडे वसूल एकंदर न देणें ह्मणोन, मौजे मजकूरचे मोकदमाचे नांवें छ. २२ जिल्काद चिटणिसी.
पत्र १.

१०३३ ( ५४५ )—तेलंग अगंतुक ब्राह्मण सोमवार पेठेंत मृत्यु पावला आहे, त्याचे
समान सबैन मया व अलफ सफर २६
दहनास लांकडें जाळाऊ वजन पक्के खंडी ·॥· पंधरा मण लांकडें देविले ( लीं ) असे( त ) तरी खरेदी करून देऊन ब्राह्मणाचें दहन करणें, सदरहू लांकडांची किंमत होईल ते शहरमजकूरचे कोतवालीचे

---

( 1031 ) An allowance of Rs. 20 per month and 5 seers of fuel per
A. D. 1777-78.
day was granted to an ascetic who inhaled smoke and practised Yoga in 84 different postures.

( 1032 ) Government was informed that the village of Singwe in
A. D. 1777-78.
Pargaṇá Násik, belonging to the idol of Rámchandra in Panchawaṭi, had been mortgaged by the worshipper to his creditor, and that the revenue was being recovered by the creditor direct. A karkun was sent to take over the management of the village and to spend proceeds for purposes connected with the idol. The pátil of the villaged was enjoined to see that the revenue was not paid to the creditor or to his agents.

( 1033 ) Sanction was given to supply 3/4 Khanḍi, that is 15 Maunds,

ब्राह्मणाचे नांवें धर्मादाय खर्च लिहिणें मजुरा पडेल ह्मणोन, आनंदराव काशी कमाविसदार कोतवाली शहर पुणें यांचे नांवें छ. २६ जिल्हेज. सनद १.

परवानगी रूबरू.

१०३४ ( ५८३ )—धर्मादाय दक्षणा श्रावणमास मुक्काम पुणें. रुपये.

तिसा सबैन
मया व अलफ
रजब २९

३२२०२ पर्वतीस रमण्यांत दक्षणा ब्राह्मणांस दिल्ही, प्रारंभ छ. ४ रजब श्रावण शुद्ध षष्ठी सौम्यवासरे बेवीस घटकांनंतर रुपये.

१३२१६ विद्यमान जनार्दन आपाजी, दरवाजा पहिला, ब्राह्मण ८३४०, एकूण शेरा १॥ॱ। प्रमाणें.

६४६० विद्यमान रामशास्त्री, दरवाजा दुसरा, ब्राह्मण ३२५९ एकूण शेरा १॥।≈॥ प्रमाणें. रुपये.

५३८१ विद्यमान अमृतराव विश्वनाथ, दरवाजा तिसरा, ब्राह्मण २७५०, शेरा १॥।≈। प्रमाणें.

७१४५ विद्यमान कृष्णराव बल्लाळ काळे व काशीनाथ शास्त्री, दरवाजा चौथा, ब्राह्मणं ३४१५ एकूण शेरा २८ॱ॥ प्रमाणें

३२२०२ १७७६४

शेरा सरासरी १॥।ॱ प्रमाणें.

२५८२२ वाड्यांत ब्राह्मणांस दक्षणा दिल्दी, विद्यमान रामशास्त्री नावनिशीवार तपशीलबंद, अलाहिदा सुमारें ४३ एकूण ब्राह्मण असामी.

देखील क्षेत्रींचे ब्राह्मणांसुद्धां दक्षणा. रुपये.

२३८७२ निसबतवार व क्षेत्रस्थ वगैरे मिळोन ब्राह्मण असामी २१७७ शेरा सरासरी १०॥।≈॥ रुपये.

१९५० यज्ञेश्वरशास्त्री, आपाशास्त्री यांचे बंधू यांस लग्नाबद्दल सालमजकुरीं एकसाल. रुपये.

---

२५८२२

A. D. 1777-78. of fuel for the cremation of a travelling Telang Bráhman who died in Poona.

**( 1034 )** Among the details of this date, the details of the *Shrávan-Daxaṇá* expenses amounting to Rs. 64, 537 are given.

A. D. 1778-79. It appears from a remark made at the end that some

३०० शंकराचार्य स्वामी शृंगेरीकर यांच्या समाधी पंचवटींत श्रीगोदातीरीं दोन आहेत, तेथील पूजन, अर्चन, व पुण्यतिथ दोन मिळून दरसाल तीनशें रुपये श्रावणमासीं द्यावयाचा करार आहे, त्याप्रमाणें सालमजकूरचे रुपये.

२ श्रीदेवदेवेश्वर, वस्ती पर्वती, यांस रमण्यांत दक्षणा समाप्त जाल्यावर दक्षणा ठेविली, विद्यमान जनार्दन आपाजी. रुपये.

१ श्रीदेवदेवेश्वर.

१ श्रीविष्णु.

९९५ दुखणेकरी ब्राह्मण व ब्राह्मणांचीं मुलें वगैरे रमण्यांत दक्षणेस गेलीं नाहींत. त्यांस घरोघर दक्षणा दिल्ही; व गांवांतील देवांपुढें दक्षणा ठेविली, गुजारत कारकून निसबत रामचंद्र नारायण सुभा प्रांत पुणें, व बाळ दिक्षित गडबोले बरहुकूम यादी. रुपये.

२ श्रीदेव.

·॥· श्रीओंकारेश्वर.

१ श्रीरामचंद्र तुळशीबागेंतील.

·॥· श्रीगणपती.

९९३ ब्राह्मण. असामी ७४८

एकूण शेरा सरासरी १।^ प्रमाणें. रुपये

५०४ प्रत असामी ५०४ दर १

४८६ प्रत असामी २४३ दर २

३ प्रत असामी १ एकूण.

९९३ ७४८

९९५

६६७ मुक्काम पुरंधर येथील ब्राह्मणांस दक्षणा दिल्हीबरहुकुम याद.

१० बाळंभट किरकिरे.

८. गोविंदभट किरकिरे.

१० पुरुषोत्तम भट, पुराणीक.

at least of the persons who received Daxaṇá at the wáḍá were brought in palanquins; all the palanquins in the town were requisitioned by Government for the purpose on that day.

६ बाळंभट मराठे.
६० प्रत असामी १२ दर ५ प्रमाणें.
१२८ प्रत असामी ३२ दर ४ प्रमाणें.
२३१ प्रत असामी ७७ दर ३ प्रमाणें.
२०६ प्रत असामी १०३ दर २ प्रमाणें.
८ प्रत असामी ८ दर १ प्रमाणें.

६६७ २३६
शेरा सरासरी २।।।~। प्रमाणें.

५९९८८ २०९२६
४१५५।। खुर्दा रमण्यांत उलफ्याबद्दल दर पांच रोजां व दक्षणे समर्यीं दिल्हा, गुजारत बाळाजी नारायण आगाशे, खुर्दा गुजारत पांडोबा नाईक वगैरे खुर्दा. रुपये.
१६४८३। उलफ्यास पांच रोजां ब्राह्मण वगैरे असामी. एकूण.
१३५२८।। ब्राह्मण ५४११४ असामी. दर असामी टका ·।· प्रमाणें.
८१७७।।। दरवाजा पहिला असामी ३२७११
४३८२ दरवाजा दुसरा असामी १७५२८
९६८।।। दरवाजा तिसरा असामी ३८७५

१३५२८।। ५४११४
तपशील तेरखा.

| | | |
|---|---|---|
| १८३६ | छ. २९ जमादिलाखर | ७३४४ |
| २५०९।। | छ. ३० जमादिलाखर | १००३८ |
| २८५८।।। | छ. १ रजब असामी | ११४३५ |
| ३०२६।। | छ. २ रजब | १२१०६ |
| ३२९७।।। | छ. ३ रजब | १३१९१ |
| १३५२८।। | | ५४११४ |

१९५४।।। बायका ११८१९ असामी दर असामी ·।· प्रमाणें एक.

| | | |
|---|---|---|
| ६६३।।। | छ. २९ जमादिलाखर | २६५५ |
| ८२२ | छ. ३० जमादिलाखर | ३२८८ |

| | | | |
|---|---|---|---|
| ४७५। | छ. | १ रजब | १९०१ |
| ४६८॥। | छ. | २ रजब | १८७५ |
| ५२५ | छ. | ३ रजब असामी | २१०० |

२९५४॥। ११८१९

१६४८३। ६५९३३

२१६०। दक्षणेसमयीं ब्राह्मणांस दर असामीस रुके ८६ प्रमाणें इस्तकबिल छ. ४ रजब तागाईत छ. ५ मिनहू. दक्षणेस असामी १७७६४ पैकीं ब्राह्मणांस खुर्दा पावला नाहीं ते वजा असामी ४८२ बाकी असामी १७२८२ एकूण दरवाजेवार असामी एकूण टके.

| | | |
|---|---|---|
| १०२३॥। | दरवाजा पहिला असामी | ८१९० |
| ३६५॥।६ | दरवाजा दुसरा असामी | २९२७ |
| ३४३॥। | दरवाजा तिसरा असामी | २७५० |
| ४२६॥।६ | दरवाजा चौथा असामी | ३४१५ |

टके

२१६०। १७२८२

१८६४३॥ ८३२१६

पैकीं वजा खुर्दाचें मापें घेतां, व खर्च होतां कसर वाढली खुर्दा टका १॥ बाकी टके १६६४२ एकूण खुर्दा खरेदी गुजारत हाये. रुपये.

२२६३।=॥ गुजारत पांडोबा नाईक पराडे, खुर्दा टके १०१५० दर ४।११। प्रमाणें रुपये.

१२६७॥-॥ गुजारत जेठ्या

१००० प्रत टके ४५०० दर ४॥

२६७॥-॥ प्रत टके १२०० एकूण दर ४।११। प्रमाणें.

१२६७॥-॥

६२४॥=॥ गुजारत यादोबा नाईक लोहोकर टके
२७९२ एकूण दर ४।१०॥ प्रमाणें.

४१५५॥=॥
पैकीं वजा सुट ८=॥, बाकी रुपये.

३९३॥। किरकोळ तपशील बंद अलाहिदा २ एकूण.

६४५३७।

वाड्यांत ब्राह्मणांस दक्षणा दिली, विद्यमान रामशास्त्री इस्तकबील छ. २९, जमादिलाखर, श्रावण शुद्ध १ भृगुवासरे तागाईत छ. ७ रजब. रुपये.

३५६२ आश्रित वगैरे.

१५० बाळकृष्णशास्त्री.

१०० रामशास्त्री.

१५० लक्ष्मण पाठकजी.

× × × ×

२६३५ निसबत बापूभट शिंत्रे.

२५ विश्वनाथभट गोडशे.

२५ मथुराभट वैद्य काशीकर.

२५ बाळकृष्णभट छत्रे.

× × × ×

२२८ निसबत यज्ञेश्वर दीक्षित मनोहर.

८ बाळंभट घाणेकर.

५ शंकर दीक्षित आकुर्डीकर.

१८२ वाड्यांतील असामी एकूण रुपये.

२७ आचारी.

४ बाबाजी गोखला.

४ सदाशिव करमरकर.

× × × ×

७८ शागिर्द.

३ विसू जोशी.

३ भवानी शंकर.

× × × ×

३० हरकारे.

३ बापू अवधारी.

३ विसोबा घुमाळ.

× × × ×

१५ रीमवान.

३ लक्ष्मण चोपडा.

३ येशवंत.

× × × ×

२० पीर कसबें पुणें यांस सालगुदस्तप्रमाणें सालमजकुरीं दक्षणेसमयीं पावतात ते.

१० शेखसला.

१० शेखसादत.

२०

११७॥। पोस्तखर्च प्यादे वगैरे रमण्यांत ब्राह्मणांचे बंदोबस्तास होते त्यांस मिठाईबद्दल दर असामी ८= प्रमाणें.

३२ किल्लेहायचे लोकांस.

३ किल्ले विसापूरकर असामी २४.

२॥। किल्ले राजमाची असामी २२.

× × × ×

११॥।= तालुके हाय.

६॥ तालुके विजेदुर्ग असामी ५२.

२॥ तालुके अवचितगड असामी २०.

३८॥= प्यादे वगैरे.

४॥= दिंमत रामजी यादव असामी ३७.

४॥ निसबत विसाजी धोंडदेव असामी ३६.

× × × ×

२८= माजी चंदनगडकरी.

१५० २५८= हुजूर हशमलोकांस असामी.

१५० कित्तालोक.

३६ पर्वतीस श्रीदेवदेवेश्वराकडे व विष्णूकडे चौकीस आहेत त्यांस सालाबादप्रमाणें.

१५ दरवाज्यांस असामी १५.

५॥= कारखान्याकडे वगैरे प्यादे असामी.

३० सरकारचे वाड्यांत दक्षणासमाप्तीदिवशीं ब्राह्मण कोंडले त्यांचे चौकीस.

१० ब्राह्मणांस आणावयास व पोचवावयास पालख्या शहरांतील गृहस्थांच्या जमा करावयास होते ते.

५ विड्याकडे.

× × × ×

१०३५ ( ८९२ )—श्रावण मासचे दक्षणेचे बंदोबस्तास सरकारांत लोक आणविले असेत, तरी पोटाची सदरहु लोकांची बेगमी करून देऊन पाठवून देणें ह्मणोन. सनदा.

सीत समानीन मया व अलफ रमजान १७

१ परशराम श्रीनिवास प्रतिनिधी यांस असामी ३०० तीनशे यांविशीं.

१ सदाशिव चिमणाजी सचिव यांस असामी ३०० तीनशें यांविशीं.

१ रामचंद्र नारायण किल्ले पुरंधरापैकीं असामी १०० शंभर यांविशीं.

१ नारो महादेव किल्ले सिंहीगडपैकीं असामी ७५ पाऊणशें यांविशीं.

१ रामराव नारायण किल्ले राजमाची, तालुके मजकूर, पैकीं असामी ५० यांविशीं.

१ रंगो शामराव किल्ले चंदन पैकीं असामी १५ पंधरा येविशीं.

१ भगवंतराव नारायण किल्ले चाकण पैकीं असामी १० दहा यांविशीं.

१ रघुनाथ सदाशिव तालुके रायगड पैकीं असामी १०० शंभर यांविशीं.

---

८

आठ सनदा दिल्या असेत. रसानगी महादाजी नरसी कारकून दिंमत सर्वोत्तम शंकर, हशमनीस.

१०३६ ( ९०७ )—पाद्री फैल्याद्र मानरदेव रेवदंडेकर याणें हुजूर येऊन अर्ज केला कीं, रेवदंड्यास मानरदेवीची रमेद फिरंगी याचे वेळेची आहे, तिच्या भिंती मजबूद आहेत परंतु वासे जुने होऊन वरील काम जाया जाहलें आहे, तें सरकारांतून नीट करून देविलें पाहिजे म्हणोन; त्याजवरून रमेदीचें कामाबद्दल रुपये १०० शंभर रुपये तालुके रेवदंडा पैकीं दे-

सीत समानीन मया व अलफ मोहरम १२

---

(1035) Men were brought to Poona from the service of Pratinidhi, Sachiv, and other officers to keep order during the alms giving ceremony in the month of Shrávaṇ.

A. D. 1785-86.

(1036) At the request of a Portuguese priest of Rewadanḍá, sanction was given to the expenditure of Rs. 100 on repairing a Christian church at Rewadanḍá.

A. D. 1785-86.

विले असत, तरी सदरहू शंभर रुपये देऊन काम करवणें म्हणोन, आनंदराव शिंदे याचे नांवें. सनद १.

रसानगीयादी.

१०३७ ( ९४३ )–श्रीपंचलिंग महादेव, वास्तव्य मौजे बारव, तर्फ हवेली, प्रांत जुन्नर यांस, तालुके शिवनेर, व तालुके चास वगैरे जागां कोळ्यांनीं दंगा केला होता त्यांचें पारपत्य होऊन बंदोबस्त जाला ह्मणजे श्रीचें देवालय बांधावें ह्मणोन बाळाजी महादेव यांणीं नवस केला; त्याप्रमाणें कोळ्यांचें पारपत्य होऊन बंदोबस्त जाला, सबब श्रीचें देवालय दोन हजार रुपयांत बांधावयाचा करार करून बाळाजी महादेव यांस आज्ञा केली आहे. तालुके शिवनेर व तालुके चास येथील गांवगन्ना पैकीं सरकारजमेशिवाय पट्टी करून दोन हजार रुपयांत देवालय बांधणें, जाजती पट्टी न करणें ह्मणोन, कमाविसदार यांचे नांवें. सनदा.

सबा समानीन मया व अलफ जमादिलावल २९

१ बाळाजी महादेव तालुके शिवनेर यांस कीं, श्रीचें देवालय दोन हजार रुपयांत बांधणें. सदरहूपैकीं सातशें रुपये निळकंठराव रामचंद्र, तालुके चास, यांजकडून देविले आहेत, बाकी तुह्मांकडून रुपये १३०० तेराशें देविले असेत, तरी तालुके मजकूर येथील गांवगन्नापैकीं देणें ह्मणून. सनद.

१ निळकंठराव रामचंद्र, तालुके चास, यांस कीं, श्रीचें देवालय दोन हजार रुपयांत बांधावयाची आज्ञा बाळाजी महादेव यांस केली आहे. सदरहूपैकीं तुह्मांकडून रुपये ७०० सातशें देविले असेत, तरी तालुके मजकूर येथील गांवगन्नापैकीं देणें, ह्मणन. सनद.

रसानगीयादी.

१०३८ ( ९५० )–द्वारकादास बैरागी हे श्रीगोदातीरीं मौजे बाभुळगांव, परगणा

( 1037 ) When a rebellion of kolis broke out in Táluká Siwaner and Tàluká Chàs, Báḷáji Mahádeo, officer of the former Tálukà, made a vow to build a temple to Shri Panch-Linga Mahádeo at Mouze Bárav in pránt Junner, if the rebellion was put down. The rebellion was suppressed and Báḷáji Mahádeo was permitted to fulfill his vow by levying Rs. 2000 from the two Tálukás in addition to Government demand.

A. D. 1786-87.

( 1038 ) Dwárkádás, a Bairági residing in the fields near Bábhuḷgaum in Parganá Waijápur was a great ascetic. In summer he surrounded himself on all sides with fire, in the

A. D. 1786-87.

सबा समानीन मया व अलफ. रजब २४

वैजापूर, नजीक रानांत राहतात, निस्पृहवृत्तीनें आहेत, बहुत योग्य तपस्वी, उष्णकाळीं पंचाग्निसाधन, व पर्जन्यकाळीं पर्जन्यांत, व शीतकाळीं जलांत, याप्रमाणें तपस्वी, निराहारी दुग्ध प्राशन करून आहेत, आल्या गेल्या ब्राह्मणास व बैरागीयास अन्न देतात, व गाईची सेवा करितात. यांचे सरकारांतून चालविल्यास श्रेयस्कर जाणोन, नूतन इनाम पडजमिनीपैकीं जमीन चाहूर १॥ दीड चाहूर द्यावयाची करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी यांचें मठाजवळ लगते परगणा वैजापूरचे गांव आहेत, तेथील गांवपैकीं यांचे उपयोगी व गाईच्या चरावयाचे उपयोगी पडजमिनीपैकीं जमीन सदरहूप्रमाणें पाहून नेमून त्यांचे हुमाला करून देऊन चतुःसिमेचा जाबता हुजूर पाठवून देणें. त्याप्रमाणें इनामपत्रें बैरागी यांचे नांवें करून दिल्हीं जातील ह्मणोन, रामचंद्र नारायण मामलेदार, परगणा नेवासें वगैरे महाल, यांचे नांवें.

सनद १.

रसानगीयादी.

१०३९ ( १०१३ )–श्रावणमासचे दक्षणेचे बंदोबस्तास तालुकेहायपैकीं लोक आणविले असेत, तरी पोटाची बेगमी करून पाठऊन देणें ह्मणोन.

इहिदे तिसैन मया व अलफ जिल्काद १

सनदा.

१ रघुनाथ चिमणाजी सचिव यांजकडील लोक असामी ३०० तीनशें येविशीं.
१ परशराम श्रीनिवास प्रतिनिधी यांजकडील लोक असामी ३०० येविशीं.
१ तर्फ शिवनेर निसबत बाळाजी महादेव यांजकडील लोक असामी २००.
१ किल्ले वंदन निसबत विश्वासराव नारायण लोक असामी ५०.
१ किल्ले पुरंधर निसबत रामचंद्र नारायण लोक असामी २००.
१ तर्फ पटा निसबत बाळकृष्ण केशव लोक असामी ५०.
१ किल्ले विसापूर निसबत भिकाजी गोविंद लोक असामी ६०.
१ किल्ले कोरीगड निसबत आनंदराव भिकाजी असामी ५०.
१ किल्ले चाकण निसबत भगवंतराव नारायण लोक असामी १५.

rainy season he exposed himself to rain and in winter he remained immersed in water. He lived on milk, distributed food to Brahmans and Bairágis, and was devoted to the service of cows. One and a half chahurs of inám land was therefore given to him.

( 1039 ) About 1800 men were ordered to Poona from different tálukás to assist in keeping order at the time of the payment of the Daxaṇá distributed in the month of Shrávaṇ.

A. D. 1790-91.

१ तालुके रायगड निसबत सदाशिव रघुनाथ लोक असामी २००.
१ किल्ले ताथवडा निसबत माधवराव कृष्ण असामी २५.
१ किल्ले राजमाची निसबत रामराव नारायण असामी ७५.
१ किल्ले चंदन व नांदगिरी निसबत रंगो शामराज लोक असामी ५०.
१ किल्ले परळी निसबत नारो बल्लाळ लोक असामी ३०.
१ किल्ले सिंहीगड निसबत केशवराव जगन्नाथ असामी १००.
१ किल्ले पाल निसबत गोविंदराव बल्लाळ असामी ७५.
१ किल्ले नारायणगड निसबत रामचंद्र शिवाजी असामी १५.
१ किल्ले घनगड हवालदार व कारकून लोक असामी १५.

१८

एकूण १८ सनदा दिल्ह्या असेत.

१०४० ( )—श्रीकार्तिकस्वामी, वास्तव्य पर्वती, यांचे प्रासादावर उल्कापतन होऊन विछिन्न जालें, त्याचा जीर्णोद्धार केला त्याजबद्दल खर्च आहे.

इसन्ने तिसन मया व अलफ सवाल ३

## ९ इनाम, नक्त नेमणुकी, वतनें वगैरे.

### ( ब ) देणग्या पुढें चालवणें.

### जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

१०४१ ( २८७ )—विनायकभट थथे यांस मौजे ताथवडें, तर्फ हवेली, प्रांत पुणें, हा गांव इनाम दिल्हा आहे, त्याचीं सरकारचीं इनामपत्रें होऊन राजपत्रें जालीं आहेत, त्या पत्रांवर सरकारचा शिक्का गडबडेमुळें जाहला नाहीं, यास्तव श्रीमंत महाराज राजश्री छत्रपती स्वामींस विनंती

सीत सबैन मया व अलफ रबिलाखर ५

---

( 1040 ) Some expenditure was incurred in repairing the temple of Shri Kártik Swámi at Parwati as it had been struck by lightening.

A. D. 1791-92.

( b ) Continuance of ináms.

FROM JANÁRDAN APPÁJI'S DIARY.

( 1041 ) The village of Táthawade in prânt Poona had been given to Vináyakbhat Thathe by the late Peshwá Mádhavrao and a Sanad had been issued but never sealed. The Peshwá's agent at Sátárá was asked to request the Satárá Rájá to cause

A. D. 1775-76.

करून, तीर्थस्वरूप कैलासवासी माधवराव साहेबांचे कारकीर्दींत पत्रें जालीं आहेत, सबब त्या वेळचे शिक्के काढवून भटजींच्या पत्रांवर शिक्का करून देणें ह्मणोन, कृष्णराव अनंत, मुक्काम सातारा, यांचे नांवें छ. ११ रबिलावल. सनद १.

येविशीं बाबूराव कृष्ण यांस सदरहू अन्वयें. सनद १.

२

. रसानगीयादी.

१०४२ ( ९८२ )—महालानिहाय येथील मुसलमान खुमाचे सदारत व अदालतीची मामलत तिमाराव भिमाजी याजकडे सालमजकुरापासून सांगोन, इनामदार, व जहागीरदार, व रोजिनदार, व काजी मुलाणे खतीबा वगैरे, व मोईतसबी, यांची चौकशी करून गैरसनदीमुळें ऐवज निघेल तो, व न्यायमनसुबीमुळें व सनदी लोकांपासून वाजबीच्या रीतीनें जीवन पाहून सरकारचा ऐवज साधावयाविशीं आज्ञा केली असे; तरी मुसलमान लोकांस ताकीद करून मशारनिल्हेकडे पाठवणें. ज्याचे ते रुजू होऊन सदारतीकडील पत्रें आणतील त्याप्रमाणें इनामगांव, व जमीन, व रोज, व वतनें, व हक्क लवाजमे चालवीत जाणें; दिकत असेल त्याची चौकशी, व खूम मजकुराचा न्याय इनसाफ वगैरे सदारतीचे व अदालतीचे अंमल मशारनिल्हेकडील कारकून येऊन करितील त्यांस करूं देणें; दुमाले व इनामगांव ज्यांकडे असतील त्यांस ताकीद करून अंमल देवित जाणें; व काजी मुलाणें वगैरेयांस गांवखर्चीं इनामजमीनी व हक्क असतील त्यांची वैवाट पाहतील त्याचा झाडा दाखवणें; येविशीं गांवगन्नाचे मोकदमांस ताकीद करणें ह्मणोन, मामलेदारं व जमीदार यांस चिटणिसी पत्रें.

तिसा समानीन मया व अलफ जमादिलावल ६

२ परगणे पारनेर.

१ महादाजी नारायण यांस.

१ जमीदारांस.

---

a search to be made for the late Peshwá's seals and to order the sanads to be sealed with it.

( 1042 ) Timárao Bhimáji was appointed to inquire into the land and cash alienation in parganá Párner, Nagar, Sinnar Sangamner, Násik &c. enjoyed by Mahomedans. Where no sanads were forthcoming the alienations were to be resumed. Where sanads were forthcoming a reasonable amount from the holder as *nazar* was to be levied for Government.

A. D. 1788-89.

२ तर्फ नगर हवेली.

१ महादाजी नारायण यांस.

१ जमीदारांस.

२ परगणे सिन्नर.

१ पांडुरंग धोंडाजी कमावीसदार यांस.

१ जमीदार परगणे मजकूर यांस.

———

२

२ तर्फ हवेली संगमनेर.

१ गणेश भवानी कमावीसदार यांस.

१ जमीदारास.

———

२

२ तर्फ त्रिंबक.

१ धोंडो महादेव यांस.

१ जमीदार यांस.

———

२

२ परगणे नाशिक.

१ कृष्णराव गंगाधर कमावीसदार यांस.

१ जमीदार यांस.

———

२

१ जमीदार परगणे पाडेपेडगांव यांस.

———

१३

१०४३ ( १०७६ )—परगणे येरंडोल वगैरे महाल येथें इनाम जमीनी आहेत, त्यास बेवारशी व जाजती सुदामतशिवाय अनभवीत असतील त्यांची चौकशी करून, बेवारशी व जाजती जमीनी असतील त्यांचा वसूल सरकारांत घ्यावयाविशीं तुह्मांस आज्ञा करून हें पत्र सादर केलें असे,

सलास तिसैन मया व अलफ सवाल २३

( 1043 ) An inquiry was ordered to be made into ináms which had become liable to resumption through failure of heirs, as also into those which were unauthorizedly held. All such ináms were ordered to be fully assessed to the revenue.

A. D. 1792-93.

तरी बेवारशी व जाजती जमीनी असतील त्याचा वसूल महालाकडे घेणें; आणि सुदामत इनाम असतील ते चालवणे ह्मणोन भिकाजी विश्वनाथ कमावीसदार यांचे नांवें चिटणिसी.

पत्र १.

येविशीं. पत्रें ४.

३ जमीदारांस.

१ परगणा येरंडोल.

१ परगणा नेर.

१ परगणा बेटावद.

३

१ मोकदम देहेबि तपशील.

२ परगणा येदलाबाद.

१ मौजे चांगदेव.

१ मौजे इटई.

२

१ मौजे वाघोर्दे परगणा रावेर.

१ मौजे घाधरणे, परगणे बेटावद.

४

४

## १० किताबती, व बहुमान.

### जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

१०४४ ( ३५२ )—बाबूराव कृष्ण यांचे नांवें सनद कीं, तुह्मांस बहुमान चवरी धावयाचा करार करून हे सनद सादर केली असे, तरी चवरी नवी करावयास रुपयें.

सबा सबैन मया व अलफ रमजान २९

X Grants of titles and honours.

FROM JANÁRDAN APÁJI'S DIARY.

( 1044 ) Baburao Krishna was permitted to use a *chawri*, and Rs. 30 were given to him to get one made ( Rs. 15 for cow's hair and Rs. 15 for the handle. )

A. D. 1776-77.

१५ गंगावनाचा कांदा.
१५ दांडीस रुपे.

३०

एकूण तीस रुपये नेमून एकसालां दिल्हे असेत, तरी किल्ले सातारा येथील ऐवजीं घेऊन चवरी करऊन बाळगीत जाणे ह्मणोन छ. १९ रमजान. सनद १.

परवानगीरूबरू.

## मुतालीकांचे रोजकिर्दीपैकीं.

१०४५ ( १९ )–बळवंतराव कदम बांडे याचे नांवे सनद कीं, ताराजी कदम शिलेदार तुह्मांकडील यांणीं तुमचे पथकांबरोबर स्वारींत चाकरी चांगली केली, सबब त्यांस आफ्तागिरा करार करून दिल्हा असे, तरी तुह्मांकडील सरंजामाचे ऐवजीं सदरहू आफ्तागिऱ्याची मोईन सालीना रुपये ५० पन्नास रुपये छ. १ सफरापासून देत जाणें; व आफ्तागिराचें सामान शिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन. सनद १.

इसन्ने तिसैन मया व अलफ सफर ७

रसानगीयादी.

## ११ सार्वजनिक इमारती, व लोकोपयोगीं कामें.

### ( अ ) विहिरी व तलाव.

१०४६ ( ४९६ )–अमृतराव आपाजी यांस सनद कीं, वेदमूर्ती देवशंकरभट ओझे, वास्तव्य मौजे धरोल, परगणे हकार, प्रांत सोरट, यांणीं द्वारकेचे वाटेस मौजे मजकूरचे रानांत सहा कोस उजाडींत पाणी नवतें तेथें विहीर खणोन पाणी पाडिलें आहे. तें वाटसरांचे उपयोगीं पडतें. परंतु भोवर-

समान सबैन मया व अलफ रजब १२

---

### FROM THE MUTÁLIK'S DIARY.

( 1045 ) Táráji Kadam Silledár, under Balwantrao Kadam Bânde. having done good service in the late campaign was given an annual allowance of Rs. 50 for the salary of an *áftágir* bearer.

A. D. 1791-92.

### XI Public buildings, and works of public convenience.

### ( a ) Wells and tanks.

( 1046 ) Dewashankarbhaṭ Oze of Dhároḷ in pargaṇa Hakár in prant Soraṭ had constructed a well within the limits of the village for the use of travellers proceeding to Dwárkà, as no water was to be had for 12 miles round. Sanction was accorded to an annual expenditure of Rs. 60 for drawing water from the well by bullocks.

A. D. 1777-78.

गांवचीं गुरें व वाटसरांचीं गुरें घोडीं वगैरे यांचे उपयोगीं मोट लाविल्याशिवाय पडत नाहीं, यास्तव मोट लाविली पाहिजे ह्मणोन, भटजींनीं विदित केलें; त्याजवरून मोटेचे बैलांस व माणसांस मिळोन दरसाल रुपये ६० साठ तालुके अमदाबादपैकीं नेमून देविले असत, तरी सदरहू साठ रुपये दरसाल मोटेचे बैलांस व माणसांस नेमून देणें, हे मोट लावतील ह्मणोन.

सनद १.

रसानगीयादी.

१०४७ ( ५२० )—बाजी गोविंद यांस सनद कीं, चिमणाजी महादेव व माधवराव राम यांणीं विदित केलें जें, कसबे पाल, मामले मजकूर, येथें हाटाळे तळें बहुतकाळीं आहे. तें गाळानें भरलें होतें, त्यास भुतांदेवतांचे उपद्रवाकरतां हा काळपर्यंत कोणीं गाळ काढून नीट केलें नाहीं, त्यास आपण तेथील जमीदारास पुसोन, भुतांदेवतांचा बंदोबस्त करून, दगडी बांध व घाट बांधोन तयार केलें. तळ्याचें पाणी गुरांस व जनांचे उपयोगीं पडतें. तळ्याचे दक्षणेस व पश्चमेस व उत्तरेस तिहीं बाजूंस बांधावर आंबे, केळीं व फुलझाडें लाविलीं आहेत. त्या कामास पदरचे आठशें रुपये, व गांवकरी, वाणी, उदमी वगैरे यांणीं उदकाचें काम सर्वांचे उपयोगीं परोपकार जाणोन पट्टी करोन तीनशें बेचाळीस रुपये दिले, त्यासुद्धां खर्च करून तळें बांधोन पाणी विपुल केलें. असें असतां सालमजकुरीं बाजी गोविंद यांणीं सरकारचें तळें तुह्मांकडे आहे, तें जाग्यासुद्धां आपणाकडे घ्यावें, याअन्वयें सरकारचें पत्र आह्मांस आणिलें, त्याजवरून आह्मीं पुण्यास येऊन सदरहू वर्तमान मशारनिल्हेस सांगितलें, तेव्हां त्यांणीं तळें जाग्यासुद्धां आमचे स्वाधीन करविलें आहे, त्याप्रमाणें आम्हांकडे चालवांवयाविशीं सरकारांतून सनद दिली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून मनास आणितां उभयतां मोडक यांणीं आपले पदरचा ऐवज पट्टी करून गांवकरी वगैरे यांणीं दिल्हा त्यासुद्धां खर्च करून तळें बांधून उदक विपुल सर्वांस केलें; आणि तळ्याचे तिहीं बाजूंस बांधावर झाडें आंबे, फणस वगैरे फळझाडें लाऊन बाग करून, सन सलास सीतैनापासून आज सोळा

समान सबैन मया व अलफ जिल्काद ३०

( 1047 ) The tank of Hátále in kasbá Pál had been silted up for a long time. No one ventured to clear it through fear of raising evil spirits. Chimṇáji Mahádeo and Mádhavrao Rám, with the permission of the Jamidàr, arranged about the evil spirits and had the stone wall and steps repaired at a cost of Rs. 1142: of this amount Rs. 800 was given by Chimṇáji himself, the remaining amount being raised by contributions. The tank had now an ample supply of water and trees were planted around it. It was now claimed by Bàji Govind, on behalf of Government. The matter being taken to the Peshwá, the tank was made over to Chimṇáji Mahádeo and the other person on account of their expenditure on it.

A. D. 1777-78.

वर्षें उपभोग करीत आहेत, त्यास सालमजकुरीं तळें सरकारी ह्मणोन तुह्मांकडे सुभा निसबत सरकारांतून दिल्हें होतें, त्यास मशारनिल्हे यांणीं सदरहू वर्तमान तुह्मांस सांगितल्यावरून तुह्मीं तळें मोडकांकडे ठेविल्याप्रमाणें सरकारांतून याजकडे करार करून दिल्हें असे, तरी पेशजींप्रमाणें मशारनिल्हेकडे तळें जागासुद्धां चालवणें, अडथळा न करणें ह्मणोन छ. २२ जिल्काद. सनद १.

रसानगीयादी.

## मुतालिक ह्यांचे रोजकिर्दीपैकीं.

१०४८ ( १२ )—मनोळी व सतगिरें या दोन्हींच्या दरम्यान सहा कोस पाणी न्हवतें, याजकरितां तुह्मांकडील रामचंद्र महादेव परांजपे यांणीं पैका खर्च करून विहीर बांधोन अरण्यांत पाणी उत्पन्न केलें, तेथें पांथिक येईल, राहील; त्यास वस्ती पाहिजे याजकरितां प्यादे नेहमीं ठेऊन वस्ती करावी लागत्ये, त्यास स्वामींनीं कृपाळू होऊन वसाहतीबद्दल जमीन नूतन देविली पाहिजे ह्मणोन, सदाशिव कृष्ण यांणीं विनंती केली; त्याजवरून नेगमीबद्दल सालमजकुरापासून जमीन. बिघे.

समान सबैन मया व अलफ मोहरम १८

१२० परगणे मुरगोडपैकीं विहिरीनजीक चिगर २ एकूण. बिघे.

६० मौजे मदलूरपैकीं चिगर १ बिघे.

६० मौजे श्रीरंगपूरपैकीं चिगर १

एकूण. बिघे.

१२० २

८० मौजे चिंचपूर, तर्फ सिंदोगीपैकीं. बिघे.

२००

एकूण दोनशें बिघे जमीन सदरहू तिही गांवपैकीं दूम, सीम प्रतींची देविली असे, तरी नेमून देऊन चालवणें, आकार होईल तो धर्मादाय खर्च लिहीत जाणें, दरसाल ताजे सनदेचा उजूर न करणें ह्मणोन महिपतराव कृष्ण यांचे नांवें. सनद.

रसानगीयादी.

---

## FROM THE MUTÁLIK'S DIARY.

( 1048 ) There being no water between Manoli and Satgire for a distance of 12 miles, Rámchandra Mahádeo built a well at his own cost between those villages. It became necessary to keep a guard at the place, to protect travellers who might halt there; Sadáshiv Krishņa offered to arrange for the guard and was given 200 bighás of land in inám for the purpose.

A. D. 1777-78.

१०४९ ( ७१५ )—आनंदराव मोरेश्वर व सदाशिव यादव उपनाम जावडेकर, गोत्र जामदग्नी, सूत्र अश्वलायन, यांणीं हुजूर कजबें पुणें येथील मुक्कामीं येऊन विनंति केली कीं, कसबें इंदापूर, परगणे मजकूर, सरकार जुन्नर, सुभे खुनस्ते बुनीयाद, येथें पाण्याचा तोटा, यास्तव आपण तळ्याची इमारत करून गांवास पाण्याची सोय केली, सबब परगणे मजकूरचे कमावीसदारांनीं व जमीदारांनीं आपणांस एक चावर जमीन इनाम देऊन चतु:सीमापूर्वक जावता करून दिल्हा, तो पाहून स्वामींनीं कृपाळू होऊन सदरहू एक चावर जमीन इनाम देऊन चालविली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून मनास आणतां गांवास पाण्याचा तोटा, सबब यांणीं कजबे मजकुरीं इमारत तळ्याची करून गांवास पाण्याची सोय केली, हें जाणोन यांजवर कृपाळू होऊन यांस परगणे मजकूरचे कमावीसदारांनीं व जमीदारांनीं एक चावर जमीन इनाम देऊन चतु:सीमापूर्वक जावता करून दिल्हा, तो पाहून त्याप्रमाणें जमीन चावर.

इसन्ने समानीन मया व अलफ रमजान १९

·|||१५ थळसमलट पैकीं जमीन.

·|· अव्वल.

·|· दूम.

·|१५ सीम.

---

·|||१५

यासी चतु:सीमा पूर्वेस बेड सिगवट. — पश्चमेस थळ पिसाळ इनाम. बाबूभट·अडगरे.

दक्षणेस थळ पिसाळ. — उत्तरेस थळ सिगवट.

ऽ१५ तळ्या नजीक गांवकरी यांची जमीन. — बिघे.

ऽ४ अव्वल.

ऽ६ दूम.

ऽ५ सीम.

---

ऽ१५

यासी चतु:सीमा पुर्वेस संभूप्रसाद मलट — दक्षणेस थळ जाधव. माळाचा उतरवट. उत्तरेस कसबे मजकूरचे

---

( 1049 ) There being scarcity of water at kasbá Indàpur, Anandrao Moreshwar and Sadásiv Yádav Jáwḍeker built a tank for the public use. He was given one *chàhur* of land in inám.

A. D. 1781-82.

पश्चमेस थल जाधव गांवकुसास
माळाचा उतरवट.

१

एकूण एक चावर जमीन अव्वल, दूम, सीम, तिही प्रतीची सदरहू चतुःसीमापूर्वक, स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा, देखील सरदेशमुखी, कुलबाब कुलकानु, हलीं पट्टी, व पेस्तर पटी, जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधि, निक्षेपसहित खेरीज हक्कदार करून नूतन इनाम सरकारांतून करार करून दिल्हीं असे, तरी सदरहू एक चावर जमीन यांचे दुमाला करून देऊन यांस व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालवणें, दरसाल नवीन सनदेचा आक्षेप न करणें, या सनदेची प्रती लिहून घेऊन हे अस्सल सनद यांजवळ भोगवटीयास परतोन देणें ह्मणोन सनदापत्रें.

२ फडणिसी.
१ नांवचें.
१ मोकदम कसबे मजकूर.

२

२ चिटणिसी. पत्रें.
१ देशाधिकारी, व लेखक वर्तमान व भावी.
१ देशमूख व देशपांडे.

२

४

सनदा व पत्रें चार दिल्हीं असेत.

रसानगी यादी.

१०५० ( ८४६ )—शिवाजी गोपाळ यांस पत्र कीं, कल्याणाहून वसईस खुष्कीचे मार्गे जातां मनुष्यांस पाणी उन्हाळे दिवशीं नाहीं, याजकरितां मौजे राजावली, तर्फ कामण प्रांत वसई, येथील शिवेंत राजमार्गावर रानांत कोण्हीं नवी विहीर धर्मपरायण बांधिली आहे. तिचें पाणी बहुत चांगलें असतां, कोळी मच्छीमार खाजणांतील येऊन विहिरींत पाय धुतात, व ताडाचें मद्य

अर्बा समानीन मया व अलफ रजब ९

( 1050 ) Jiwáji Gopál represented that a well built for charitable purposes at Rájáwali in tarf Káman on the road from Kalyán to Bassein contained good drinking water; but

A. D. 1783-84.

काढणार भंडारी भोपळे धुतात, असा उपद्रव होतो. त्याचा बंदोबस्त जाल्यास वाटसरांस निर्मळ पाणी व छाया नवी लावणी झाडांची केली आहे त्याची होईल, याजकरितां हें पत्र सादर केलें असे. तरी प्रांत मजकूरचे नेमणुकेपैकीं एक शिपाई नेमून देऊन विहिरीचे पाण्यास कोण्ही उपद्रव न देत असें करणें ह्मणोन चिटणिसी. पत्र १.

१०५१ ( ९६७ )—मैराळ भास्कर व निंबाजी भास्कर व यादो भास्कर व लक्ष्मण भास्कर व रामचंद्र भास्कर, गोत्र कौंडिण्य, सूत्र अश्वलायन, यारदी परगणे वण, सरकार संगमनेर, यांणीं हुजूर कसबे पुणें येथील मुक्कामीं येऊन विनंती केली कीं, मौजे राजापूर, परगणे मजकूर, हा गांव मार्गावरील, पाण्याची सोय नाहीं. त्यास गांवानजीक सप्तशृंगाचे मार्गावरी प्राचीन गायमुख तीर्थ आहे; त्या तीर्थाचें कुंड बेमरामत होऊन जाया जाहालें, त्यांत पाणी राहात नाहीं, याजमुळें सप्तशृंगीचे देवीचे यात्रेकरी यांस, व मार्गींचे आल्यागेल्या लोकांस, व गांवास पाणी मिळत नाहीं. त्या कुंडाचा जीर्णोद्धार करून कुंड बांधावयास आह्मांस सामर्थ्य नाहीं. त्यास तुह्मी कुंडाचे जीर्णोद्धारास जो पयका लागेल तो लाऊन कुंड बांधावें. या खर्चाचे ऐवजीं तुह्मांस मौजे मजकूरपैकीं बागाईत जमीन एकवीस बिघे इनाम करून देऊन भोगवटीयास चतु:सीमापूर्वक पत्र करून देतों, ह्मणोन मोकदम मौजे मजकूर यांणीं सांगितलें, त्यास आह्मीं मान्य होऊन कुंडाचे जिर्णोद्धारास काम लाविलें त्याजवरून मौजे मजकूरचे मोकदम यांणीं मौजे मजकूरपैकीं बागाईत जमीन टिकी दोन एकूण जमीन बिघे ८२१ एकवीस चतु:सीमापूर्वक आपल्यास इनाम देऊन भोगवटियास इनामपत्र करून दिल्हें आहे, त्यास स्वामींनीं कृपाळू होऊन मोकदम याचे सदरहू जमिनीचें इनामपत्र आपल्या जवळ आहे तें पाहून त्याप्रमाणें सरकारांतून जमीन आपणास इनाम करार करून देऊन भोगवटियास इनामपत्रें करून दिल्हीं पाहिजेत म्हणून; त्याजवरून मनास आणितां मौजे मजकुरीं गायमुखाचें कुंड आहे, त्याची बंदिस्त जाया जाहली आहे, कुंडांत पाणी राहात नाहीं, याजमुळें श्री देवीचे यात्रेकरी यांस व आल्यागेल्या लोकांस व गांवास पाणी मिळत नाहीं. याजकरितां कुंड बांधावयास पैका लागेल तो लाऊन कुंड

समान समानीन मया व अलफ रबिलाखर २७

that the water was fouled by fishermen washing their feet in it, and Bhandáries washing their liquor-pots in it. A peon was therefore appointed to prevent the well being fouled.

( 1051 ) Mairáḷ Bháskar and four others, Yárdis of parganá Waṇ in Sirkár Sangamner, were granted by the village officers of Rájápur in the said parganá some inám land in consideration of their having repaired, for the use of travellers, a tank on the road to Saptashringa. The grant was confirmed by the Peshwá.

A. D. 1787-88.

बांधावें. त्याचे खर्चाचे ऐवजीं यांस मोकदम यांणीं मौजे मजकूरपैकीं एकवीस बिघे जमीन बागाईत इनाम देऊन, आपलें पत्र करून दिल्हें आहे. तें यांणीं हुजूर आणून दाखविलें. तें पाहून यांचें चालवणें अवश्यक जाणून यांजवरी कृपाळू होऊन मोकदम यांचे पत्राप्रमाणें मौजे मजकूरपैकीं बागाईत पाणी पिती ठिकीं दोन एकूण जमीन बागाईती गजानें बिघे ८२१

पूर्वेस नागोजी देशमूख याचा कनीर मळा लगता १

पश्चमेस कसबे वण येथें जावयाचा रस्ता १

दक्षणेस कृष्णा देवकर याचा मळा.

उत्तरेस पुंजा शेट याचा मळा १

येणेंप्रमाणें एकवीस बिघे जमीन बागाईत सदरहू चतुःसीमापूर्वक स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा, देखील सरदेशमुखी कुलबाब कुलकानू हल्लीं पट्टी व पेस्तर पट्टी जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधी, निक्षेपसाहित खेरीज हक्कदार करून इनाम तिजाईसुद्धां दरोबस्त सरकारांतून इनाम यांस करार करून दिल्ही असे, तरी गायमुखाचें कुंडाचें काम चांगलें पक्कें करतील, त्यास मौजे मजकूरपैकीं सदरहूप्रमाणें एकवीस बिघे जमीन यांचे दुमाला करून देऊन, यांस व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालवणें. दरसाल नवीन सनदेचा उजूर न करणें. या सनदेची प्रती लेहून घेऊन हे अस्सल सनद याजवळ भोगवटियास परतोन देणें म्हणोन. सनदा पत्रें.

३ फडणिसी. सनदा.

१ मैराळ भास्कर, व जिवाजी भास्कर, व यादो भास्कर, व लक्ष्मण भास्कर, व रामचंद्र भास्कर यारदी यांचे नांवांची. सनद.

१ मोकदम मौजे मजकूर यांस.

१ गंगाधर भिकाजी यांस कीं, अलाहिदा भोगवटियास इनामपत्रें करून दिल्हीं आहेत, त्याप्रमाणें मौजे मजकूरपैकीं एकवीस बिघे जमीन यांचे दुमाला करून देऊन, आकार होईल तो परगणे मजकूरचे हिशेबीं यांचे नांवें इनामखर्च लिहीत जाणें.

---

३

२ चिटणिसी. पत्रें.

१ देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी, परगणे मजकूर यांस.

१ देशमूख व देशपांडे, परगणे मजकूर यांस.

---

२

---

५

एकूण सनदा तीन, व पत्रें दोन मिळोन पांच दिल्हीं असेत.

रसानगी यादी.

# ११ सार्वजनिक इमारती व लोकोपयोगीं कामें.

## (ब) दुसरीं कामें.

१०५२ (७१०)–तुकोजी होळकर यांणीं क्षेत्र पंढरपूर येथें अन्नछत्राचा वाडा बांधावयाकरतां तुळया वगैरे लांकडें रायवळ अडीचशें एकूण ताफे सुमारें पांच पुणियांत खरेदी करून, क्षेत्रमजकुरीं पुणियाचे नदींतून नेतील, त्यास नेऊं देणें. सदरहू लांकडाची जकात यांस माफ केली असे, तरी आकार होईल तो यांचे नांवें माफखर्च लिहून जकातीचा तगादा न करणें ह्मणोन, भिकाजी विश्वनाथ कमावीसदार जकात प्रांत पुणें जुन्नर यांस. सनद १.

इसन्ने समानीन मया व अलफ साबान १७

रसानगी यादी.

१०५३ (८२९)–बाळाजी महादेव मामलेदार तालुके शिवनेर यांचे नांवें सनद कीं, घाट मालसेज तालुके मजकूर इंग्रजाचे गडबडीमुळें सरकारांतून पाडविला होता, त्याची हल्लीं बंदिस्त करून घाट चालवावयाची आज्ञा तुह्मांस केली असे, तरी घाटाचे बंदिस्तीस खर्च चौकशीनें करून खर्च होईल त्यापैकीं ऐवज दोन हिसे बापूजी गणेश व उधो दादाजी कमावीसदार, जकात प्रांत कल्याणभिवडी यांजकडून व एक हिसा भिकाजी विश्वनाथ कमावीसदार जकात प्रांत पुणें व जुन्नर यांजकडून देविला असे, तरी सदरीलप्रमाणें तीन हिसे ऐवज घेणें, बाकी एक हिस्सा ऐवज राहिला, तो तुह्मीं लाऊन तालुके मजकूरचे हिशेबीं खर्च लिहिणें, मजुरा पडेल ह्मणोन. सनद.

अर्बा समानीन मया व अलफ जिल्हेज १५

रसानगी यादी.

---

## XI Public buildings and works of Public convenience.

### (b) Other works.

(1052) Permission was given to Tukoji Holkar to float down free of duty, timber from Poona to Pandharpur by river, for the purpose of a charitable poor house which he intended to build there.

A. D. 1781-82.

(1053) The pass of Málsej in tarf Siwner had been destroyed by Government during the war with the English. It was now ordered to be repaired.

A. D. 1783-84.

१०५४ ( ८९४ )—मौजे राजेवाडी, तर्फ करेपठार, प्रांत पुणें, येथील हणमंताचें
सीत समानीन
मया व अलफ
रमजान २३
देवालय जीर्ण झालें आहे, तें व धर्मशाळा नवी बांधावयाकरितां गांवकरी यांणीं अर्ज केला; त्याजवरून देवालय व धर्मशाळा बांधावयाबद्दल मौजे मजकूर येथील सालमजकूरचे ऐवजीं रुपये १५० दीडशें देविले असेत, तरी देऊन देवालय व धर्मशाळा बांधवणें. सदरहू दीडशें रुपये तुह्मांस प्रांत मजकूरचे ऐवजीं मजुरा पडतील ह्मणोन, रामचंद्र नारायण यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

१०५५ ( ९६९ )—मौजे वारी, परगणे कुंभारी, हा गांव तालुके धोडप येथील बे-
समान समानीन
मया व अलफ
जमादिलाखर २९
गमीस आहे, त्यास मौजे मजकूरचें गांवकुसूं सालमजकुरीं श्री गंगेस महापूर येऊन कुसास धक्का बसोन तीन बाजूंच्या भिंती वाहून गेल्या, याजकरितां कुसूं घालावयास काम लाविलें आहे, त्यांचे खर्चाबद्दल सरकारांतून ऐवज द्यावयाची आज्ञा जाली पाहिजे, ह्मणोन मोकदम मौजे मजकूर यांणीं अर्ज केला, त्याजवरून गांवकुसाचे बंदिस्तीबद्दल एक सालां रुपये १००० एक हजार रुपये देविले असेत, तरी मौजे मजकूरची जमाबंदी सालमजकुरीं होईल, त्यापैकीं सदरहू एक हजार रुपये देणें ह्मणोन, बाजीराव आपाजी तालुके मजकूर यांचे नांवें छ. ६ जमादिलाखर. सनद १.

रसानगीयादी.

१०५६ ( १००० )—रामचंद्र कृष्ण यांचे नांवें सनद कीं, तुह्मीं विनंतीपत्रें पाठविलीं
तिसैन
मया व अलफ
रावलावल २९
तीं प्रविष्ट जाहालीं. तालुके मुल्हेर येथिल बंदोबस्ताविशीं लिहिलें त्यास. कलमें.

---

( 1054 ) On the application of the villagers of Rájewádi in tarf
A. D. 1785-86.
Karepathár. Rs. 150 were given for the construction of a temple and a Dharmashálá.

( 1055 ) The wall round the village of Wári in parganá Kumbhári
A. D. 1787-88.
having been washed away on 3 sides by the flood of the Godávari, Rs. 1000 were given to the villagers out of the Government revenue of the village, for its repair.

( 1056 ) The village wall of Thengode being out of repair, the
A. D. 1789-90.
Wánis and traders threatened to leave the village. The wall was ordered to be repaired at a cost of Rs. 1000, half being contributed by the villagers and the rest by Government.

मौजे ठेंगोडें येथील पेठचें कुसूं जागां जागां पडोन वाट्टा बहुत जाहल्या, यामुळें वाणी उदमी कुसूं तयार न जाहल्यास मालेगावीं जाणार, त्यास तयार करावयासी एक हजार रुपये अजमासें लागतील. पेठेची जमा तर सात ' आठशें रुपयेपर्यंत आहे. यास्तव निमे पट्टी व निमे सरकार याप्रमाणें खर्च लाऊन दोहों सालांत तयार करावयाची आज्ञा जाहल्यास करीन, म्हणोन लिहिलें. त्यास पट्टीचा ऐवज निमेवर जाजती साधतां साधेल तो साधून, तो ऐवज व बाकी सरकारचा लाऊन एक हजार रुपयांत कुसूं तयार करून हिशेबीं खर्च लिहिणें. कलम १.

मौजे सावकी, परगणे लोहनेर, येथील बंधारा जीर्ण जाहला, त्यामुळें चार पांच जागां जाया होऊन पाणी जातें. त्याचे डागडोजीची हैगई जाहल्यास दोन हजार रुपयाचा गांव चार पांचशांवर येईल; यास्तव सावकार उभा करून चार पांचशें रुपये लागतील ते •लाऊन, त्याचा ऐवज व्याजासुद्धां फिटे तों ऐन जमेपैकीं शंभर रुपये दरसाल रदकर्जीं देववावयाची आज्ञा जाहली पाहिजे, ह्मणोन लिहिलें, त्यास बंधाऱ्याची डागडोजी चौकशीनें चार पांचशें रुपयेपर्यंत लाऊन परभारें सावकाराकडून करवणें; आणि त्याचा ऐवज सरकारी शिरस्तेयाचे व्याजानें फिटे तोंपर्यंत दरसाल ऐन जमेपैकीं अजी वजा शंभर

पेठ ठेंगोडें येथें चौबुर्जी वाडा बर्वे यांणीं बांधिला आहे, त्यांत कमावीसदार व पेठेचे बंदोबस्ताचे लोक राहतात. वाड्याची डागडोजी नाहीं, यामुळें जाया होतो, त्यास दलालीचा ऐवज पेशजीं वाड्याकडे डागडोजीस होता. अलीकडे सरकार हिशेबीं जमा येतो, त्यापैकीं पंचवीस रुपये डागडोजीस सालगुदस्तां खर्च केला आहे, ते व पुढें दरसाल पंचवीस रुपये लाऊन डागडोजी करावयाची आज्ञा जाहली पाहिजे, ह्मणोन लिहिलें. त्यास वाड्याचे डागडोजीस सालगुदस्तपासून पंचवीस रुपये लावावयाची नेमणूक केली असे; तरी सालगुदस्त खर्च जाहला आहे ते, व सालमजकुरापासून पंचवीस रुपयेपावेतों खर्च लाऊन, हिशेबीं खर्च लिहीत जाणें. कलम १.

हशमी लोकांत लढवाई व स्वारी शिकारीचे उपयोगीं आहेत, त्यांस ठेवणुकेचे वेळेस लहान होते त्यामुळें तैनाता कमी पडल्या आहेत. यास्तव त्यांस इजाफा केला पाहिजे. आज्ञा जाहल्यास सेन्यांत संभाळून करीन, ह्मणोन लिहिलें, त्यास इजाफा करावयाजोगे असतील त्यांचा जाबता इजाफ्यासुद्धां तैनातेचा, व ज्यांची कमी करावयाची असेल त्यांचे तैनातेचा, याप्रमाणें दोन जाबते पाठवावे. समजोन आज्ञा करणें ते केली जाईल. कलम १.

लोकांचे हिशेबास वीस हजार रुपये

A dam at Mouze Sáwki in parganá Lohoner useful for irrigation was also ordered to be repaired.

रुपये करून, सावकारास रदकर्जी देत जाणें. कलम १.

शहर मुल्हेर या भोंवतालां चोरट्यांचा उपद्रव बहुत. एक दोन वेळ दरवडे आले ते संभाळिले. त्यास शहरचें कुसूं जुनें पडलें आहे, तें नीट करावयास दोन हजार पावेतों खर्च लागेल, त्यास शहरचे ब्राह्मण व उदमी यांजवर दीड हजार रुपयांची पट्टी केली आहे. वसूल करून काम चालतें करणार येविशीं, व जाजती खर्च लागल्यास सरकारांतून लावावा किंवा गांवगन्ना पट्टी करून घ्यावे, येविशीं आज्ञा जाहली पाहिजे ह्मणोन लिहिलें. त्यास दीड हजारांची पट्टी केली आहे तो ऐवज घेऊन काम करावें, जाजती लागल्यास गांवगन्ना साधून साराच ऐवज हिशेबीं जमा धरून खर्च लिहिणें. कलम १.

देविले ते आले नाहीं ह्मणोन लिहिलें, त्यास ऐवज देविला आहे, वाटणीस कारकून येईल त्याचे गुजारतीनें वाटणी करणें. कलम १.

कुटुंबाचीं माणसें मुल्हेरीस होतीं, तीं हल्लीं नाशिकास ठेविलीं आहेत. त्यास तेथें चौकीस दहा शिपाई ठेविण्याची आज्ञा जाहली पाहिजे, ह्मणोन लिहिलें. त्यास चौकीस ठेवावयास लोक द्यावयाचे नाहीं. कलम १.

एकूण सात कलमें. सदरहू लिहिल्याप्रमाणें करणें ह्मणोन छ. १५ सफर. सनद १.
रसानगी, त्रिंबक नारायण परचुरे, कारकून निसबत दफ्तर.

१०५७ ( १०६४ )—कृष्णाजी बल्लाळ यांचे नांवें सनद कीं, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. मालसेज घाट तालुके शिवनेर येथें आहे, त्यास अवघड जागे होते तेथें जुनी बंदिस्त कोरे दगडांची होती, ती सालमजकुरीं पर्जन्य भारी पडल्यामुळें जागां जागां कोसळून गेली, बैल जावयाचा मार्ग मोडला. नवी बंदिस्त केल्याशिवाय घाट चालून जकातीची आबादानी होत नाहीं, याजकरितां नवी बंदिस्त कोरे दगडांची बांधोन हंगामी घाट चालता केल्यास, वाणी उदमी जाऊन आबादानी करितील. बंदिस्त करावयास पंधरा सोळाशें

सलास तिसैन मया व अलफ रबिलाखर १४

The town wall of Mulher was ordered to be repaired at a cost of Rs. 1500, to be raised by public contribution.

( 1057 ) Krishnáji Ballál represented that owing to heavy rains the Málsej pass had got out of order and was inaccessible: he was directed to repair the pass recovering

A. D. 1792-93.

पर्यंत अजमासें रुपये लागतील, त्यास सन अर्बा समानीनांत इंग्रजाचे दंग्यामुळें घाट पडला होता, त्याची बंदिस्त सरकारांतून करून चालता केला, तेव्हां बंदिस्तीस खर्च लागला तो प्रांत कल्याण येथील जकातदार यांजपासून दोन हिस्से व एक हिस्सा प्रांत पुणें येथील जकातदार यांजपासून, व एक हिस्सा तालुके मजकुराकडून नेमून देविला होता, त्याप्रमाणें द्यावयाविशीं आज्ञा जाहल्यास घाटाची बंदिस्त करीन ह्मणोन लिहिलें, तें कळलें; ऐशास घाटबंदिस्तीस प्रांत कल्याणभिंवडी दोन हिस्से, व प्रांत पुणें एक हिस्सा, एकूण तीन हिस्से बंदिस्तीचे खर्चाचे आकारपैकीं ऐवज तुह्मांकडे द्यावयाविशीं सदरहू जकातीकडील कमावीसदारांस अलाहिदा सनदा सादर केल्या आहेत, त्याप्रमाणें त्यांजपासोन ऐवज घेणें, आणि एक हिस्सा तालुके मजकूरचे हिशेबीं खर्च लिहून मालसेज घाटाची बंदिस्त चौकशीनें कोऱ्या दगडाची चांगली मजबुदीनें करणें ह्मणोन. सनद १.

जकातदार यांस कीं, तुह्मांकडून ऐवज देविला असे, तरी जकातीचे ऐवजीं पावता करून कबज घेणें ह्मणोन. सनदा २.

१ विसाजी भिकाजी कमावीसदार यांस चौथाई ऐवज देण्याविशीं.

१ बाबूराव हरी कमावीसदार, जकात कल्याणभिंवडी, यांस निमे ऐवज देण्याविशीं.

३

रसानगी, त्रिंबकराव नारायण कारकून, निसबत दफ्तर.

## १२ टपाल खातें.

### जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

१०५८ ( ३८२ )—कलकत्तेकर इंग्रजांकडील वकील हुजूर आहेत, त्यांचीं पत्रें कलकत्यास जावयाचीं, त्यांचा लाखोटा सरकारचे सांडणीस्वाराबरोबर तुह्मांकडे रवाना केला आहे, तरी सांडणीस्वार तुह्मांजवळ बऱ्हाणपुरास येऊन दाखल होतांच आजुरदार कासीदाचा चौकडा करून त्यांजवळ सदरहू लाखोटा देऊन जलदीनें काशींतील इंग्रजांकडे पाठऊन देणें. ह्मणजे ते

सलास सबैन मया व अलफ जिल्हेज २९

---

half the cost from the Octroi contractor of parganá Kalyáṇ and Bhiwandi, one-fourth from the contractor of Poona, and one-fourth from the mahal revenue of Shiwaner.

XII Postal Service.

FROM JANÁRDAN APPÁJI'S DIARY.

( 1058 ) Letters from the agent at the Huzur of the English colony at Calcuttá had to be sent to Calcuttá. These were sent with a camel-rider in the service of Government to

A. D. 1786-87.

तेथोन कलकत्त्यास पाठऊन सदरहूचा जाबसाल आणिती तोंपर्यंत कासीदाचे चौकडानें काशींतील इंग्रजापाशीं राहून, कलकत्त्याहून सदरहू लाखोट्याचा जाब येईल, तो काशींतील इंग्रज कासीदाचे चौकड्याजवळ देतील, तो कासीद तुह्मांजवळ घेऊन येतांच हुजूर पाठऊन देणें. कासीदाचा चौकडा काशीस पाठवाल, ते तेथें किती रोजांत गेले, व तेथें किती दिवस कागदाचे जाबाकरितां राहिले, व काशींतून किती रोजांत माघारे तुह्मांजवळ शहरीं आले, याचा दाखला लिहून पाठवणें. वायदेयाची बोली करून जलद जात, व तिकडून येतांना जलद येत तें करणें. कासीदाचा आजुरा पडेल तो हिशेबीं लिहिणें. मजुरा पडेल ह्मणोन, नारो कृष्ण यांचे नांवें छ. १३ सवाल. सनद १.

परवानगी रूबरू.

१०५९ ( ६३० )–बेलापूर येथील बातमीचा मचवा जाया जाला आहे, त्यास मुंबईची बातमी जलद आली पाहिजे, यास्तव नारो विष्णू कारकून तेथें बातमीच्या कामास आहेत, ते सांगतील त्याप्रमाणें सरंजाम देऊन मचवा लौकर तयार करवणें. मचवा तयार न होऊन बातमी लौकर आली नाहीं तरी कार्यास येणार नाहीं ह्मणोन, कृष्णाजी नारायण तालुके बेलापूर यांचे नांवें. सनद १.

समानीन मया व अलफ रजब १६

रसानगी, भिकाजी गोविंद गोडबोले कारकून, दिंमत चिंतामण हरी दीक्षित.

१०६० ( ७२८ )–नवाब हैदर अलीखान बहादूर यांजकडील बातमी आणावयाकरितां बदामीपासून पुणियापावेतों डाक ठेवावयाची तुह्मांस आज्ञा केली असे, तरी डाकेस माणसें असामी ६० साठ परगणे बागलकोट येथील शिरस्तेप्रमाणें ठेऊन त्यांस रोजमरा परगणें मजकूरचे ऐवजीं

इसन्ने समानीन मया व अलफ जिल्काद १५

---

Barhánpur and the officer of Barhánpur was ordered to send 4 messengers with them on to the English at Káshi who would forward them to Calcuttá and get a reply. The reply when received by the English at Káshi was to be given to the 4 messengers who were to wait at Káshi till its receipt. The reply on reaching Barhánpur was to be immediately forwarded to the Huzur. The officer of Barhánpur was further directed to induce the messengers to go and return quickly by offers of rewards.

( 1059 ) The boat which carried letters from Bombay to Belápur being out of repair, orders were issued to repair it at once; so that news from Bombay might not be delayed.

A. D. 1779-80.

( 1060 ) Anandráo Bhikáji was directed to arrange for a postal

देत जाणें, मजुरा पडेल ह्मणोन, आनंदराव भिकाजी यांस. सनद १.

परवानगी रूबरू.

१०६१ ( ८२५ )–४६ अजुरा खर्च खेमकर्ण वकील यांजकडून दिल्लीहून कासीद जोडी अजुऱ्यानें आली, तिचा करार पंचवीस रोजांनीं पुण्यास पावल्यास पन्नास रुपये द्यावे, त्यास जाजती दोन रोज लागले त्याचे वजा रुपये ४ बाकी अजुरा. रुपये.

अर्बा समानीन मया व अलफ सवाल १९

रसानगी यादी.

२३ साहेबराम वलद रामकुवार.

२३ रामचंद्र वलद रतीराम.

४६

## १३ वैद्यकी व शस्त्रक्रिया.

### नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

१०६२ ( २०२ )–वेदमूर्ती राजश्री सदाशिवभट नानल यांणीं श्रीमंत महाराज राजश्री छत्रपती स्वामी यांस औषध दिलें, तेणेंकरून आरोग्य जालें, यास्तव स्वामींनीं कृपाळू होऊन यांस मौजे नसरापूर येथें एक चावर जमीन इनाम नेमून द्यावयाविशीं आज्ञा केली; त्याजवरून सदाशिव पंडित सचीव यांस मौजे मजकुरीं एक चावर जमीन चतुःसीमापूर्वक नेमून द्यावयाविशीं पत्र दिल्हें, त्यास मौजे मजकुरीं एक चावर जमीन बेवारशी न मिळे, यास्तव एकुणतीस बिघे जमीन मौजे मजकुरीं नेमून देऊन बाकी चावराचे भरतीस गांवगन्ना तर्फ पौनमावळ-पैकीं नेमून देऊन आपलीं पत्रें करून दिल्हीं आहेत. त्याबावत सरकारांतून करार करून

खमस सबैन मया व अलफ रबिलाखर ५

---

A. D. 1781-82. service from Badámi to Poona in order to obtain news about Nawáb Haideralli-KhànBahádur and he was permitted to entertain 60 runners for the purpose.'

1061 ) Two messengers sent by Khemkarṇa agent, came from Delhi to Poona in 27 days. The agreement had been to pay them Rs 50 if they came in 25 days: Rs. 4 were cut as they were 2 days over time and they were paid Rs. 46 ( that is Rs. 23 each. )

A, D. 1783-84.

## XIII Medicine and Surgery.

### FROM NÁRO APPÁJI'S DIARY.

( 1062 ) Sadàshivbhaṭ Nánal having cured the Satárá Rájá was granted one *chàhur* of land in inám at Nasrápur.

A. D. 1774-75.

अलाहिदा भोगवटियास पत्रें करून दिल्हीं आहेत, त्याप्रमाणें तुह्मीं श्रीमंत छत्रपती स्वामी यांस विनंती करून राजपत्रें करून देवणें ह्मणोन, कृष्णराव अनंत, मुक्काम सातारा, यांस छ. ३ रविलाखर. सनद १.

रसानगी यादी.

१०६३ ( ६२६ )—जयशंकर व देवशंकर बिन भवानीशंकर वैद्य गुजराथी, वास्तव्य कसबे नाशिक, यांस मौजे तळेगांव अंजनेर, परगणे नाशिक, येथील मोकासा जगजीवन पवार यांजकडून होता तो व सरकारतर्फेनें जागीर फौजदारी व बाबती सरदेशमुखी एकूण दरोबस्त अंमल देखील घासदाणा व खरेदी व वेठबेगार कुलबाब कुलकानू, धर्मार्थ गोरगरीबांस औषध देतात, सबब आरोग्यशालेबद्दल पेशर्जी सरकारांतून करार करून दिल्हा, त्याप्रमाणें चालत होता. त्यास उभयतां मृत्य पावले, सबब जयशंकर याचे पुत्र वेदमूर्ति राजश्री विद्याधर वैद्य बिन जयशंकर वैद्य यांजकडे पेशर्जीप्रमाणें मौजे मजकूर येथील दरोबस्त अंमल धर्मार्थ गोरगरीबांस औषध द्यावयास आरोग्यशालेबद्दल करार करून दिल्हा असे; तरी गांव यांजकडे चालऊन, परगणे मजकूर येथील हिशेबीं यांचे नांवें पेशर्जीप्रमाणें ऐवज खर्च लिहित जाणें ह्मणोन, पांडुरंग धोंडोजी कमावीसदार, परगणे मजकूर यांचे नांवें.

समानीन मया व अलफ जमादिलाखर २६

सनद १.

१०६४ ( ७२३ )—वेदमूर्ति आपाभट वैद्य वाईकर यांजकडून कसबे वाई येथें सरकारांतून रसायणें करविलीं आहेत, त्यास औषधी लावावयाबद्दल जमीन बिघा ८१ एक बिघा जमीन देविली असे, तरी कसबे मजकुरीं वैद्य यांचे घरासमीप पडे अशी सदरहू एक बिघा जमीन नेमून देणें. त्या जमिनींत हे औषधें लावितील, त्यास पुरे असें पाणी पाटाचें दररोज देत जाणें. औषधाचें काम जाल्यावर जमीन माघारे घेणें ह्मणोन, भवानीशंकर हैबतराव यांचे नांवें.

इसने समानीन मया व अलफ सवाल ७

सनद १.

रसानगी यादी.

---

( 1063 ) The Government *amal* of the village of Talegaum Anjner in pargaṇá Násik was granted to Jayshankar and Dewashankar bin Bhawánishankar Vaidya Gujaráthi in consideration of their dispensing medicines gratis to the poor. The *amal* was on their deaths continued to Jayshankar's son Vidyádhar Vaidya, to be spent on medicines for the poor.

A. D. 1779-80.

( 1064 ) Apábhaṭ Vaidya of Wái had been ordered to prepare some medicines for the Peshwà. Orders were issued to give him one bighá of land near his house that he might grow medicinal herbs in it, to supply the land with sufficient water, and to take back the land after the medicines had been prepared.

A. D. 1781-82.

१०६५ ( १०७५ )—वेदमूर्ती भीमाशंकरभट बिन वासुदेवभट वैद्य यांणीं हुजूर येऊन विनंती केली कीं, आपले तीर्थरूप वासुदेवभट वैद्य यांस कसबे संगमनेर, तर्फ मजकूरचे मालांपैकीं वर्षासन दोनशें रुपये पावत होतें, त्यास ते मृत्य पावले, सबब आपले नांवें करार करून देऊन चालविलें पाहिजे ह्मणोन; त्याजवरून मनास आणितां, यांचे तीर्थरूपांस वर्षासन गोरगरीबांस औषध द्यावें त्याबद्दल रुपये शंभर व उदर पोषणानिमित्त रुपये शंभर, याप्रमाणें पावत होतें. त्यास ते मृत्य पावले, सबब यांचे नांवें पेशजींप्रमाणें कसबे मजकूरचे मालांपैकीं सालीना रुपये २०० दोनशें करार करून देऊन हे सनद सादर केली असे, तरी सदरहूप्रमाणें दोनशें रुपये वर्षासन कसबे मजकूरपैकीं पाववीत जाणें. दरसाल ताजे सनदेचा आक्षेप न करणें. या सनदेची प्रती लिहून घेऊन हे असल सनद भटजीजवळ भोगवटियास परतोन देणें ह्मणोन, कमावीसदार वर्तमान भावी तर्फ हवेली, परगणे संगमनेर, यांचे नांवें.

सलास तिसैन
मया व अलफ
सफर २३

सनद १.

रसानगी याद.

## १४ व्यापार व कारखाने.

### ( अ ) पेठ व बाजार बसवणें.

१०६६ ( ५४८ )—कसबे बारशी, परगणे मजकूर, येथें नवी पेठ वसवावयाकरितां भवानराव शामराव यांणीं पेशजीं सरकारचा कौल वाणी उदमी यांस वगैरे सात सालां नेऊन, पेठेची वसाहत केली आहे, त्यास कसबे मजकूरपैकीं पेशजीं पेठेकडे जमीन दिल्ही आहे, त्याशिवाय त्या जमीनीचे लगती दहा बिघे जमीन कसबे मजकूरपैकीं पेठेकडे वसाहतीबद्दल द्यावयाचा करार करून हे सनद सादर केली असे, तरी सदरहूप्रमाणें जमीन पेस्तर सालापासून पेठे-

समान सबैन
मया व अलफ
सफर २६

---

( 1065 ) Wásudeobhat, a medical practitioner of Sangamner, was granted an allowance of Rs. 200 for dispensing medicines to the poor ( Rs. 100 for cost of medicines and Rs. 100 for his maintenance ). The allowance was on his death continued to his son Bhimáshankarbhat.

A. D. 1792-93.

XIV Trade and Manufacture.

( A ) Establishment of peths and markets.

( 1066 ) A new peth was established at Bársi by Bhawánráo Shámráo, after obtaining from Government a *kowl* in favour of the traders. Ten bighás of land were given as site for the peth in addition to what had previously been given.

A. D. 1777-78.

कडे देणें, दिक्कत न करणें ह्मणोन, मौजे मजकूरचे मोकदमास. सनद १.

सदरहू अन्वयें परगणे मजकूरचे जमीदारास चिटणिसी पत्र १.

२.

## १४ व्यापार व कारखाने.

### ( ब ) देशांत येऊन राहणाऱ्या व्यापाऱ्यांस उत्तेजन.

१०६७ ( ४५ अ )–कसबे सुपें, परगणे मजकूर, येथें जुनीपेठ बुधवार बाजाराची आहे. ते पेठेंतील कुळें नादारीमुळें खराबीस येऊन मुलकावर उठोन गेलीं आहेत, व बाजारही मोडकळीस आला, यास्तव हें अभयपत्र सादर केलें असे, तरी कुळें उठोन गेलीं आहेत त्यांस आणून बाजाराची अमदरफ्ती आबादी करणें. सालमजकुरीं आफ्ती आहे, सबब पाऊसपाणी होई तों बाजाराचे अमदानीकरितां बाजारांत दाणा वगैरे जिन्नस येईल त्यास जकात थळमोड व थळभरीत माफ केलें असें, तरी बाजाराची अमदरफ्ती करून बाजार भरीत जाणें, व कुळें मुलकावर गेलीं आहेत त्यांस आणून पेठेची वसाहत करणें ह्मणून, महाजन व शेट्ये यांचे नांवें. कौल १.

अर्बा सबैन
मया व अलफ
रबिलावल २२

येविशीं चिटणिसी. पत्रें ४.

१ आनंदराव त्र्यंबक सुभेदार परगणे मजकूर यांस.

१ नारो शिवराम कमावीसदार बाबती साहोत्रा दिंमत पंतसचिव यांस.

१ माधवराव भिकाजी कमावीसदार दिंमत सरलष्कर यांस.

१ येसोजी धोंडदेव कमावीसदार, दिंमत महिपतराव कवडे यांस.

४

पांच पत्रें दिल्हीं असेत छ. ५ जिल्हेज.

रसानगी याद.

---

( B ) Encouragement to traders settling in the country.

( 1067 ) The traders of kasbá Supe having in consequence of poverty left the town, and the year being one of scarcity the octroi on imports and exports was remitted.

A. D. 1773-74.

१०६८ ( ४४४ )—छबिलदास गुलाबदास बऱ्हाणपूरकर यांणीं हुजूर विदित केलें कीं, शहर मजकुरीं आपण कापडाचें नवें दुकान घालणार, त्यास दुकानचा हशील बमयतारकसी निमे आपणास माफ करावा, व निमे सरकार घ्यावा म्हणून; त्याजवरून निमे हशील यासी माफ करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी शहर मजकुरीं मशारनिल्हे नवें दुकान कापडाचें तारकसीसुद्धां घालतील, त्यास हशिलाचा शिरस्ता असेल त्यापैकीं निमे हशील यासी दरसाल माफ करून, बाकी निमे हशील सरकारांत घेणें म्हणून, नारो कृष्ण यांचे नांवें.

सबा सबैन
मया व अलफ
रविलावल २९

छ. ८ सफर. सनद १.

रसानगी यादी.

१०६९ ( १००२ )—पोमाजी नाईक व गोविंद नाईक भुके चारण, यांणीं हुजूर येऊन अर्ज केला कीं, आपल्या तांड्याच्या बेवीस नाईक्या मिळोन बैल अदमासें पंधरा हजार आहेत, त्यांजवर दरएक जागाहून दाणा भरून लष्करांत व मुलकांत खेपा करतों. परंतु भुसाराची जकात कोणीं घेतली नाहीं, त्याजवर पुण्यांत महागाई जाहली तेव्हां गला आणून अमदानी करणें, ह्मणोन सरकारांतून आज्ञा जाहली, त्याजवरून दाणा भरून पुण्यास आलों, त्यास येथील जकातीचे मामलेदार बोलिले कीं, बंदरीं मिठास जाणें ह्मणजे भुसाराची जकात घेणार नाहीं, न गेल्यास घेऊं. याप्रमाणें सांगोन हडपें व रोख ऐवज घेतला आहे, तो माघारा देववून, भुसार दाणा भरून खेपा आणावयाची आज्ञा केली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून गुदस्तां चारण मजकूर यांस कौल पाठवून भुसाराची अमदानी पुण्यांत करविली, सबब जकातीबद्दल हडपें व रोख ऐवज सालगुदस्तां तुह्मीं घेतला असेल तो माघारा देणें; व सालमजकुरीं भुसार.दाणा पंधरा हजार बैल भरून खेपा आणावयाच्या(चा) चारण मजकूर यांनीं करार केला, यास्तव एकसालां जकात माफ केली असे, तरी यांजपासून जकात न

तिसैन
मया व अलफ
रविलावल २९

( 1068 ) Chabildás Gulábdás of Barhánpur represented that he intended to open a new shop for the sale of cloth and embroidery in the city and prayed that the tax leviable from him might be reduced by half. His request was granted.

A. D. 1776-77.

( 1069 ) Pomáji Náik and Govind Náik Bhuke chárans owned 15,000 pack bullocks and used to cary grain to military camps and about the country generally, free of octroi duty. During the previous year on account of high prices, they had been ordered by Government to bring grain to Poona, but the octroi Mámlatdár there threatened to levy duty from them, unless they brought salt from the sea-coast and actually made them deposit articles and cash as security for complying with his order. They complained

A. D. 1789-90.

घेणें ह्मणोन, विसाजी भिकाजी, व चिमणाजी बाबूराव कमावीसदार, जकात प्रांत पुणें व जुन्नर, यांचे नांवें छ. १२ रबिलावल. सनद १.

रसानगी यादी.

# १४ व्यापार व कारखाने.

## ( क ) जलमार्गाचा व्यापार.

१०७० ( २ )—चिमणाजी गणेश साठे, मौजे केलीये, तर्फ माजगांव, तालुके रत्नागिरी, यांणीं नवीन महागिरी बांधिली; त्यास घरखर्चाबद्दल गला वगैरे जिन्नस हरएक बंदराहून खरेदी करून मौजे मजकुरीं आणतील, त्यास जकातीचा व खुटव्याचा व वेठीचा तगादा न करणें ह्मणोन.

अर्बा सबैन मया व अलफ रजब २

दस्तक १.

१०७१ ( ८८८ )—नरोत्तम जोशी, साकीन बंदर मस्कत, यांची डंगी, भोरश्रृंगार मंगरुळाहून माल भरून मस्कतास जात असतां, वाटेस तुह्मांकडील आरमाराची गांठ पडोन बेकौली ह्मणोन डंगी तुह्मीं धरून आणिली, त्याजवरील काराणी वगैरे माणसें अटकेस ठेऊन माल उसपोन घेतला, त्यास बंदरचे दलाल सरकारचे कौल वसईहून घेऊन सावकाराकडे जलमार्गें व खुष्कीनें रवाना करितात, त्यास दिवसगत लागलीयास, सावकार डंगीची हाकारणी करून निघतात, तेव्हां कोणास ठिकाणीं व मार्गीं अथवा ज्या बंदरीं डंगी जाते तेथें कौल पावता होतो, त्यास मध्यें सरकारचे अरमाराची गांठ पडली तरी बंदरांत आलियावर कौल घेतला आहे नाहीं याची चौकशी करून, डंगी दस्त जाल्या अगोदर कौल घेतला असा दाखला पुरल्यास मालसुद्धां डंगी सोडून देतात, अशी चाल आहे. त्यास हलीं जोशी मजकूर यांचे डंगीचा कौल वसईहून तेथील बंदरचे दलालानें घेऊन रवाना केला त्याची गांठ पडली

खमस समानीन मया व अलफ रजब १०

---

to Government. The articles and cash deposited were ordered to be restored to them and they were exempted from octroi for one year.

( C ) Maritime trade.

( 1070 ) Chimnáji Ganesh Sáthe of Keliye in tarf Májgaum in táluká Ratnágiri having built a new ship was exempted from octroi and other taxes on goods brought in the ship from other ports to his village for house-hold use. His ship was also exempted from liability to forced service.

A. D. 1773-74.

( 1071 ) Narottam Joshi, a merchant of Mascat, was proceeding from Mangrol to Mascat in a boat loaded with merchandize. On the voyage the boat was seized by Anandráo Dhulap,

A. D. 1784-85.

नाहीं, अगोदर हाकारणी करून निघाला, त्यास कौलाची चौकशी करून मालसुद्धां डंगी सोडून द्यावयाची आज्ञा जाली पाहिजे, ह्मणोन मथुरादास गिरधर, दिंमत जोशी मजकूर याणें हुजूर विनंती केली; त्याजवरून मनास आणितां जोशी याचे डंगीचा कौल वसईहून तेथील दलालाचे मार्फतीनें जाला, त्यास हंगामी कौल घेऊन जलमार्गें अगर खुष्कीनें रवाना करितात, त्यांची कोणाची गांठ ठिकाणीं व मार्गीं अथवा ज्या बंदरीं डंगी जात्ये तेथें पावेतों, त्यास दर्यांत अरमाराची गांठ पडल्यास डंगीवर कौल नसल्यास धरून आणिल्यावर चौकशी करून धरिल्या अगोदर कौल घेतला असल्यास सोडावयाची चाल पेशजींपासून आहे, त्यास जोशी यांची डंगी धरून आणिल्यावर चौकशी न करितां काराणी वगैरे माणसें अटकेंत ठेऊन माल उसपून घेतला, हें ठीक न केलें. हलीं कौलाची तेरीख पाहतां डंगी धरल्याच्या अगोदर कौल घेतला, परंतु पोंहचला नाहीं, आणि हाकारणी करून निघाला. सरकारचे बंदरांत डंगी आल्यावर कौल घेऊन पोंहचावा, तों तुह्मीं डंगी धरली. यास्तव जोशी याची डंगी सोडावयाचा करार करून, हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी भवानजी गाईकवाड खिजमतगार सरकारांतून पाठविला आहे, त्याचे गुजारतीनें डंगी मालसुद्धां सोडून देणें ह्मणोन, आनंदराव धुलप यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

## १४ व्यापार व कारखाने.

### ( ड ) वजनें व मापें,

### जनार्दन आपाजीच्या कीर्दींपैकीं.

१०७२ ( ५०९ )—मकरंदसिंग लछीराम याजकडे सरकारांतून बटछपाईचें कामकाज प्रांत गंगथडी व खानदेश व बागलाण येथील सांगितलें आहे, त्यास केली मापें व पक्कीं वजनें व कच्चीं वगैरे यांजवर शिक्का मारावयाचे छापे पुणियांतील आहेत, त्याप्रमाणें दोन छापे मशारनिल्हेस देणें ह्मणोन, आनंदराव काशी कोतवाल, शहर पुणें, यांचे नांवें छ. १८ सवाल. सनद १.

समान सबैन मया व अलफ सवाल ३०

रसानगी यादी.

---

as it could not produce a permit of Government. It was found on inquiry that the necessary permit had been issued but that it had not reached the vessel before it sailed. The vessel was ordered to be released.

### ( D ) Weights and Measures.

### FROM JANÁRDAN APPÁJI'S DIARY.

( 1072 ) Makarandsing Lachirám was appointed to stamp weights and measures in prȧnts Gangathaḍi, Khándesh and Báglȧṇ, and the kotwál of Poona, was directed to provide him with 2 stamps of the kind used in Poona.

A. D. 1777-78.

१०७३ ( ५१० )—प्रांत गंगथडी व खानदेश येथील बटछपाईचें कामकाज सांगितलें आहे, तरी इमानेंइतबारें वर्तोन कामकाज करून वहिवाटीचा कच्चा हिशेब सरकारांत आणून समजावणें. आकार होईल त्यापैकीं कार्याकारण शिबंदी तुह्मी ठेवाल, ती वाजबीचे रुईची होईल ते मजुरा पडेल; बाकी ऐवजाचा भरणा सरकारांत करून जाब घेत जाणे ह्मणोन, मकरंदसिंग लछीराम यांचे नांवें छ. २० सवाल. सनद १.

समान सबैन मया व अलफ सवाल ३०

रसानगीयाद.

१०७४ ( ५११ )—महालानिहाय येथील मापें, कैलीचीं व पक्के कच्चे वजनाचीं, व तूप तेलाचीं, लांकडाचीं मापें व गज, यांचें बटछपाईचें काम सरकारांतून मकरंदसिंग लछीराम यांजकडे सांगितलें असे. जेथें महालींहून मापें करून दिल्हीं नसतील, सरकारचे शिक्क्याखेरीज उगीच मापें असतील त्यांची चौकशी करून, जेथें ज्या मापाची चाल असेल त्याप्रमाणें महालींहून एकेक माप करून घेऊन, त्या फर्मेयाप्रमाणें गांवगन्ना मापें करून देऊन बटछपाई ध्यावी. जेथें महालींहून मापें करून देऊन बटछपाई घेत असतील, तेथें कांहीं घेऊं नये. परंतु, सारे मापांची चौकशी करून, उणें असेल तें ठीक करून द्यावें. तेवढ्याची मात्र बटछपाई ध्यावी. बोभाट गैरवाजबी येऊं देऊं नये. याप्रमाणें करार करून बटछपाई ध्यावयाचा शिरस्ते जाबता अलाहिदा शिक्क्यानिशीं करून दिल्हा असे, तरी सदरहू कराराप्रमाणें मापांची चौकशी करून, मापें करून देऊन, बटछपाई घेतील त्यांस घेऊं देणें. कोणी वाणी उदमी व रयत वगैरे दिकत करील त्यास निक्षून ताकीद करून अंमल बसऊन देणें. मापें महालींहून तुह्मी यांजवळ करून द्याल त्याप्रमाणें ज्या गांवीं लोहार सोनार असतील त्यांजकडून मापांवर छापे करून देवणें ह्मणून, प्रांत गंगथडी व प्रांत खानदेश व बागलाण, देखील सरंजामी व जहागीर किल्ले जात, येथील कमावीसदारांस व सरसुभेदारांस चिटणिसी. पत्रें.

समान सबैन मया व अलफ सवाल ३०

प्रांत गंगथडी.

१ तर्फ हवेली संगमनेर, निसबत त्रिंबक कृष्ण व भगवानजी हरी कमावीसदार.

---

( 1073 ) Makarand was directed to render a detailed account to Government of his receipts and expenses. He was permitted to entertain reasonable establishment for conducting the duties of his office.

A. D. 1777-78.

( 1074 ) Orders were issued to the kamávisdárs of the above provinces to allow Makarandsing to stamp all weights and measures where no such weights were supplied by the mahál officers. Makarandsing was to examine the

A. D. 1777-78.

१ परगणा वण दिंडोरी, निसबत दिगंबर महादेव.
१ परगणा नाशिक, निसबत पांडुरंग धोंडाजी.
१ परगणा सिन्नर, निसबत शिवराम रघुनाथ.
१ तालुके त्रिंबक, निसबत धोंडो महादेव.
१ तर्फ राहुरी, निसबत बहिरो रघुनाथ.
१ परगणा कुंभारी व संवत्सर कोकमठाण, निसबत आत्माराम रंगनाथ व आत्माराम राजाराम.
१ परगणा कोतूळ, निसबत रामचंद्र प्रल्हाद.
१ परगणा आकोलें, निसबत खंडो बाबूराव व खान कवीजंगबहादर.
१ तालुके पटा, निसबत बाळकृष्ण केशव.
१ तर्फ बेलापूर, निसबत बाळाजी केशव.
१ तर्फ धांदरफळ, निसबत रामचंद्र शिवाजी.
१ तालुके कावनई, निसबत परशराम त्रिंबक.
१ परगणा नेवासें, निसबत रामचंद्र नारायण.

प्रांत खानदेश.

१ शहर बराणपूर, निसबत नारो कृष्ण.
१ परगणे बेटावद, निसबत कृष्णाजी बल्लाळ.
१ तालुके धोडप, निसबत बाजीराव आपाजी.
१ तालुके मुल्हेर, निसबत लक्ष्मण विश्वनाथ.
१ परगणा राजदेहर, निसबत व्यंकटराव बल्लाळ.
१ परगणा भामगड व मुधी, निसबत माधवराव कृष्ण.
१ परगणा बोरनार, निसबत निळो गोपाळ.
१ परगणा चोपडें, निसबत गोपाळराव हरी.
१ तालुके आशेर, निसबत केशवराव जगन्नाथ.
१ परगणा भोकर, निसबत वासुदेव नारायण व लक्ष्मण चांदो.
१ परगणा दहीवेल, निसबत भिकाजी कृष्ण.
१ परगणा पिंपळनेर, निसबत हरी बल्लाळ.
१ परगणा जळोद, निसबत काशी नारायण.
१ कसबें साकोरें, परगणे माणीकपुंज, निसबत चिंतो विठ्ठल.
१ परगणा लोहोनेर, वाखारी, देहुरपाळें, निसबत जगदीश व्यंकटेश, व वासुदेव नारायण.

---

weights and to repair only those which might be found deficient. The new weights and measures were to be in accordance with the standard

१ प्रांत बागलाण, निसबत गोविंद हरी;
  १ परगणे जैतापूर.
  १ परगणा पिसोल.
  १ परगणा तिळवण.
  १ परगणा पिंपळे.
  १ परगणा कनासी.
  १ परगणा कोऱ्हाळी.
  ———
  ६

पत्र.

१ नारो कृष्ण सरसुभा, खानदेश.
१ नरसिंगराव बल्लाळ सरसुभा, प्रांत गंगथडी.
१ सर्वोत्तम शंकर, प्रांत गंगथडी व प्रांत खानदेश व बागलाण येथील महालांविशीं.
१३ तुकोजी होळकर.
  १ मशारनिल्हेस.
  १ अहिल्याबाई होळकर यांस.
  ११ कमावीसदारांस वगैरे.
    १ परगणा रावेर, व सुलतानपूर, निसबत सिद्धेश्वर विष्णु.
    १ परगणा नंदुरबार, निसबत यादवराव रघुनाथ.
    १ परगणा गाळणा, निसबत राजाराम काशी.
    १ परगणा आंबे, निसबत संताजी होळकर.
    १ परगणा आडावद, निसबत केसोजी ढमढेरे.
    १ परगणा उत्राण, निसबत बाळाजी नारायण.
    १ परगणा थाळनेर, निसबत बाजीराव रामचंद्र.
    १ कमावीसदार तर्फ दापूर यांस.
    १ कमावीसदार तर्फ कोऱ्हाळें.
    १ कमावीसदार फुटगांव, तर्फ बेलापूर यांस.
    १ कमावीसदार, परगणा चांदवड.
    ———
    ११
  ———
  १३

---

weights and measures of the different localities. Makarandsing was authorised to levy certain fees varying from Rs. 1-8 to Rs. 0-0-6 for

४ महादजी शिंदे.

१ मशारनिल्हेस.

कमावीसदारांस.

१ परगणा एदलाबाद, निसबत नानाजी सखदेव.

१ परगणा लोहारें, निसबत भैराळ भिकाजी.

१ परगणा यावल, निसबत कृष्णाजी मल्हार.

---

४

४ रघुपतराव नारायण राजेबहादर.

१ मशारनिल्हेस.

३ कमावीसदार, दिंमत मजकूर यांसी.

१ परगणा निंबाईत.

१ परगणा अंमळनेर.

१ फुटगांव तर्फ बेलापूर.

---

३

---

४

४ शिवाजी विठ्ठल.

१ मशारनिल्हेस.

३ कमावीसदार, दिंमत मजकूर यांसी.

१ परगणा सोनगीर.

१ परगणा धुळें.

१ परगणा पाटोदें.

---

३

---

४

५ सखाराम भगवंत.

१ मशारनिल्हेस.

कमावीसदारांस.

१ परगणा नेर, निसबत नारो महादेव.

---

supplying stamped weights and measures. A *nazar* of Rs. 3001 was levied from him.

१ कसबें चोपाळें, निसबत दादो भास्कर.
१ परगणा एरंडोल, निसबत रंगो गणेश.
१ परगणा सांडस, निसबत राजाराम खंडो.

---

५

४ महादाजी निळकंठ.
१ मशारनिल्हेस.
३ कमावीसदार, दिंमत मजकूर यांस.
१ परगणा नसिराबाद.
१ परगणा चिखलवाहाळ.
१ परगणा भडगांव.

---

३

---

४

१ आनंदराव भिकाजी रास्ते महाल.
१ परगणा सावर्दे.
१ परगणा जामनेर.

---

२

पत्र.

३ खंडेराव त्रिंबक.
१ मशारनिल्हेस.
१ परगणा जैनाबाद कमावीसदारांस.
१ जहागीर किल्ले हतगड निसबत चिंतो काशी यांस.

---

३

३ माधवराव रामचंद्र.
१ मशारनिल्हेस.
२ कमावीसदार, दिंमत मजकूर यांस.
१ परगणे मेहुणबारें.
१ परगणा झोडगें.

---

२

---

३

१ अमृतराव कदम बांडे यांसी महाल.

१ परगणा वारसें.

१ परगणा उमरपाटें.

पत्र.

१ तर्फ राजूर, परगणे आकोलें, निसबत धोंडो महादेव यांस.

४ अमृतराव विश्वनाथ.

१ मशारनिल्हेस.

कमावीसदारांस.

१ परगणा बोदवड, निसबत रघुनाथ गंगाधर.

१ कमावीसदार परगणा म्हसवें, यांसी.

१ कमावीसदार परगणा टोकडें यांस.

---

४

१ रामचंद्र पवार यासी परगणा बहाळ येविशीं.

१ बळवंतराव धोंडदेव यासी परगणा चांदसर येविशीं.

१ गुलजारखान टोके, परगणा डांगरी.

---

८५ ( ८३ )

छ. १५ रमजान. पंचायशीं पत्रें दिलीं असेत.

प्रांत गंगथडी व बागलाण व खानदेश, देखील सरंजामी महाल व जहागीर किलेजात, येथील मापें कैलीचीं, व पक्के वजनाचीं, व कच्चे वजनाचीं, व कच्चीं तुपाचीं लांकडाचीं मापें, व तेलाचीं, व गज याचे बटछपाईचें काम सरकारांतून तुम्हांस सांगितलें असे. जेथें महालींहून मापें करून दिल्हीं नसतील, सरकारचे शिक्याखेरीज उगीच मापें असतील, त्यांची चौकशी तुम्हीं करून, जेथें ज्या मापाची चाल असेल त्याप्रमाणें महालींहून एकेक माप करून घेऊन त्या फर्म्याप्रमाणें गांवगन्ना मापें करून देऊन, बटछपाई घ्यावी. जेथें महालींहून मापें शिक्याचीं करून देऊन बटछपाई घेत असतील, तेथें कांहीं घेऊं नये. परंतु खरे मापांची चौकशी करून, उणें असेल तें ठीक करून देऊन, तेवढ्याची मात्र बटछपाई घ्यावी. याप्रमाणें करार करून बटछपाई घ्यावयाचा शिरस्ता जाबता अलाहिदा करून दिल्हा असे. तरी इमानें इतबारें वर्तोन सदरहूप्रमाणें मापांची चौकशी करून मापें करून देऊन बटछपाई घेणें येविशीं. कलमें.

तीन प्रांतांचे मापांची बटछपाई सांगोन नजरेचा मक्ता ३००१ रुपये.

यासी मुदती.

१००० कार्तिक अखेर.

१००० पौष अखेर.

१००१ वैशाख मास.

५०० शुद्ध पौर्णिमा.

५०१ अखेर वैशाख.

१००१

३००१

एकूण तीन हजार एक रुपया करार केला असे. सदरहू मुदतीप्रमाणें भरणा करून जाब घेणें. कलम १.

महालनिहायचे मापांची चौकशी करून हुजूर येईतोंपर्यंत घालमेल करूं नये, ह्मणून तुमची विनंती. त्यास सरकारचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक करावी. वाणी उदमी वगैरे रयतीचा बोभाट गैरवाजबी येऊं देऊं नये. उदमी यांचे राजीरजावदीने कराराप्रमाणें बटछपाई घेणें. जाजती उपद्रव लाविल्यास कार्यास येणार नाहीं. आज्ञेप्रमाणें एकनिष्ठेनें वर्तणूक केल्यास घालमेल होणार नाहीं. कलम १.

वाणी, उदमी व रयत वगैरे कोणी दिकत करील त्यास निक्षून ताकीद करून, अंमल बसऊन देणें ह्मणून, कमावीसदारांस अलाहिदा सरकारचीं पत्रें सादर केलीं आहेत, त्याप्रमाणें ते अंमल बसऊन देतील. जो कमावीसदार तुमचा अंमल बसऊं न देई त्या महालाचे वाणी उदमी वगैरे यांचा अजमास करून तेथील बटछपाईचा ऐवज होईल तो हुजूर समजावणें. कमावीसदारांस सरकारांतून ताकीद करून ऐवज देविला जाईल, येणेंप्रमाणें करार. कलम १.

एकूण तीन कलमें करार करून दिल्हीं असेत. सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणून, मकरंदसिंग लछीराम यांचे नांवें. छ. १५ रमजान. सनद १.

रसानगी यादी.

सदरहू बटछपाई ध्यावयाचा शिरस्तेजाबता शिक्यानिशीं अलाहिदा येणेंप्रमाणें.

| कैली मापांस रुपये. | पक्के वजनांस. |
|---|---|
| १।- अधोली. | १।- पांसेरीस. |
| शेर. | १ अडीचशेरीस. |

·।= निठवें.
८≡ चिपटें.
८-॥ अदपाई.

———

२॥≡॥

कच्चे वजनांस.
·॥=॥ पांसेरीस.
·॥· अडीचशेरीस.
·।· सव्वाशेरीस.
· गुळाचे मणास महालचालीप्रमाणें घ्यावें.

———

१।=॥
अदगजास ·॥· रुपये.

१ दुशेरीस.
·॥· शेरास.
·।· अदशेरास.
८= पावशेरास.
८- अदपावास.
१॥ घडी सव्वामणाची.

५॥।·
तुपाचीं कच्चीं लांकडाचीं मापें व तेलाचीं मापें.
·।· शेरास.
८= अदशेरास.
८- पावशेरास.
८॥ अदपावास.

एकूण कैली पांच मापांचे अडीच रुपये साडेतीन आणे, व पक्के आठा वजनांचे पावणेसहा रुपये, व कच्चीं वजनें चार पैकीं तीन वजनांचा सव्वा रुपया अडीच आणे, व गुळाचे मणास महालचालीप्रमाणें घ्यावे; व कच्चीं मापें तूप तेलाचीं चार यांचे साडेसात आणे, व अदगजास निमे रुपयाप्रमाणें बटछपाई घ्यावयाचा शिरस्ता करून दिल्हा असे.

१०७५ ( ५३४ )–विसाजी नारायण यांणीं हुजूर विंदित केलें कीं, मौजे पालें खुर्द पैकीं पेठ पालें, प्रांत खानदेश, येथें आपल्यास एक चाहूर जमीन जिराइती इनाम करार करून देऊन दुमाला केली. त्याचा भोगवटाही चालत असतां, हल्लीं वासुदेव नारायण व जगदीश वेंकटेश कोणते काठीनें मोजून द्यावी याचें सनदेंत लिहिलें नाहीं, ह्मणोन आक्षेप करितात. त्यास येविशीं ताकीद जाली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून हें पत्र तुह्मांस सादर केलें असे, तरी पांच हात पांच मुठीचे काठीनें जमीन मोजून देऊन चतुःसीमा गांवकरी यांणीं करून दिल्ही आहे, त्याप्रमाणें पेशजींचे सनदेबरहुकूम भोगवटा चालत आल्याप्रमाणें चालविणें. नवीन दिकत न करणें ह्मणोन, वासुदेव नारायण व जगदीश वेंकटेश कमावीसदार, परगणे ओतुरपालें, यांचे नांवें. छ. १० जिल्काद. चिटणिसी. पत्र १.

समान सबैन मया व अलफ सफर २६

---

**( 1075 )** Visáji Nàráyaṇ had been given one *Chàhur* of land in mauze Pále in parganá Peth Pále in pránt Khándesh. A question having arisen as to the measure to be used in marking out the land, it was ordered that the rod, five cubits and five hands in length, should be used.

A. D. 1777-78.

# १४ व्यापार व कारखाने.

## ( ई ) किरकोळ.

१०७६ ( )–कसबे जालनापूर, परगणे मजकूर, येथें जर सनगांस लावावयास तयार करितात येविशीं वगैरे. कलमें.

सीत तिसैन मया व अलफ जिल्हेज २२

चांदवड रुपया आटून जर तयार करितात ती वाईट निघत्ये, यास्तव पेशजीं-पासून मल्हारशाई व इंग्रजी व सुरती व पटणी रुपया आटून जर तयार करीत होते, त्याप्रमाणें करवीत जाणें.

कलम १.

केळीचा खार रेशमास लावितात, याजमुळें जर काळी पडत्ये, याजकरितां कारीगारांस ताकीद करून दात्याखार रेशमास लाववीत जाणें. कलम १.

पागोटें बारा पंधरा हात लांबीचें करितात हें चांगलें नाहीं. तरी तिसा हातांखालीं पागोटें करूं नये, याप्रमाणें कारीगार यांस ताकीद करून तीस हात पागोटें लांब करवीत जाणें.

कलम १.

एकूण तीन कलमें लिहिलीं असेत, तरी सदरहू लिहिल्याप्रमाणें कारीगार व दुकानदार यांस ताकीद करून करवीत जाणें. चांदवड रुपया आटून जर केला, व केळीचा खार रेशमास लाविला, व बारा पंधरा हात पागोटें लांब केल्यास पारपत्य करून गुन्हेगारी घेऊन परगणे मजकूर येथील हिशेबीं जमा करणें ह्मणोन, वेंकटराव शिधाजी यांचे नावें.

सनद १.

रसानगी, त्रिंबकराव नारायण परचुरे

कारकून, निसबत दफ्तर.

---

XIV Trade and Manufacture.

( E ) Miscellaneous.

( 1076 ) The manufacturers of turbans in kasbe Jálnápur were directed to make each turban 30 cubits long and not 12 or 15 cubits as they had been in the habit of doing and to prepare the brocade used for turbans, by melting rupees, of the Malhârshái, English, Surati, or Patani currency, and not of the Chándvaḍ currency.

A. D. 1795-96.

१०७७ ( ११३३ )–कसबे पैठण, परगणे मजकूर, येथें जर सनगांस लावावयास तयार करितात येविशीं वगैरे. कलमें.

सीत तिसेन
मया व अलफ
जिल्हेज २२

चांदवड रुपया आटून जर तयार करितात ती वाईट निघते.' यास्तव पेशजींपासून मल्हारशाई व इंग्रजी व सुरती व पटणी रुपया आटून जर तयार करीत होते त्याप्रमाणें करवीत जाणें. कलम १.

नवी पुतळी आटून जर तयार करितात ती वाईट, याजकरितां जुनी पुतळी आटून जर करवीत जाणे. कलम १.

केळीचा खार रेशमास लावितात, याजमुळें जर काळी पडत्ये. याजकरितां कारीगारांस ताकीद करून दात्या खार रेशमास लाववीत जाणें. कलम १.

एकूण तीन कलमें लिहिलीं असेत, तरी सदरहू लिहिल्याप्रमाणें कारीगार व दुकानदार यांस ताकीद करवीत जाणें. नवी पुतळी व चांदवड रुपया आटून जर केल्यास, व केळीचा खार रेशमास लाविल्यास, पारपत्य करून गुन्हेगारी घेऊन परगणे मजकूरचे हिशेबीं जमा करीत जाणें ह्मणोन, लक्ष्मणराव नागनाथ यांचे नांवें. सनद १.

रसानगी, त्रिंबकराव नारायण परचुरे
कारकून, निसबत दफ्तर.

# १५ टांकसाळी व नाणीं.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

१०७८ ( ३१८ )–धारवाडी रुपयास व चांदीस चार गुंजा जळीचा शिरस्ता पेशजींचा आहे. त्यास हल्लीं सदर रुपयाची चौकशी हुजूर मनास आणतां, दर रुपयास साडे चार पांच गुंजा जळ आली. हे गोष्ट परिछिन्न कार्याची नाहीं. या उपरांत टंकसाळे तुह्मीं आणून पारपत्य चांगलें

सबा सबैन
मया व अलफ
जमादिलाखर २९

(1077) Similar orders were issued to the manufacturers of Paithan.
A. D. 1795-96.

XV Mints and Coins.

FROM JANÁRDAN APPÁJI'S DIARY.

(1078) The Dhárwár and Jamkhindi rupees were tested at the Huzur and it was found that loss in minting, which ought to be 4 *gunjás* per rupee, came to from $4\frac{1}{2}$ to 5 *gunjás* in the case of the former and from $5\frac{1}{2}$ to 6 gunjás in the case of the latter rupee. Orders were issued to the officers of the places to warn

A. D. 1776-77.

करून, सदरहू जळीचे रुपये पाडिले असतील त्याचा तोटा, व गुन्हेगारी टंकसाळे यांजपासून घेऊन तालुके धारवाड येथील हिशेबीं जमा धरणें; व यापुढें रुपया पेशजींचे करारापेक्षां चांगला माल, खरा पाडावयाची ताकीद निक्षून करणें. याउपरीं असें जाल्यास टंकसाळे हुजूर आणून पारिपत्य केलें जाईल ह्मणोन, वेंकटराव नारायण यांचे नांवें. छ. ११ जमादिलाखर. सनद १.

परवानगी रूबरू.

जमखिंडी रुपयास व चांदीस चार गुंजा निदान जळ जावी. याप्रमाणें पेशजींचा शिरस्ता आहे, त्यास हल्लीं सदरहू रुपयाची चौकशी हुजूर मनास आणतां, दर रुपयास साडे पांच, सहा गुंजा जळ आली. ऐसीयास तुमचे चौकशीस चार गुंजांस कमीच जळ जावी, ते साडे पांच, सहा गुंजा जळ दर रुपयास येते हे गोष्टी ठीक नव्हे, तरी जमखिंडींतील टंकसाळे तुह्मीं आणून चांगलें पारिपत्य करून, मागील जळीचा तोटा भरून घेणें, व गुन्हेगारी घेणें; व पुढें चांगला पेशजींचे शिरस्तेप्रमाणें माल, खरा रुपया पाडावयाची ताकीद करणें. या उपरीं खोटा रुपया पडिल्यास टंकसाळे हुजूर आणून पारिपत्य केलें जाईल ह्मणोन, पांडुरंगराव गोविंद यांचे नांवें. छ. ११ जमादिलाखर. सनद.

परवानगी रूबरू.

१०७९ ( ५६३ )–गुजारत भास्कर महादेव व मल्हार मुकुंद.

समान समानीन
मया व अलफ
जमादिलावल ८ जमा. रुपये.

५१०४॥= मोहरा नाणें.

२३५४॥= दिल्ली शिक्का नाणें सुमार १६१ दर १४॥= प्रमाणें. रुपये.

२७५० पंचमेळ नाणें.

४३ सुरती.

७४ औरंगाबादी.

३४ बनारसी.

१० कुरा ज्याहानाबाद.

---

the mint owners to prevent such excess occurring in future and to inform them that any malpractice on their part would be duly punished.

( 1079 ) The different kinds of Mohor are stated to be as follows:—

A. D. 1777-78. 1 Delhi at Rs. 14–10.

४ मछलीबंदर.
६ पटणी.
१४ लाहुरी.
१५ बराणपुरी.

२००
दर १३॥। प्रमाणें रुपये.

५१०४॥=
६४५६॥।=॥ पुतळी तांटें १४०५ एकूण वजन तोळे इंग्रजी रुपये भार ४१८॥, दर १५।=॥। प्रमाणें एकूण बारमासी तोळे ३९७॥=॥ दर १६८≡॥। प्रमाणें. रुपये.
६४५४ ऐन मुंबई इंग्रजी रुपये भार. तोळे ४१८॥ एकूण दर १३॥।= प्रमाणें.
२॥।=॥ कसर बारमासी तोळ्यावर दर बसवितां वाढली ते.

६४५६॥।=॥
१६९४।≡॥। इस्तंबोल सुमार ४०८ एकूण रुपये वजन तोळे इंग्रजी रुपये भार १२२८५ दर १३॥।= प्रमाणें. रुपये.
२९९३॥≡ कडीं सोन्याचीं सुमार ७१ एकूण वजन इंग्रजी रुपये भार तोळे ११५॥।॥, दर १३॥।= प्रमाणें, एकूण बारमासी वजन तोळे २०५८१८॥ दर १४॥।॥ प्रमाणें. रुपये.

१६२४९॥≡।
तपशील.

1 Surati.
1 Aurangábádi.
1 Banárasi.
1 Kurá Jyáhánábád.
1 Machhli Bandar.
1 Paṭaṇi.
1 Láhuri.
1 Baràṇpoori.

} at Rs. 13-12

१६२४६॥। ऐन.

२॥|=॥ कसर बारमासी तोळ्याचे दरामुळें.

१६२४९॥=।·

१०८० ( ७८९ )–दुलभशेट गोविंदजी व गोविंद पांडुरंग यांचे नांवें सनद कीं, कोंकण प्रांतीं सरकार तालुक्यांत खुर्दाच्या टंकसाळा घालावयाविशीं तुह्मीं विनंति केली; त्याजवरून तुह्मांस आज्ञा केली असे, तरी टंकसाळा सरकार तालुक्यांत घालून खुर्दा चौकशीनें पाडणें येविशीं.

सलास समानीन मया व अलफ. रबिलाखर २५

कलमें.

खुर्दा पाडावयाकरितां तांबें मुंबई वगैरे बंदरीं इकडून गलबतें रिकामीं नेऊन, तांबें मात्र खरेदी करून आणावें; दुसरा जिन्नस आणूं नये व नेऊं नये. तांबें ज्या ठिकाणीं खरेदी होईल तेथील गलबतांवर भरून आणिल्यास तीं गलबतें रिकामीं जातील, त्यांस अडथळा पडणार नाहीं. कलम १.

बेलापुरास सरकारचा अंमल होता ते समयीं तेथें टंकसाळ घालून तुह्मीं खुर्दा पाडिला तो साष्टीस नेला आहे, तो इकडे आणून विकावा अडथळा पडणार नाहीं. कलम १.

तांब्याचे खरेदीपुरता ऐवज रोकड व हुंड्या मुंबईस जातील, त्यांस दिकत पडणार नाहीं. कलम १.

खुर्दा तयार होईल तो देशांतील व खुर्दा पाडितां तांब्याचा चुरा पडेल तो, व खुर्दा करावयाजोगें तांबें नसेल तें कासार उदमी यांस विकावें, अडथळा पडणार नाहीं. कलम १.

टंकसाळांपुरतें लोखंड वगैरे सामान मुंबईहून खरेदी करून आणावें, व जाजती आणूं नये. कलम १.

तांबें येईल त्याची जकात, जलमार्गाची व खुष्कीची, पेशजीं पनवेलीस टंकसाळ होती, तेसमयींचे शिरस्तेप्रमाणें जकातदार घेतील; जाजती उपसर्ग लागणार नाहीं. कलम १.

टंकसाळांचें काम चालीस लागल्यापासून तागाईत पेस्तर सन आर्बा अशेर सालपर्यंत चालवावें; पुढें आज्ञेशिवाय करूं नये. कलम १.

---

( 1080 ) Dulabhshet Govindji and Govind Pándurang were permitted to open mints for the manufacture of copper coin in Konkaṇ. The following instructions were issued to them:—

A. D. 1782-83.

( 1 ) they were to pay a *nazar* of Rs. 12,001. for the privilege: no other person was to be allowed to open mints for coining copper, till the end of the year A. D. 1783-84;

( 2 ) copper required for the purpose should be brought from Bombay or other ports;

कोंकणांतील उदमी खरेदी करून हरएक जागां नेतील, त्यांस अडथळा पडणार नाहीं. कलम १.

अलीबागेहून व इंग्रजाचे तालुक्यांतून खुर्दा हिकडे येऊं देऊं नये. कोणी आणील त्यापासून गुन्हेगारी घ्यावी. कलम १.

टंकसाळसंमंधें तुम्हांपासून नजर १२००१ रुपये बारा हजार एक रुपया घ्यावयाचा करार केला असे, तरी चैत्र शुद्ध पंचमीस सदरहू ऐवजाचा भरणा सरकारांत करून, पावलीयाचा जाब घेणें. कलम १.

खुर्दा पाडावयाचा शिरस्ता इंग्रजी वजनानें. मासे.

९। शिवराई पैसा सव्वा नऊ मासे.

१३॥। अलमगिरी पैसा पावणेचौदा मासे.

१८॥ ढबु पैसा साडे अठरा मासे.

---

४१॥

सदरहूप्रमाणें खुर्दा पाडावा; कमी वजनास करूं नये. कलम १.

बंदी मोकळी माहालीयावर इंग्रजाचे मुलकांतील खुर्दा हिकडे येऊं लागल्यास, मुदतीपर्यंत ताकीद केली जाईल. कलम १.

टंकसाळांसंमंधें नजर तुम्हांपासून सरकारांत घ्यावयाची करार केली, सबब कोंकणांत व वरघाटीं पेस्तर सन अर्बा अखेर सालपर्यंत नवी टंकसाळ होणार नाहीं. बंदी असतां तांबें आणून एक सालां चालवीत असतील, त्यांस ताकीद करून बंद केल्या जातील. कलम १.

गडबडीमुळें टंकसाळांचें काम बंद जाहालें, तरी तितके रोज चौकशी करून मुदतीपुढें मजुरा दिल्हे जातील. कलम १.

तुम्हांपासून नजर घेऊन टंकसाळांचें काम सांगितलें, त्यास दुसरा कोणी चढ देऊं लागल्यास सरकारांत ऐकणार नाहीं; व जाजती चढ तुम्हांवर मुदतीपर्यंत पडणार नाहीं. कराराप्रमाणें निभावणी केली जाईल. कलम १.

हरएक जागां सरकार तालुक्यांत टंकसाळा घालावयाची सोय असेल तेथें टंकसाळा घालणें. नजरपट्टी व हरएकविशीं मामलेदार उपसर्ग करूं लागल्यास ताकीद केली जाईल; व इंग्रजाकडे सरकारचे तालुके गेले आहेत, ते सरकारांत आल्यावर तेथें कमावीसदार सरकारांतून जातील, त्यांस पत्रें लागतील तीं दिल्हीं जातील. कलम १.

(3) copper coin should not be allowed to be brought into Government territory from Alibág and from the tálukás of the English: any person acting in contravention of the rule should be punished with fine;

(4) the coins to be struck should be of the following English weights;

(a) Shivrái paisà, $9\frac{1}{4}$ *màsàs.*

(b) Alamgiri paisà, $13\frac{3}{4}$ *màsàs.*

(c) Dhabu paisá, $18\frac{1}{2}$ *màsàs.*

एकूण सोळा कलमें करार करून दिल्हीं असेत, तरी सदरहूप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन.
सनद १.
रसानगी यादी.

## १६ सरकारनें घेतलेलें कर्ज.

### नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

१०८१ ( ६४ )—तुह्मांपासून सालगुदस्त सन अर्बा सबैनांत छ. १८ रविलावलीं वैशाख वद्य पंचमी शके १६९६ जयनामसंवत्सरेचे मितीनें सरकारांत घेतलें कर्ज रुपये २,००,००० दोन लक्ष, यासी व्याज दरमहा दरसदे रुपये एकोत्रा बिन सूट प्रमाणें चहूं महिन्यांनीं द्यावयाचा करार केला असे, मुदतीस व्याज मुद्दल हिशेब करून दिला जाईल ह्मणोन, आनंदराव भिकाजी यांचे नांवें लिहून दिलें. छ. रविलाखर. खत १.

खमस सबैन मया व अलफ जमादिलाखर २९

## १७ निरख व मजुरी.

### ( अ ) निरख.

१०८२ ( २६३ )—तुह्मांकडून तांदूळ कमोदाचे सरकारांत आणविले होते, ते जमा मुदबख कोठीकडे, गुजारत छोटाराम प्यादा. दर रुपयास कैली ८८२॥ अडीच पायली प्रमाणें कैली बारुळे मापें ·॥· दहा मण तांदूळ, असडी, सरकारांत जमा असत ह्मणोन, हरी बल्लाळ कमावीसदार, परगणे पिंपळनेर, यांचे नांवें. जाब १.

सीत सबैन मया व अलफ जिल्काद २

१०८३ ( ३७६ )—राघोजी आंगरे, वजारत माहासरखेल, यांजकडे सरंजामास बेगमीस गांव हजार रुपये बेरजेचे, कमाल आकार दरोबस्त कमावीस सुद्धां, तर्फ तळोजें, तालुके नेरळ, पैकीं देविले असेत, तरी नक्की आकार असेल तो, व ऐन जिन्नस जमाबंदी असेल त्याचे बाब, नक्त

सबा सबैन मया व अलफ जिल्हेज २४

XVI Government Loans.

FROM NÁRO APÁJI'S DIARY.

( 1081 ) A loan of Rupees 2,00,000 was taken from Anandráo Bhikáji in the preceding year, at interest of one rupee percent per mensem.

A. D. 1774-75.

XVII Prices and wages.

( 1082 ) Kamod rice from Pimpaḷner was sold at 2½ páylis per rupee.

A. D. 1775-76.

( 1083 ) Villages valued at Rs. 1000 in tarf Taḷoje, táluká Neral had been given in saranjám to Rágholi Angria; in calculating their value the assessment in kind was ordered to be valued as follows:—

A. D. 1776-77.

गोडे भातास दरखंडीस रुपये वीस, व खारे भातास दर खंडीस रुपये सोळा, व उडि-दांस दर खंडीस रुपये पन्नास, व तूप दर रुपयास पक्के दीड शेर, याप्रमाणें आकार क-रून गांव नेमून देणें; आणि गांव नेमून द्याल, तेथील सालमजकूरचा वसूल घेतला असेल, तो मशारनिल्हेकडील कमावीसदार यांजकडे देणें ह्मणोन, राघो नारायण व धोंडो महा-देव यांचे नांवें.

सनद १.

रसानगी यादी.

१०८४ ( ४३७ )—राघोजी आंगरे, वजारत महासरखेल, यांणीं हत्ती व घोडे खरेदी केले त्यांची किंमत.

सबा सबैन मया व अलफ रबिलावल ८

रुपये.

५००० हत्ती नग २ कर्णेल इपटण वकील कलकत्तेदार, याजपासून पुण्यांत घेतले त्यांची किंमत.

१०० घोडी रास १ मौजे कालोस, तर्फ चाकण, प्रांत जुन्नर, येथें त्रिंबक पुंडाजी याजपासून घेतली त्याची किंमत.

———
५१००

एकूण एकावनशें रुपयांस हत्ती दोन व घोडी एक घेतली, त्यांची जकात मशारनिल्हेस माफ केली असे; तरी जकातीचा आकार होईल तो यांचे नांवें माफ खर्च लिहून जकातीचा तगादा न करणें ह्मणोन, भिकाजी विश्वनाथ कमावीसदार, जकात प्रांत पुणें व जुन्नर यांस.

सनद १.

रसानगी यादी.

१०८५ ( ६४७ )—वेदमूर्ति विश्वनाथभट गणपुले अग्निहोत्री, वस्ती कसबे केळसी, तर्फ मजकूर, तालुके सुवर्णदुर्ग, यांणीं हुजूर विदित केलें कीं, विसाजी नारायण व हरभट बिन नारायणभट व जनार्दन नारायण, उपनाम खांबेटे, यांचें ठिकाण कसबे मजकुरीं खांबेटवाडी अजमासें बिघा ८१

समानीन मया व अलफ जिल्काद १०

---

Ordinary rice, Rs. 20 per *khandi.*
rice grown in salt-lands, Rs. 16. per *khandi.*
*udid*, Rs. 50 per *khandi.*
*ghi*, Re. 1 per $1\frac{1}{2}$ *seers.*

( 1084 ) Two elephants were purchased by Rághoji Angria for Rs. 5000 from Colonel Upton, agent at Poona of the English colony at Calcuttá.

A. D. 1776-77.

( 1085 ) A *bighá* of land in kasbe Kelsi in tarf Suvarnadurga was sold for Rs. 525.

A. D. 1779-80.

एक आहे, तें त्यांणीं आपल्यास सव्वापांचशें रुपयांस विकत दिलें आहे. तें सरकारांतून इनाम करार करून देऊन चालविलें पाहिजे ह्मणोन; त्याजवरून हे सनद सादर केली असे, तरी वेदमूर्ति खांबेटे यांजपासून सदरहू एक बिघा ठिकाण कसबे मजकुरीं खरेदी केलें आहे, त्याची तुह्मीं चतुःसीमापूर्वक मोजणी करून, जमिनीची मोजणी जाबता लिहून हुजूर पाठऊन देणें ह्मणोन, मोरो बापूजी, तालुके मजकूर यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

## अमृतराव विश्वनाथ यांच्या कीर्दीपैकीं.

१०८६ ( ८७१ )—रुपी कळवंतीण नंदुरबार इजला बसावयासी गाडी भाड्याची करून देऊन लष्करांत रवाना करणें ह्मणोन सालगुदस्तां तुम्हांस सनद सादर जाली आहे, त्यास तुह्मीं भाड्याची गाडी करून दिल्ही, त्याचा आकार इस्तकबिल छ. १२ जमादिलाखर सन अर्बा समानीन तागाईत छ. २२ साबान सालमजकूर, एकूण मुशाहिरा रोज ७१, पैकीं वजा एकोणतिशी रोज एक, बाकी रोज ७०, दररोज गाडीचें भाडें गुजारत बाळू चौधरी रुपया १। प्रमाणें रुपये ८७॥ साडे सत्यांशीं रुपये कलवांतीणचे नांवें हिशेबीं खर्च लिहिणें; मजुरा पडतील, ह्मणोन घाशीराम सावळदास कमावीसदार, कोतवाली शहर पुणें, यांचे नांवें छ. १२ मोहरम. सनद १.

खमस समानीन मया व अलफ मोहरम १२

रसानगी यादी.

## १८. वेठ.

१०८७ ( १६ )—मौजे कोरेगांव, तर्फ पाबळ, प्रांत जुन्नर, या गांवाकडे कात्रजचे कुरणांतील गवत पुले १३,५०० साडेतेराहजार कापून घ्यावयाची सालाबाद नेमणूक आहे, त्यास सालमजकुरीं लष्करचे मुक्काम कोरेगांवीं होऊन गांवची खराबी झाली, सबब एक सालास सदरहू गवत

अर्बा सबैन मया व अलफ रमजान ३०

---

FROM AMRUTRAO VISHWANÁTH'S DIARY.

( 1086 ) Rupi a dancing girl was ordered to be sent to the camp. The journey took 70 days and cart-hire was paid at the rate of Rs. 1·4·0 ( choudhri ) a day.

A. D. 1784-85.

XVIII Forced service.

( 1087 ) The village of Koregaom in tarf Pábaḷ was bound to supply labour for cutting 13,500 bundles of grass every year. The village however, having suffered during the current year owing to troops encamping at it, was exempted from the service for that year.

A. D. 1773-74.

कापावयाचें मना केलें असे, तरी गांवास तगादा बेगारीविषयीं न करणें ह्मणोन, शिवराम रघुनाथ यांचे नांवें. छ. १६ रमजान. चिटणिसी. पत्र १.

## नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

१०८८ (७०)–दिंमत तोफखाना याजकडील बैल चारणीस मौजे आणें, प्रांत

खमस सबैन मया व अलफ जमादिलाखर २९

जुन्नर, येथें आहेत, त्यास पावसाळ्याचे निवाऱ्याबद्दल दोनशें खण सालाबाद बांधून द्यावयाची सनद असते. त्यास सालमजकुरीं लावणीचा हंगाम, रयत खराब होईल, याजकरितां एकशें खण बांधोन देविले असे, तरी किरकोळ शेराचीं वगैरे लांकडें लाऊन गवत घालून शिऊन, बेगारीनें निवारा करून देणें ह्मणोन, रघुनाथ हरी, प्रांत जुन्नर, यांचे नांवें. छ. १६ रबिलाखर. सनद १.

रसानगी यादी.

१०८९ (१०५)–प्रांत गंगथडी येथील सालाबाद गवत कापून द्यावयाची नेमणूक

खमस सबैन मया व अलफ रमजान २९

आहे, त्यास बेगारीमुळें रयतेस उपद्रव लागतो, सबब गवत कापणावळ व गंजीस आणणावळ सुद्धां दर हजारीं रुपये २ प्रमाणें रयतेपासून घ्यावयाचे करार केले असेत, तरी सदरहू शिरस्तेप्रमाणें प्रांतांतील मामलेदारांपासून पैका घेणें. ज्याजती बेगारीविशीं वगैरे उपद्रव न लावणें ह्मणोन. सनदा.

१ गंगाधर शंकर यांस कीं, दिंमत पागा हुजूर यांस गवताची नेमणूक, पुळे, पागा ठाणें आसी खुर्द येथील सुमार.

५०,००० तर्फ हवेली संगमनेर.
३०,००० तर्फ राहुरी.
२०,००० तर्फ बेलापूर.

१,००,०००

एक लक्ष गवताविशीं सनद.

---

(1088) It was usual for the villagers of Āṇe in prânt Junnar to construct every year shelters, 200 *khaṇs* in extent, for the bullocks of the artillery, sent there to graze owing to the rains. As the sowing season was at hand and as the employment of the ryots on the said work was undesirable, only 100 *khaṇs* were ordered to be constructed by means of forced labour.

A. D. 1774-75.

(1089) It was usual for the ryots of prânt Gangathaḍi to supply labourers, free of charge, for cutting grass for Government. As this arrangement was found to be a source

A. D. 1774-75.

१ सेखाजी मुळे यांस सनद कीं, तुह्मांकडील पागा मौजे जोखे येथें आहे, तेथील बेगमीस मौजे मजकूरपैकीं गवत, पुले सुमार ७५,००० पाऊण लक्ष, तर्फ हवेली संगमनेर, येथील बेगारीनें कापून द्यावयाची नेमणूक आहे त्याविशीं.

१ गिर्जोजी बर्गे यास कीं, तुह्मांकडील पागा मौजे आसी बुद्रुक, तर्फ हवेली येथें आहे, तेथील बेगमीस तर्फ मजकूर बेगारीनें मौजे मजकूरचे कुरणापैकीं गवत पुले सुमार २५,००० पंचवीस हजारांची नेमणूक आहे त्याविशीं. सनद १.

१ गोविंदराव बारावकर यांस कीं, तुह्मांकडील पागा मौजे देसोंडी येथें आहे, तेथील बेगमीस मौजे मजकूरचें कुरणपैकीं तर्फ राहुरी येथील बेगारीनें पुले सुमार ७५,००० पाऊण लक्षाची नेमणूक आहे त्याविशीं. सनद.

१ निळकंठराव रामचंद्र यांस कीं, तुम्हांकडील पागा कसबे नांदुर येथें आहे, तेथील बेगमीस कसबे मजकूरचे कुरणपैकीं तर्फ राहुरी येथील बेगारीनें गवत पुले सुमार ४०,००० चाळीस हजार नेमणूक आहे त्याविशीं. सनद.

१ नारो आपाजी यांस कीं, तुम्हांकडील खिलार मौजे सांगवी येथें आहेत, तेथील बेगमीस ढग्याचे डोंगरीहून गवत, तर्फ हवेली संगमनेर येथील बेगारीनें, गवत पुले सुमार १०,००० दहा हजार द्यावयाची नेमणूक आहे त्याविशीं. सनद.

---

६

रसानगी यादी. छ. ६ रमजान.

१०९० ( ४४८ )—बाबु जोशी गोठणकर यांस मजरें निवेली, कर्यात मीठगावंणें, तालुके विजयदुर्ग, हा गांव इनाम आहे, त्या गांवांत वतनदार घरें तीन आहेत, त्यांपैकीं दोन ब्राह्मणाचीं व कुणबीयाचें एक आहे, त्यास बेगारीचा उपद्रव भारी लागतो, त्याजमुळें कुणबीयाची वसाहत होत नाहीं; आणि भटजींची नुकसानी होत्ये, त्यास मजरें मजकुरास बेगार माफ केली असे, तरी मौजे करेल येथें बेगारीचें ओझें येईल तें मौजे दांड्यास पोहचवावें, दांडेकरांनीं करेल यास पोहचवावें; याजप्रमाणें दुसरे गांव जवळचे असतील त्यांणीं त्याज-

सबा सबैन मया व अलफ रविलाखर १

---

of annoyance to the people, it was ordered that in lieu of forced labour Rs. 2 for each thousand bundles to be cut should be levied from the Mámlatdárs of the province.

( 1090 ) There being only three houses—two Brahmans', one Kunbi's, in the village of Niweli in karyát Mithgávne of táluká Vijayadurga, the Kunbi was much troubled by being called upon to do forced labour. The village, which was alienated to Gothankar, was therefore exempted from liability to supply forced labour,

A. D. 1776-77.

प्रमाणें परभारें वोझें पोहोंचवावें; मजरें मजकुरास हजीर बेगारीचा उपद्रव एकंदर लागों न देणें. या कामास सुभाहून कारकून एक मजरें मजकुरास पंधरा दिवस ठेऊन वळवटा पाडून देणें ह्मणोन, गंगाधर गोविंद यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

१०९१ ( ५२१ )—विठ्ठलभट तामनकर, वस्ती मौजे मुटाट, तर्फ खारेपाटण, प्रांत राजापूर, येथें भटजींचें शेत कुणबाव्याचें आहे, त्यास भटजींनीं आपल्या शेतांत अर्धेलीचा कुणबी शेतांत ठेविला आहे, त्यास मौजे मजकूरचा खोत कुणबी यास वेठबिगार घेतो, ह्मणोन हुजूर विदित जालें; त्यास भटजींचें अर्धेलीचें शेत कुणबी करतो, सबब कुणबी वेठबिगार सालमजकूरापासून मना केली असे, तरी वेठबेगार घेत न जाणें म्हणोन, गंगाधर गोविंद यांचे नांवें.

समान सबैन
मया व अलफ
जिल्हेज १३

सनद १.

रसानगी यादी.

१०९२ ( ९२१ )—मेस्त्र मालीट, वकील कलकत्तेकर इंग्रजाकडील, मुंबईस येऊन तेथून पुणीयास यावयाकरितां त्याजकडील वोझीं आणावयास तालुकेहाय प्रांत कोंकणपैकीं बेगारी. असामी.

सीत समानीन
मया व अलफ
जमादिलावल २५

५० परगणे बेलापूर, निसबत पांडुरंग रामचंद्र.
१०० तालुके नेरळ, निसबत गोविंद कृष्ण यांजकडून.
१०० तालुके करनाळा, निसबत रामराव अनंत यांजकडून.

२५०

एकूण अडीचशें असामी पुणें पर्यंत देविले, त्यांणीं वोझीं घाटमाथां टाकून पळोन गेले, सबब वोझीं वाटेंत पडलीं ते आणावयास पुणीयाहून मजूरदार करून पाठविले,

---

and the villagers of Karel were directed to carry any load that they might receive right on to Dande, and similar instructions were issued to the villagers of Dande.

( 1091 ) A kuṇbi rented a field from Vithalbhaṭ Támhankar of Muṭàṭ in tarf Khárepàṭaṇ of prànt Rájápoor. It was represented that the khot of the village required the kuṇbi to perform forced service. Orders were therefore issued exempting him from such service.

A. D. 1777-78.

( 1092 ) When Mr. Málet the English agent was proceeding from Bombay to Pooná, 250 forced labourers from Belápur, Neral and Karnáḷá, were ordered to carry his baggage.

A. D. 1785-86.

त्यास खर्च रुपये १८६। एकशें सव्वाशायशी रुपये जाहाले, ते सदरील तीन तालुक्यांपासून घ्यावयाचा करार करून, हे सनद तुम्हांस सादर केली असे, तरी वाटणीप्रमाणें सदरहू ऐवज ज्याचा त्याजपासून घेऊन हुजूर पाठवून देणें म्हणोन, जिवाजी गोपाळ सरसुभा, प्रांत कोंकण, यांचे नांवें. सनद १.

रसारगी याद.

## १९. गुलाम.

१०९३ ( २२ )–किल्ले रायगड येथें सरकारच्या कुणबिणी आहेत, त्यांपैकीं राणी व जानकी दोन कुणबिणी पन्नास व पंचावन वर्षे उमरीच्या बहुत दिवस किल्ल्यास आहेत, त्यांस सोड द्यावयाचा करार करून हे सनद तुम्हांस सादर केली असे, तरी सदरहू दोन कुणबिणी सोडून देणें म्हणोन, गणपतराव कृष्ण यांचे नांवें. सनद १.

अर्बा सबैन मया व अलफ सवाल २८

रसानगी यादी.

१०९४ ( २८ )–सतुमी मिर्धा याणें वणजारे यांजपासून पोर्गे कस २ दोन, एकूण किंमत रुपये १३४, एकशें चवतीस रुपये यांस खरेदी केले, त्यांचे जकातीचा आकार होईल त्यापैकीं पांच रुपये माफखर्च लिहिणें; बाकी रुपये बद्दल मुशाहिरा लिहून, जकातीचा तगादा न करणें म्हणोन, भिकाजी विश्वनाथ कमावीसदार, जकात प्रांत पुणें व जुन्नर, यांचे नांवें छ. १३ सवाल. सनद १.

आर्बा सबैन मया व अलफ जिल्काद ३०

रसानगी यादी.

१०९५ ( २९ )–प्रताप मिर्धा याणें कुणबीण कस १ व पोर्गे कसं २ एकूण किंमत

They left the baggage at the top of the ghauṭs and ran away. Hired labourers were therefore sent from Poona to bring in the baggage and the charge on this account, viz. Rs. 186-4-0 was ordered to be levied from the three tálukás in question.

XIX Slaves.

( 1093 ) Two female slaves of Government at fort Ráygaḍ, Ráṇi and Jánki, aged 50 and 55 having long served at the fort were ordered to be released.

A. D. 1773-74.

( 1094 ) Satumi Mirdhá purchased 2 boys from Vaṇjáris for Rs. 134. Of the duty leviable on the sale, Rs. 5 was remitted and the rest was to be debited to him as salary.

A. D. 1773-74.

( 1095 ) Pratáp Mirdhá purchased one female slave and two boys

अर्बा सबैन मया व अलफ जिल्काद ३० — रुपये १२५, सवाशें रुपयांस चारणापासून विकत घेतले त्याचे जकातीचा आकार होईल तो बद्दल मुशाहिरा लिहून, जकातीचा तगादा न करणें म्हणोन, भिकाजी विश्वनाथ कमावीसदार, जकात प्रांत पुणें व जुन्नर, यांचे नांवें. छ. १४ सवाल. सनद १.

रसानगी यादी.

१०९६ (३०)—वेदमूर्ति राजश्री धोंडजोशी पंचनदीकर यांणीं चारणापासून पुण्यांत कुणबीण कस १ एक, एकूण किंमत रुपये ७३ त्र्याहात्तर रुपयांस विकत घेतली, तिचे जकातीचा आकार होईल तो यांचे नांवें धर्मादाय खर्च लिहून जकातीचा तगादा न करणें ह्मणोन, भिकाजी विश्वनाथ कमावीसदार, जकात प्रांत पुणें व जुन्नर, यांचे नांवें. छ. १६ सवाल. सनद १.

अर्बा सबैन मया व अलफ जिल्काद ३०

रसानगी यादी.

१०९७ (३२)—चिमाजी जगथाप, खिजमतगार, याणें आपली कुणबीण पोर्गी कर्जामधें नारायणजी परभू यांस तीस रुपयांस मौजे असदें, तर्फ सेदोर, येथें विकत दिल्ही, तिचे जकातीचा आकार यास माफ केला असे, तरी तगादा न करणें ह्मणोन, आनंदराव भिकाजी रास्ते यांचे नांवें. छ. २५ सवाल. सनद १.

अर्बा सबैन मया व अलफ जिल्काद ३०

रसानगी यादी.

१०९८ (३४)—कुणबिणी सरकारच्या यांनीं कजबे पुणें येथें कुणबिणी विकत घेतल्या आहेत.

अर्बा सबैन मया व अलफ जिल्काद ३०

१ फुली, निसबत सौभाग्यवती बाई, हिर्णे.

१ तुळशी, निसबत मातुश्री सगुणाबाई,

एकूण दोन कुणबिणी रुपये १४० एकशें चाळीस रुपयांस विकत घेतल्या आहेत,

A. D. 1773-74. from a *chàran* for Rs. 125: the duty leviable on the sale was to be debited to him as salary.

(1096) Dhond Joshi Panchnadikar purchased one female slave from a *chàran* for Rs. 73: the duty leviable on the sale was to be debited to him as *dharmàdàya*.

A. D. 1773-74.

(1097) Chimáji Jagtáp gave his female slave for Rs. 30 to Náráyanji Parbhu in payment of debt: the duty was remitted.

A. D. 1773-74.

(1098) Two female slaves were purchased by two female slaves of Government for Rs. 140.

A. D. 1773-74.

त्यांचे जकातीचा आकार माफ केला असे, तरी जकातीचा आकार होईल तो माफ खर्च लिहून, जकातीचा तगादा न करणें ह्मणोन, भिकाजी विश्वनाथ कमावीसदार, जकात प्रांत पुणें व जुन्नर, यांचे नांवें. छ. ६ जिल्काद. सनद १.

रसानगी यादी.

१०९९ ( ५९ )–केसो महादेव फडके मृत्यु पावले, त्यांचे उत्तर कार्याबद्दल ब्राह्मणांस द्यावयास शेषाद्रि शास्त्री यांचे स्त्रीजवळून पुण्यांत कुणबीण कस १ एक ऐंशी रुपयांस खरेदी केली, त्याचे जकातीचा आकार होईल तो माफ खर्च लिहून, जकातीचा तगादा न करणें ह्मणोन, भिकाजी विश्वनाथ कमावीसदार, जकात प्रांत पुणें व जुन्नर, यांचे नांवें. छ. ८ रविलावल. सनद १.

अर्बा सबैन मया व अलफ रविलावल २२

रसानगी यादी.

## नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

११०० ( ७३ )–पागा दिंमत शेकोजी मुळे यांचे नांवें सनद कीं, तुह्मांकडील पागेंतील बिबू पोर्गी, जैनी कुणबीण मुसलमानीण इची लेक, ही केंदूरचे मुसलमानास देऊन सालगुदस्त सन अर्बा सबैनांत तुह्मीं लग्न केलें, सबब सोड खर्च लिहिणें ह्मणोन छ. १४ जमादिलावल. सनद १.

खमस सबैन मया व अलफ जमादिलाखर २९

रसानगी यादी.

११०१ ( ६२७ )–त्र्यंबक नारायण अभ्यंकर वस्ती कसबे संगमनेर, परगणा मजकूर, यांणीं हुजूर विदित केलें कीं, आमची कुणबीण तावजी जाधव, वस्ती कसबे मजकूर, याणें राखली, तिची पोरगी एक व पोरगा एक यांचीं लग्नें करावयास मागणी घेतली, त्यास आपण द्वाही दिली, परंतु द्वाही मोडून पोराचें लग्न केलें, व पोरीची मागणी घातली, येविशीं ताकीद जाली

समानीन मया व अलफ रजब ६

---

( 1099 ) One female slave was purchased for Rs. 80 to be given to a Brahmin in connection with the obsequies of Keso Mahádeo Fadke.

A. D. 1773-74.

FROM NÁRO APPÁJI'S DIARY.

( 1100 ) A female slave Jaini, Mohomedan by caste, attached to the cavalry under Sakhoji Mule, had a daughter. Sakhoji got the daughter married to a Musalman. Orders were issued to show her in the accounts as released.

A. D. 1774-75.

( 1101 ) Trimbak Náráyaṇ Abhyankar of Sangamner represented that his female slave had been kept by Távaji Jádhava, and that Tàvaji arranged to secure a bride for the slave's son; that he ( Trimbak ) publicly protested in the name of Government against the marriage, but it was notwithstanding celebrated, and that

A. D. 1779-80.

पाहिजे ह्मणोन; त्याजवरून हें पत्र सादर केलें असे, तरी वाजवी मनास आणून पोर व पोरगी व कुणबीण यांचे स्वाधीन करणें, आणि ज्यांणीं द्वाही मोडली असेल, त्यांपासून गुन्हेगारी घेऊन सरसुभा प्रांत गंगथडी येथील हिशेबीं जमा करणें ह्मणोन, नरसिंगराव बल्लाळ यांचे नांवें चिटणिसी. पत्र.

११०२ ( ७७० )—सगुणी कळवंतीण, वस्ती पेठ शुक्रवार शहर पुणें इणें दत्ताजी सांबळा दाळिंबकर याजपासून दीडशें रुपयांस चहूं वर्षांची पोर्गी खरेदी केली आहे, तिचे जकातीचा आकार माफ केला असे, तरी आकार होईल तो माफ खर्च लिहून जकातीचा तगादा न करणें ह्मणोन, भिकाजी विश्वनाथ कमावीसदार जकात प्रांत पुणें व जुन्नर यांचे नांवें. सनद १.

सलास समानीन मया व अलफ साबान ११

परवानगी रूबरू.

११०३ ( ७७१ )—फरासीसाजवळ बटकी पुण्यांत गेल्या, सबब त्यांस जातीखेरीज करून किल्ले सिंहगड येथें पाठविल्या आहेत.

सलास समानीन मया व अलफ साबान २१

बटकी. कस.

२ उमी, दिंमत कृष्णाजी लक्ष्मण जोशी.

१ उमी उमर वर्षें ३०

१ पोरगा उमीचा उमर वर्षें ३

१ साळी, दिंमत दारकी खेत्रीण वस्ती पेठ नारायण उमर वर्षें २२.

३

एकूण तीन माणसें पाठविलीं आहेत, यांस किल्ले मजकुरीं अटकेस ठेऊन इमारतीचें

---

Távaji was also offering the slave's daughter in marriage. The Sarsubhá of Gangathadi was directed to enquire into the matter and if the facts were found to be as represented, to hand over the female slave with her children to Trimbak, and to punish the person who had acted in defiance of the complainant's protest.

( 1102 ) Sakhu, a prostitute in Poona, purchased a girl aged 4 years for Rs. 150. The duty on the purchase was remitted.

A. D. 1782-83.

( 1103 ) Three female slaves having had intercourse with Frenchmen in Poona were put out of caste and sent to fort Sinhagad to be employed on building works.

A. D. 1782-83.

वगैरे काम घेऊन पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन, नारो महादेव यांचे नांवें.
सनद १.

रसानगी यादी.

११०४ ( ८२० )—नारो विश्वनाथ जोगदंड यांणीं आपले तीर्थरूपांचे क्रियेचे दानाबद्दल मार्तंड यादव मुजचाटे, वस्ती पेठ शनवार शहर पुणें याजपासून कुणबीण कस १ एक, एकूण किंमत रुपये १०० शंभर रुपयांस खरेदी केली आहे, त्यास सदरहू रुपयांचे जकातीचा आकार होईल तो मशारनिल्हे यांचे नांवें माफ खर्च लिहून जकातीचा तगादा न करणें ह्मणोन, भिकाजी विश्वनाथ कमावीसदार जकात प्रांत पुणें व जुन्नर यांचे नांवें. सनद १.

अर्बा समानीन मया व अलफ सवाल १

रसानगी यादी.

११०५ ( ८५७ )—केसो विश्वनाथ टिळक, कारकून निसबत दप्तरी, यांणीं विठोजी हेड्या कुणबिणी विकावयास घेऊन आला, त्याजपासून पुण्यांत कुणबीण कस एक, एकूण किंमत रुपये १०० शंभर रुपयांस खरेदी केली आहे, त्याचे जकातीचा आकार होईल तो यांचे नांवें माफखर्च लिहिणें, आणि जकातीचा तगादा न करणें ह्मणोन, भिकाजी विश्वनाथ कमावीसदार, जकात प्रांत पुणें व जुन्नर यांचे नांवें. सनद १.

खमस समानीन मया व अलफ शाबान १६

रसानगी याद.

११०६ ( ८६१ )—मैनी कोम विठोजी सोनार, वस्ती कसबे गोरेगांव, प्रांत राजपुरी, ही विठोजी मजकूर मृत्यु पावल्यावर तेथून पळून पुणेयास येत होती, ती गोविंदराव व चिमाजी माणकर मामलेदार, प्रांत मजकूर यांणीं धरून नेऊन कैदेंत ठेविली. पुढें गोविंद जोशी रेवदंडेकर यांस माणकर यांणीं धर्मादायाचे ऐवजांत दिल्ही. तिला त्यांणीं पुणियास आणिली, तेव्हां गणेशशेट सोनार, वस्ती पेठ शनवार, शहर पुणें, याणें जोशीयास शंभर रुपये देऊन धर्मार्थ सोड-

खमस समानीन मया व अलफ जिल्काद ५

---

( 1104 ) Nàro Vishwanáth Jogdand purchased a female slave for Rs. 100 to be gifted away at the obsequies of his father. The duty on the purchase was remitted.

A. D. 1783-84.

( 1105 ) Vithoji Hedyá having brought some female slaves for sale at Poona, one of them was sold for Rs. 100.

A. D. 1784-85.

( 1106 ) Maini, a woman of the gold-smith caste, ran away from Goregaum in prant Rájpuri on the death of her husband and was coming to Poona. The Mámlatdârs of the province, Govindráo and Chimáji Mánkar, arrested her and kept her in custody. They subsequently made her over to one Govind Joshi in

A. D. 1785-86.

विली; आणि आपले आईबापांचे घरीं जाणें ह्मणोन तीस सांगितलें. तें न ऐकतां शहरांत राहून बदकर्मे करीत होती, सबब कैद करून किल्ले चाकण येथें पाठविली असे, तरी किल्ले मजकुरीं स्वारींत ठेऊन, किल्ल्याचे कोठीकडे इजपासून चाकरी घेऊन पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन, नारायणराव कृष्ण किल्ले मजकूर यांचे नांवें. सनद १.

रसानगी राघो विश्वनाथ गोडबोले, जबानी रावजी शिवाजी कारकून दिंमत गाडदी मुदफकात, निसबत राघो विश्वनाथ.

११०७ ( ८८४ )—मेघी कुणबीण व तिची लेक कृष्णी या दोघी पेशजीं किल्ले सिंहीगड येथें अटकेस ठेवावयास पाठविल्या, त्या सन समान सबैनापावेतों बंदीसच होत्या, त्यांस सन तिसा सबैनांत किल्ले मजकूरचे हिशेबीं जमेस धरून, दारूखान्याचे कोठीकडे कामास लाविल्या, त्यास मेघी

खमस समानीन मया व अलफ जमादिलाखर ७

म्हातारी साठ सत्तर वर्षांची जाली, तिच्यानें कोठीचें कामकाज करवत नाहीं, व कृष्णी दारूखान्याचें काम करतेवेळेस काठीवरून पडोन कंबर व हात दुखवला, त्याजमुळें अधू जाली. तिच्यानें कोठीचें काम करवत नाहीं, याजकरितां त्या दोघी जणी एक कुणबीण नवी तरणी देऊन सोड मागतात त्यास व उमी कुणबीण इंग्रजांबरोबर गेली सबब पेशजीं हुजूरून पोर्ग्यासुद्धां किल्ले मजकुरीं अटकेस ठेवावयास पाठविली होती तिजला आजार होऊन मयेत जाली, तिचा पोर्गा उमर वर्षें आठांचा आहे तो रोगी, सबब वीस रुपये घेऊन पोर्गा व सदरहू दोघी कुणबिणी सोडावयाची आज्ञा जाली पाहिजे, ह्मणोन तुह्मीं हुजूर विनंती केली; त्याजवरून मेघी व तिची लेक कृष्णी या दोघी बंदिवानपैकीं किल्ले मजकूरचे हिशेबीं सन तिसा सबैनांत जमेस धरून कोठीकडे कामास लाविल्या आहेत, त्यास मेघी म्हातारी तिच्यानें काम होत नाहीं, व कृष्णी किल्ल्यावर सरकारचें दारूखान्याचें काम करते वेळेस इमारतीवरून पडून हात व कंबर दुखवली, सबब दोघी मिळोन एक कुणबीण चाकरीचे उपयोगीं देतात, ती घेऊन दोघींस सोडून देणें; व उमी कुणबीण इंग्रजाबरोबर गेली होती सबब तिचा पोर व ती बंदीस किल्ले मजकुरीं होती त्यापैकीं उमी मयत जाली. तिचा पोर आठां वर्षांचा आहे, त्याचे वीस रुपये कोणी देईल त्यास पोरगा देऊन,

---

payment of certain sums due to him in charity; and Govind Joshi brought her to Poona. Ganesh shet Sonár of Shanwár Peth got her released by paying Rs. 100 to Govind Joshi, and told her to go to her parents' house. She, however, led a prostitute's life in the city. She was therefore arrested and sent to be imprisoned in fort Chákaṇ.

( 1107 ) Two female slaves, Meghi and her daughter Krishṇi, were prisoners at fort Sinhgaḍ. The former was about 60 or 70 years old. The latter while employed on the work of making gunpowder fell down from a plank and became a

A. D. 1784-85.

सदरहू वीस रुपये किल्ले मजकूरचे हिशेबीं जमा करणें ह्मणोन, नारो महादेव मामलेदार किल्ले मजकूर, यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

११०८ ( १०८८ )—वेदशास्त्रसंपन्न कृष्णशास्त्री बिन रंगशास्त्री द्रविड, गोत्र शांडिल्य,

अर्बा तिसैन मया व अलफ रबिलाकर १

सूत्र कात्यायन, शाखा कण्व, यांचे नांवें सनद कीं, गुलतरंग खासे चाकरीची बाईको इचा काल श्री काशी क्षेत्रीं जाह्ला, ते समयीं तिणें आपले ऐवजांत क्षेत्र पंचवटी, कसबे नाशीक, परगणे मजकूर, येथें घर बांधोन, त्यांत ब्राह्मण ठेवावा, त्या ब्राह्मणास मौजे गंगापूर परगणे मजकूर येथें पाऊणशें रुपयांची इनाम जमीन माझे नांवें सरकारांतून दिल्ही आहे ती त्यास द्यावी असा संकल्प केला, ह्मणून गुणसागर खासे चाकरीची बायको हुजूर आली तिणें विनंती केली; व पेशजीं इनामपत्रें गुलतरंग इचे नांवचीं जाह्लीं आहेत, त्यांत ज्या ब्राह्मणास जमीन देईल त्याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालवावी असें लिहिलें आहे; त्याजवरून तुह्मीं थोर शिष्ट सत्पात्र गंगातीरीं स्नानसंध्या करून आहां, तुमचें चालविल्यास श्रेयस्कर जाणून, तुह्मांवर कृपाळू होऊन गुलतरंग इचे ऐवजाचे पंचवटींत घर बांधिलें आहे तें तुह्मांस देऊन, मौजे गंगापूरपैकीं इनाम जमीन तिचे नांवें आहे ती सालमजकुरापासून सरकारांतून तुह्मांस इनाम करार करून देऊन, तिचे नांवाचीं इनामपत्रें आहेत तीं तुह्मांस देविलीं असेत, तरी इनामपत्रांप्रमाणें जमीन चतुःसीमापूर्वक तुह्मीं आपले दुमाला करून घेऊन तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम जमीन व घर अनभवून सुखरूप राहणें ह्मणोन. सनद १.

येविशीं गंगाधरराव भिकाजी यांस कीं, घर व जमीन यांचे दुमाला करून देऊन चालवणें; आणि गुलतरंग इचे नांवें इनामपत्रें आहेत तीं यांचे स्वाधीन करून जमीनीचा आकार यांचे नांवें इनामखर्च लिहीत जाणें. नवी सनदेचा अक्षेप न करणें. या सनदेची प्रत लिहून घेऊन हे अस्सल सनद यांजवळ भोगवटियास परतोन देणें ह्मणोन. सनद १.

---

२.

दोन सनदा दिल्हा असेत. रसानगी याद.

cripple. The women asked for release on condition of their giving one young female slave in their place. The request was granted.

( 1108 ) Gultarang, a woman in the personal service of the Peshwá, died at Benáres. In deference to her last wishes expressed by her to Guṇaságar, another woman in the personal service of the Peshwá, a house was built at Panchawaṭi out of her money and the house as well as her Inám land were gifted to a Brahman.

A. D. 1793-94.

# २० धर्मसंबंधीं व सामाजिक.

११०९ ( ४२ )—नारो महादेव कमावीसदार क्षेत्र पंढरपूर, दिंमत परशराम रामचंद्र यांचे नांवें सनद कीं श्रीविठ्ठलदेव वास्तव्य पंढरपूर यांचे अंगावर पाली-चा व सरडयाचा स्पर्श जाहला आहे. तेथील समस्त ब्राह्मणांचे मतें व स्वामींचे मतें देवास महारुद्र करावा, व शांति करावी, सहस्र ब्राह्मणभो-जन करावें; यास खर्च पाहतां चारशें रुपये पर्यंत लागतील म्हणोन शिवाजी बावाजी यांस लिहिलें त्यांणीं हुजूर विदित केलें; त्याजवरून हे सनद सादर केली असे, तरी देवास महारुद्र करणें, व शांति करून सहस्रभोजन करणें; सदरहूचा खर्च मजुरा दिल्हा जाईल म्हणोन मशारनिल्हेस. सनद १.

आर्बा सबैन मया व अलफ सफर १८

१११० ( १३३ )—वेदमूर्ति सदाशिव दीक्षित ठकार हे श्रीकृष्णातीरीं माहुलीसंगमीं वाजपेय यज्ञ करीत आहेत, त्यास दीक्षितांकडे साहित्य देविलें त्याविशीं. सनदा.

आर्बा सबैन मया व अलफ मोहरम २७

१ हैबतराव भवानीशंकर यांस कीं प्रांत वाईपैकीं साहित्य सुमार.

१५० कुंभारकाम.

२५ रांजण.

१०० घागरी.

२५ मडकीं जालीं.

१५०

११५० सुतारकाम.

५० पोळपाट.

५० लाटणीं.

XX Religious and Social matters.

( 1109 ) The deity Vithaldeo, at Pandharpur, having been touched by a lizard, the Mahárudra and Shanti ceremonies were, at the suggestion of the local Brahmins and the Swámi, ordered to be performed; 1000 Brahmins were to be fed, and sanction was accorded to the expenditure of Rs. 400 for the purpose.

A. D. 1773-74.

( 1110 ) Sadáshiv Dixit Thakár being about to perform a Vája-peya sacrifice at Máhuli, orders were issued to provide him with earthen pots, wooden furniture &c.

A. D. 1773-74.

१००० मेखा.
५० ठाणवया.

११५०

५००० पत्रावळी.

६३००

सहा हजार तीनशे सुमार देणें म्हणोन. सनद.

१ श्रीनिवास शामराव यांस कीं प्रांत कऱ्हाडपैकीं सदरहूप्रमाणें सुमारी ६३०० सहा हजार तीनशे देणें ह्मणोन. सनद.

दोन सनदा. रसानगी यादी. सदरहूखेरीज कांहीं बुरुडकामही देणें ह्मणोन दोहीं सनदांत लिहिलें असे.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

१११११ ( २४२ )—लख्या ठाकूर नाशीककर हा श्रीत्रिंबकेश्वराचे देवळांत गेला, यास्तव त्यास अटकाविला आहे, ह्मणोन विदित जाहालें; ऐशास ठाकूर मजकुराकडे गुन्हेगारीबद्दल ऐवज रुपये एक हजार रुपये घेऊन त्यास सोडावयाची आज्ञा केली असे, तरी सदरहू हजार रुपये घेऊन तालुके त्रिंबक येथील हिशेबीं जमा करणें, आणि ठाकूर मजकुरास सोडून देणें ह्मणोन, नारो महादेव यांचे नांवें. छ. १५ साबान. सनद १.

सीसबैन मया व अलफ रमजान ३०

परवानगी राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस.

( २४३ ) लखा ठाकूर नाशीककर हा त्रिंबकेश्वराचे देवालयांत पूजेस जाऊन अभिषेक करूं लागला, सबब त्याजला तुह्मीं किल्ले त्रिंबक येथें अटकेंत ठेविलें आहे, त्यास ठाकूर मजकुरापासून गुन्हेगारीबद्दल एक हजार रुपये घेऊन तालुके त्र्यंबक येथील हिशेबीं जमा धरून लखा ठाकूर यास सोडून देणें, ह्मणोन छ. १५ साबानची सनद तुम्हांस सादर जाली आहे, परंतु, हल्लीं रुपये घ्यावयाचे मना करून त्यास सोडून द्यावयाची आज्ञा केली असे, तरी ठाकूर मजकुरास सोडून देणें ह्मणोन, नारो महादेव यांचे नांवें छ. २४ साबान. सनद १.

---

FROM JANÁRDAN APPÁJI'S DIARY.

( 1111 ) Lakhá Thàkur of Násik was fined Rs. 1,000 for having entered the temple of Shri Trimbakeshwar: the fine was afterwards remitted.

A. D. 1775-76.

१११२ ( २४६ )—धोंडो महादेव, तालुके त्रिंबक, यांचे नांवें सनद कीं कजबे त्रिंबक येथें देवीस विजयादशमीस टोणग्याची बळ पहिल्यापासून चालत होती, अलीकडे चार पांच वर्षे चालत नाहीं, त्याजमुळें गांवचे लोकांस दृष्टांत होऊन उपद्रव बहुत होतो, त्यास येविशींची आज्ञा होऊन तेथील अंमलदारास सनद देवविली पाहिजे, म्हणून कजबे मजकूरचे समस्त क्षेत्रस्त ब्राह्मणांनीं हुजूर विनंतिपत्र पाठविलें; त्याजवरून हे सनद सादर केली असे, तरी कजबे मजकूरचे देवीस विजयादशमीचे दिवशीं बळीस टोणगा पांच वर्षांपलीकडे पावत आल्याचा दाखला मनास आणून, पावत आल्याप्रमाणें एक टोणगा दरसाल तालुकेमजकूरपैकीं देत जाणें म्हणोन छ. २० साबान. परवानगी रूबरू. राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस. सनद १.

सीत सबैन मया व अलफ रमजान ३०

१११३ ( २६५ )—लछीनाईक भोई, निसबत पांडुरंगराव गोविंद, याणें बायको टाकिली होती, त्या बाइकोचा बोभाट तुम्हांजवळ आला, तेव्हां त्यास जातींत लाऊन देऊन बाइको याणें वर्तवावी असें पांचांचें विचारें जालें, त्यास तुह्मीं नजरेविशीं तगादा लाऊन बसविला आहे, म्हणोन हुजूर विदित जाल; ऐशास मशारनिल्हेकडील भोई, याजकरितां नजरेच्या ऐवजाचा तगादा न करणें, बसविला असेल त्यास सोडून देणें, म्हणोन धोंडो बाबाजी कोतवाल शहर प्रांत पुणें यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

सीत सबैन मया व अलफ जिल्हेज २४

१११४ ( २७८ )—विष्णु केशव देसाई तर्फ राजापूर तालुके विजयदुर्ग यांणीं हुजूर विदित केलें कीं विष्णु अनंत घाटे यांणीं आपल्यावर भुतें घालून मारे केले, त्याजवरून सुभाहून पडथळे नेमून देऊन अमीन दिला, त्याचे विद्यमानें थळीं उभयतांचा निवाडा जाला; उप्रांतीक सुभा गेलों; नंतर

सीतसबैन मया व अलफ सफर ५

---

(1112) A buffalo used to be sacrificed to the goddess at Kasbe Trimbak on the Dasará festival, but the practice had been discontinued for four or five years. The Brahmins of the place represented that the people were much troubled in dreams on account of this omission. The officer of Trimbak was therefore directed to restore the old practice and offer a buffalo in sacrifice every year.

A. D. 1775-76.

(1113) The wife of Lachhi Naik Bhoi in the service of Pándurangráo Govind was deserted by her husband, and she complained to the kotwál. He referred Lachhi to the caste people. The Panch decided that Lachhi should admit his wife into his house. The kotwál asked Lachhi for a *nazar*. The matter having been represented to the Huzur, the kotwál was told not to trouble him for the *nazar*.

A. D. 1775-76.

(1114) Vishṇu Anant Gháṭe of prânt Rájápur being suspected of

महादाजी रघुनाथ यांणीं पंचाइत करून घाटे मजकूर याजकडे भूत लागूं जालें त्याचें पारिपत्य न होय, याजकरितां त्यांणीं सरकारांत विनंतिपत्र लिहून देऊन उभयतांसही हुजूर जाण्याविशीं निरोप दिला; त्यास महादाजी रघुनाथ यांणीं सरकारांत पत्र दिलें तें पाहोन, व सुभांचे सांगितल्यावरून समस्त ब्राह्मणांनीं घाटे यास वाळींत घातलें. त्यावर उभयतां सरकारांत आलों, पंचाइत्या जाहल्या, घाटे खोटे जाहले. त्यास सरकारची शुद्धतेची आज्ञा नसतां, व समस्त ब्राह्मणांस न कळतां, घाटे याणीं रामठाकूर देसाई, तर्फ मजकूर, यांस पुढें करून कांहीं ब्राह्मण धटाईनें जेऊं घातले आहेत, त्यास ज्या ब्राह्मणांनीं त्याचे घरीं अन्नवेवहार केला असेल त्यांस, व घाटे यांस श्रीधूतपापेश्वराचे देवालयीं पंचगव्य देऊन शुद्ध करावयाची आज्ञा जाली पाहिजे म्हणोन; त्याजवरून हें पत्र तुम्हांस सादर केलें असे, तरी सुभाचे आज्ञेनें बहिष्कार पेशजीं जाला असल्यास, दिवाणचे आज्ञेविना त्याचे घरीं अन्नव्यवहार ज्या ब्राह्मणांनीं केला असेल, त्यांजपासून दर असामीस पांच रुपये गुन्हेगारी घेऊन, घाट्यास व त्यांस पंचगव्य देऊन शुद्ध करणें म्हणोन, गंगाधर गोविंद यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

११९५ ( ३०५ ) मौजे सायखेडें, परगणे नाशीक, येथील सरदेशमुखीचा अंमल

सबा सबैन मया व अलफ जमादिलावल २

शिवानंद सरस्वती संन्यासी शेणवी यांजकडे पहिलेपासून चालत होता, त्यास यादवराव रघुनाथ यांणीं सरकारांत गैरवाका समजाऊन सरदेशमुखीचे अंमलाची जप्ती करविली होती, त्याची कमावीस तुह्मांकडे सांगितली आहे, त्यास हल्लीं जप्ती मोकळी केली असे; तरी तुह्मीं जप्ती मोकळी करून दखलंगिरी न करणें. जप्तीमुळें वसूल घेतला असेल तो माघारा देणें ह्मणोन, शिवाजी विठ्ठल यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

११९६ ( ३४८ )–काजी पुणेकर याणें कळवंतिणीचे कुणबिणीची' पोर रंगरेजाशीं

A. D. 1775-76. raising evil spirits against Vishṇu Keshav Desái, the matter was investigated by the Subhá and the parties were sent to the Huzur. In the meantime, Vishṇu Anant was excommunicated by the villagers. He however, in disregard of the excommunication gave a dinner to certain Brahmins. A complaint was made to the Huzur and it was decided that if the order of excommunication was passed at the instance of the Subhà, the persons who had dined should be fined Rs. 5 each.

( 1115 ) The Sardeshmukhi *ámul* of Sáyakheḍ in parganá Násik was held by Shivànand Saraswati, a Sanyáshi of the Sheṇwi caste.

A. D. 1776-77.

( 1116 ) The Kázi of Poona being about to solemnize a *Niká*

सबा सबेन मया व अलफ रमजान २९ — निका लावण्याचें केलें, तेव्हां कळवंतीण सरकारांत फिर्याद आली कीं, रंगरेजाशीं पोरीचा निका लाऊं नये, त्याजवर काजीस ताकीद केली असतां रंगरेजाबरोबर कळवंतिणीचे पोरीचा निका लाविला, सबब काजी मजकूर याचे वतनाची इनामगांवसुद्धां जप्ती करून जप्तीची कमावीस तुह्मांकडे सांगितली असे, तरी कळवंतिणी वगैरे मुसलमान लोकांकडे काजीची दस्तुरी असेल ते, व गांवमळा वगैरे कुल काजीकडून जप्त करून, आकार होईल तो सरकारांत पावता करून जाब घेणें ह्मणोन, पांडुरंग कृष्ण बेडेकर यांचे नांवें. छ. १ रमजान. सनद १.

परवानगी रूबरू.

१११७ ( ५१६ )–रामा कानडा जातीचा ब्राह्मण ह्मणवितो, परंतु पुण्यांत गाईचीं

समान सबैन मया व अलफ सवाल ३० — पुच्छें तोडलीं वगैरे उपद्रव केले, प्रायश्चित्त योग्य नव्हे, सबब किल्ले कोहज येथें अटकेस ठेवावयासी बेडीसुद्धां पाठविला आहे, तरी पायांत बेडी घालून पोटास कोरडा शेर देऊन पक्या बंदोबस्तानें अटकेंत ठेवणें ह्मणोन, भिकाजी गोविंद यांस छ. १२ रमजान. सनद १.

रसानगी यादी.

१११८ ( ५१७ )–विश्वनाथभट पेठ्ये, वस्ती कसबे कडूस, तर्फ खेड, यांणीं कुण-

समान सबैन मया व अलफ सवाल ३० — बीण ठेवून बायको नांदविली नाहीं, यास्तव सरकारांतून पत्र पाठवून भटजीस हुजूर आणिलें त्यास येविशीं कलमें बितपशील.

A. D. 1776-77. — marriage between the daughter of a slave belonging to a prostitute, and a dyer, the prostitute made a complaint to Government, and the Kázi was directed to refrain from performing the marriage; nevertheless, he performed it. His watan inám and his *hak* of levying *dasturi* from prostitutes and other Musulmans were attached.

( 1117 ) Rámá Kánade, calling himself a Brahmin, cut off the

A. D. 1777-78. — tails of some cows and did other mischief in Poona. His offences could not be expiated by a mere penance so he was sent in fetters to be inprisoned at fort Kohaj.

( 1118 ) Vishvanáth Bhaṭ Peṭhye of Kaḍus in táluká Kheḍ deserted

A. D. 1777-78. — his wife and lived with a kuṇbi woman. He was called to the Huzur and directed to give up his mistress an live with his wife. He agreed to do so, so his wife was made over td

भटजीनें कुणबीण ठेऊं नये, स्त्रीस नांदवावें, याप्रमाणें सरकारांतून ताकीद केली; त्यास सरकारआज्ञेप्रमाणें चालतों असें भटजींनीं कबूल केलें; याजवरून यांची स्त्री यांचे हवालीं करून यांस कसबे मजकुरीं पाठविले असेत, तरी हे रीतीप्रमाणें आपले स्त्रीस नांदवितील. कलम १.

कसबे मजकुरीं भटजींचें शेत आहे, तें तुह्मीं जप्त केलें ह्मणोन हे सांगतात, तरी यांचे शेताची जप्ती मोकळी करून पूर्ववत्प्रमाणें यांचें शेत यांजकडे चालवणें. कलम १. भटजीची कुणबीण किल्ले सिंहगड येथें अटकेंत ठेविली आहे; तिचीं पोरें तीन आहेत, तीं भटजींचे स्त्रीचे हवालीं केलीं आहेत. तीं हे आपले घरीं नेऊन पालण करितील.

एकूण तीन कलमें लिहिलीं आहेत, त्यास यांचे शेताची जप्ती मोकळी करून सदरहू लिहिल्याप्रमाणें यांस वर्तवणें ह्मणोन, गोविंद बल्लाळ कमावीसदार तर्फ मजकूर यांचे नांवें चिटणिसी छ. ९ सवाल. पत्र १.

तिसा सबैन मया व अलफ रजब २९

१११९ ( ५८१ )–धाको महादेव करमरकर, वस्ती बीरवाडी, तर्फ मजकूर, यांची कन्या चौवरसांची त्रिंबक रघुनाथ धारप याणें करमरकर याचे अर्ज्या गुलामास व बटकीस फिताऊन मुलीस चोरून बीरवाडी नजीक पोफळविराचे रानांत नेऊन, येस जोशी नांदगांवकर व आबा धारप यांस नेऊन लग्न करीत होता, हें वर्तमान मुलीचा माय–आजा भिकाजी बल्लाळ टीगणे व गणेश नारायण लिमये यांस कळतांच धावोन जाऊन मुलीस घेऊन गांवांत आले, आणि हुजूर येऊन सदरहू वर्तमान विदित केलें; त्याजवरून धारप व जोशी यांस मसाला करून आणून मनास आणितां येस जोशी याणें लिहून दिल्हें कीं, त्रिंबक धारप याणें मजला पन्नास रुपये द्यावयाचा करार करून, पैकीं तीस रुपये देऊन रामचंद्र कृष्ण मामलेदार याची आज्ञा घेतली आहे, तुह्मीं लग्न चालवावें म्हणून गोमय तुळसीवर हात ठेऊन शफतपूर्वक सांगि-

---

him, and the attachment on his field was removed. The kunbi woman was sent to be imprisoned at fort Sinhgad, and the children which she had by the Brahmin were entrusted to the care of his wife.

A. D. 1778-79.

( 1119 ) Trimbak Raghunáth Dhárap of Birwádi, with the help of the slaves at Dháko Mahádeo Karmarkar's house, enticed away Dháko's daughter aged 4 years to the lands of Pophalvir near Birwádi, and was going to marry her. His brother Abá Dhárap, was present on the occasion and Yés Joshi was officiating as priest. The girl's maternal-grand-father, having got wind of the matter, ran to the spot and carried the girl back to the village; and then complained to the Huzur. Dhárap and Joshi were summoned to appear and Yés Joshi stated in his evidence, that he undertook to

तलें, आणि मुलीस घेऊन पोफळविराचे रानांत गेला; त्याचा भाऊ आबा धारप मजला बोलावायास आला, तो व मी तेथें गेलों, लग्नाचा संकल्प करून देवकस्थापना पुण्याहावाचन वितरिक्त गणपतीपूजनादिक कन्यादानान्त उदकेंकरून केलें. विवाहहोमास अग्नि नवता तो आणावयास आबा धारप गेला, तों इतकीयांत धावणें आलें, तें समयीं आपण पळोन अवचितगडचे मेश्यांत गेलों, आणि सदरहू जालें वृत्त मामलेदारास निवेदन केलें, त्यांणीं लग्न फिरेलसें वाटतें असें उत्तर केलें. मागून भिकाजी बल्लाळ आले, त्यांणीं विवाहहोम जाहला नाहीं ह्मणोन सांगितलें, त्यास राहिलें कर्म समाप्त करणें ह्मणून सांगून ग्रामस्तांस पत्र देऊन सर्वांस निरोप दिल्हा. धारपांकडे व मजकडे पांचशें रुपये गुन्हेगारी करार करून निशा घेतली, पैका आपण दिल्हा नाहीं, धारप याणेंच दिल्हा. विवाहहोमादि राहिलें कर्म गांवीं येऊन करावें तों मुलीस पळविलें यामुळें जालें नाहीं. ह्मणोन, व ग्रामस्तांचें पत्र सरकारांत आलें, त्यांत विवाहहोमादिक कर्म जाहालें नाहीं ह्मणून लिहिलें आहे. त्याजवरून, वेदशास्त्रसंपन्न लक्ष्मण पाठक प्रभृती शिष्ट ब्राह्मणांचे मतें मूल कोणाची, देतो कोण, हें सारेंच अनन्वित, आणि विवाहहोमही जाला नाहीं, तेव्हां लग्न जालेंच नाहीं, यास्तव दुसरा वर उत्तम पाहून मुलीचें लग्न करावें, याप्रमाणें सिद्धान्त होऊन हें पत्र सादर केलें असे, तरी जोशी व आबाजी बल्लाळ धारप यांणीं कर्म वाईट केलें, सबब उभयतांस आपांक्त करून, मुलीस वर तिचे मातुश्रीचे विचारास येईल तो योजून लग्न करवणें ह्मणोन, रामचंद्र कृष्ण कमावीसदार, तालुके अवचितगड, यांचे नांवें चिटणिसी.

पत्र १.

सदरहूअन्वयें ब्राह्मण समस्त, वास्तव्य बिरवाडी, यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

२

दोन पत्रें छ. ७ जमादिलाखर दिल्हीं असेत.

---

officiate as priest at the ceremony as Trimbak told him that he had obtained the Mamlatdár's permission for the marriage and as he (Trimbak) paid him Rs. 30 and offered to pay 20 more. He further stated that the ceremonies of *Ganpati pujan* &c. up to and including *kanyádán* had been completed, and that they were stopped while Abà had gone to fetch fire which was required for performing the marriage sacrifice. The villager's report also showed that the sarifice had not been performed. The matter was then referred to Laxmaṇ Páthak and other learned Brahmins. They found that as the guardian of the girl had not offered the girl in marriage and that as the marriage sacrifice had not been performed, no marriage had taken place, and advised that the girl should be married to another suitable bride-groom. Orders were therefore issued to excommunicate Yés Joshi and Abáji Dhárap, and the kamávisdár was directed to get the girl married to another man selected by her mother.

११२० ( ५८२ )—त्रिंबक धारप याणें धाको महादेव याचे मुलीस पळऊन आपणाशीं बीरवाडीनजीक पोफळविराचे रानांत लग्न लावीत होता, सबब त्यास धरून आणून किल्ले राजमाची येथें अटकेंत ठेवावयासी पाठविला आहे, तरी याचे पायांत बेडी घालून किल्ले मजकुरीं पक्कया बंदोबस्तानें अटकेंत ठेऊन पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन, रामराव नारायण यांचे नांवें.

तिसा सबैन मया व अलफ रजब २९

छ. ३ जमादिलाखर. सनद १.

रसानगी यादी.

११२१ ( ६४२ )—क्षेत्र नाशीक, परगणे मजकूर, येथें रामाजी जनार्दन दिंमत चिंतो विठ्ठल याजकडे ब्रह्मवधाचें निमित्य आलें, त्याचें प्रायश्चित्त न होतां अभिमान धरून वेदशास्त्रसंपन्न विश्वनाथभट भातवडीकर व दादंभट बेले प्रभृती ब्राह्मणांनीं आग्रहें रामाजीशीं संसर्ग करून तड केला. अलीकडे दिवाकर दिक्षित पटवर्धन यांजकडे ध्यानंदास बैरागी यास मारावयाचे प्रयोजकतेचें निमित्य आलें, त्याची निष्कृति न करितां वेदशास्त्रसंपन्न पांडुरंग दिक्षित प्रभृती शुक्ल पक्षींचे ब्राह्मणांनीं दिक्षिताशीं व्यवहार चालविला. हें वर्तमान सरकारांत विदित जाहलें; त्याजवरून दोन्हींकडील संभावित ब्राह्मणांस हुजूर पुण्याचे मुक्कामीं बोलाऊन वर्तमान मनास आणून ज्याजकडे जसा दोष व ज्याजकडे जसा संसर्ग तसें त्यास प्रायश्चित्त योजून दोन पक्षांच्या दोन यादी अलाहिदा ठराऊन पाठविल्या असेत, त्याप्रमाणें प्रायश्चित्त करवणें, व क्षेत्रांतील ब्राह्मण वगैरे यांणीं पुढें वर्तणूक कशी करावी येविशींचा ठराव कलमवार समस्त ब्राह्मणांचे विद्यमानें करून तीन तहनामे लिहून पाठविले आहेत, ते कोणापाशीं कसे ठेवावे येविशींचा, व कृष्णपक्षींचे ब्राह्मणांनीं बखेडा केला याजमुळें शुक्लपक्षींचे ब्राह्मणांस कर्ज जाहालें तें वारावयाविशींचा मार्ग योजून तपशील लिहिला आहे. बितपशील.

समानीन मया व अलफ जिल्काद ३

कलमें.

( 1120 ) Trimbak Dhárap, the chief offender was sent to be imprisoned in fort Ràjmáchi.

A. D. 1778-79.

( 1121 ) One Rámáji Junárdan of Násik was suspected of having killed a Brahmin Vishwanáth Bhat Bhátawdekar; still other Brahmins knowing had dealings with him without requiring him to purify himself by penance. This led to a split in the Brahmin community of Násik, one party calling itself *Shukla* and calling their opponents, including Vishwanáth Bhat, *Krishna* ( impure ). Certain members of the former party, Pándurang Dixit and others, subsequently had dealings with Divákar Dixit Patwardhan who was suspected of having abetted the murder of a *bairàgi* without making

A. D. 1779-80.

१ तहनामे सरकारांतून तीन करून दिल्हे आहेत, त्यांपैकीं एक कमावीसदारांनीं दप्तरीं ठेवावा, व एक पाटील कुळकर्णी यांजपाशीं ठेवावा, व एक धर्माधिकारी यांजवळ द्यावा. धर्माधिकारी यांणीं त्याच्या पांच नकला श्व ( स्व ) दस्तुरी करून, आपलें बिकलम घालून, वरकड धर्माधिकारी त्यांचे भाऊबंद असतील त्यांच्या साक्षी घालून, सदरीलचें असल पत्र आपणाजवळ आहे ह्मणून नकलेचे पाठीवर लेहून, पांचा ज्ञातींजवळ पांच नकला द्याव्या.

१ देशस्थांमध्यें उपासनी हिंगणे यांजपासीं द्यावी.

१ चित्तपावनांमध्यें यज्ञेश्वर दिक्षित पटवर्धन यांजपाशीं द्यावी.

१ कऱ्हाडे यांमध्यें चिंतामण दिक्षित भडकंभकर यांजपाशीं द्यावी.

१ यजुर्वेदी यांमध्यें पूर्वींपासून ज्या घराण्यांत कागदपत्र ठेवावयाची चाल असेल त्याजपाशीं द्यावी.

१ कण्वांमध्यें ज्या घराण्यांत पूर्वींपासून कागदपत्रें ठेवावयाची चाल असेल त्याजपाशीं द्यावी.

१ रामाजी जनार्दन याच्या कजीयापासून शुक्लपक्षी ब्राह्मणांस व कृष्णपक्षी ब्राह्मणांस खर्च जाहला आहे, त्यास कृष्णपक्षीं खोटे पडिले, त्यांचा खर्च त्यांनीं समजोन ध्यावा; शुक्लपक्षींचे ब्राह्मणांस जो खर्च पडिला आहे त्यास हे खरे जाहले, सबब रामाजी जनार्दन व दादंभट बेले व विश्वनाथभट भातवडीकर व बाबूभट मठकर व दादंभट खेडकर वगैरे यांनीं बखेडा करून कलह वाढविला, सबब त्यांजपासून घेऊन शुक्लपक्षींचे ब्राह्मणांस देवावा; त्यांजपासून ऐवज निष्पन्न होईल तेणेंकरून ऐवजाची भरती न होय तरी महादोषाचें प्रायश्चित्ताचें द्रव्य पांचा ज्ञातीस वांटून द्यावें असें लिहिलें तें या ऐवजाचे भरतीस ऐवज फिटेतोंपर्यंत द्यावें व दिवाकर दीक्षितसंबंधें ब्राह्मणांस खर्च जाहाला असेल तो चौकशी करून दिवाकर दीक्षिताकडून देवावा.

---

२

एकूण दोन कलमीं तपशील लिहिला आहे, याप्रमाणें करून प्रायश्चित्ताच्या यादी अलाहिदा पाठविल्या आहेत, त्याप्रमाणें चौकशीनें प्रायश्चित्तें करऊन पुढील वर्तणुकेचा तह-

---

inquiries in the matter. The Brahmins of both the parties were therefore called to the Huzur; and inquiries were made and penances were prescribed to all according to the measure of their guilt. A document was also drawn up showing how the Brahmins were to behave in

नामा कलमवार जाहला आहे, त्याप्रमाणें वर्तणूक सर्वांपासून करणें, व तुम्हीं करणें ह्मणून पांडुरंग धोंडाजी कमावीसदार परगणे मजकूर यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

सदरील तीन तहनामे तिघांपाशीं ठेवावयाकरितां दिल्हे आहेत, त्याची नकल तपशीलवार अलाहिदा दप्तरीं करून ठेविली असे, तिहींचाही मजकूर एकसारिखाच असे.

११२२ ( ६४८ )—वेदमूर्ति शामाचार्यप्रभृती ब्राह्मण पैठणकर यांणीं नरहरी रनालकर भ्रष्ट ब्राह्मण यास प्रायश्चित्ताचा अधिकार नसतां प्रायश्चित्त देऊन पंक्तीस घेतला, व शुद्धपक्षींचे ब्राह्मणांवर बलात्कार करून त्यांशीं आपली पंक्ती केली, सबब शामाचार्य याजकडे वर्षासनें वगैरे आहेत, व त्याचे कुटांतील ब्राह्मणांकडे वर्षासनें वगैरे आहेत, त्यांची जप्ती सरकारांत केली त्याजविशीं रसानगी यादी. सनदा.

समानीन
मया व अलफ
जिल्काद २२

१ रामचंद्र नारायण यांचे नांवें सनद कीं, वेदमूर्तीकडे परगणे पैठणपैकीं मुकासीयाचे अंमलाचे गांव आहेत ते.

देहे.

१ मौजे आनंदपूर.
१ मौजे पथवंडी.

———

२

एकूण दोन गांव आहेत तेथील मोकाशाचा अंमल, व हरदूगांवीं मशारनिल्हेची इनाम जमीन आहे तिची जप्ती करून उत्पन्न होईल तें परगणे नेवासें वगैरे महाल येथील हिशेबीं जमा करणें म्हणोन. सनद.

२ मोकदम देहाये, परगणें पैठण, यांचे नांवें सनदा कीं, मशारनिल्हेंचे इनामजमीनीची व मोकाशाची जप्ती करून कमावीस रामचंद्र नारायण यांजकडे सांगितली आहे, त्यांशीं रुजू होऊन सदरहूचा वसूल सुरळीत देत जाणें ह्मणोन. सनदा.

१ मौजे आनंदपूर.
१ मौजे पथवंडी.

———

२

future. The expenses incurred by the Brahmins of the pure party were ordered to be paid by the 'impure' party as the latter were the aggressors.

( 1122 ) Shámácbárya and other Brahmins of Paiṭhaṇ performed the ceremony of purification in the case of a man who was not entitled to be purified. The annuities enjoyed by the Brahmins were therefore attached.

A. D. 1779-80.

१ नारो लक्ष्मण कमावीसदार, बाबती सरदेशमुखी, परगणे पैठण दिंमत महादाजी शिंदे, यांचे नांवें सनद कीं, शामाचार्यप्रभृती कुटांतील ब्राह्मण यांजकडे सरदेशमुखीचे वगैरे अमलपैकीं रोज व वर्षासनें चालत आहेत त्यांची जफ्ती सरकारांत करून, जफ्तीमुळें ऐवज वसूल होईल, तो सरकारांत पावता करून जाब घेत जाणें म्हणोन. सनद.

१ विठ्ठल कृष्ण कमावीसदार मोकासा परगणे पैठण दिंमत मानसिंगराव यादव व अमृतराव यादव सोळसकर यांचे नांवें सनद कीं, शामाचार्यप्रभृती कुटांतील ब्राह्मणांकडे मोकाशापैकीं वर्षासनें व रोज चालत आहेत त्यांची जफ्ती करून, उत्पन्न होईल तें सरकारांत पावतें करून पावल्याचा जाब घेत जाणें म्हणोन.

सनद.

---

५

पांच सनदा दिल्या असेत.

१११२३ ( ६५२ )—नारो कृष्ण यांचे नांवें पत्र कीं, कुंभाराचीं वधुवरें घोड्यावर बसऊं नयेत येविशीं कासार व सुतार व लोहार यांणीं दिकत केली, सबब कुंभाराचा व कासार वगैरे यांचा कजीया लागोन मनसुबी हुजूर पडली त्याचा फडशा होऊन कुंभाराचीं वधुवरें घोड्यावरी बसवावीं असें सिद्ध जाहालें. कुंभार खरे जाहाले त्यांजपासून हरकी घेतली, कासार वगैरे खोटे जाहाले त्यांजपासून गुन्हेगारी ध्यावी, सबब बनाजी कासार व कृष्णाजी लोहार व सुतार मौजे पोंहरी, परगणे सुतोडा, यांस दोनशें रुपये मसाला करून सरकारांतून राऊत व खिजमतगार व ढलाईत हुजूर आणवावयाबद्दल पाठविले असतां ते गैर हजीर जाहाले ह्मणोन हुजूर विदित जालें, त्याजवरून हें पत्र सादर केलें असे. तरी बनाजी कासार व कृष्णाजी सुतार वगैरे यांची वस्तभाव व साहुकारी प्रांत खानदेश येथें असेल ते सरकारचा खिजमतगार पाठविला आहे, त्याचे विद्यमानें मोजदाद करून बंदोबस्त करणें, आणि मोजदादीचा जाबता हुजूर पाठवणें. सदरहू कुळाकडे गुन्हेगारीचा ऐवज येणें त्याचे वसुलास सरकारचा खिजमतगार तेथें ठेऊन घेणें ह्मणोन चिटणिसी. पत्र १.

समानीन मया व अलफ जिल्काद २९

१११२४ ( ६५९ )—बाबू विष्णु प्रभुणा याचे आईकडे माहुलीस आपाजी तमाजीस

---

(1123) The carpenters, blacksmiths &c. of Khándesh objected to the bride and bride-groom of the potter caste riding on horse-back. Their objection was overruled; and they were made to pay a fine, while a present was taken from the potters.

A. D .1779-80.

(1124) The mother of Bábu Vishnu Prabhuṇá of Máhuli was sued

समानीन मया व अलफ जिल्हेज ८ कण्हेराच्या मुळ्या वाटून घातल्याचा, व बाबू विष्णु व त्याचा सोबती सदाशिव लिंबा या दोन पतितांचे स्त्रियांस त्यांचा संसर्ग जाला असा शब्द ठेऊन या दोघी व बाबू विष्णूची आई एकूण तिघी वेगळ्या ठेविल्या आहेत ह्मणोन हुजूर विदित जाहालें; त्याजवरून मुळ्यांचा व संसर्गाचा शोध करितां ह्मातारीनें मुळ्या वाटून घातल्या नाहींत, व दोघी स्त्रियांस पतितांचा संसर्ग जाला नाहीं, याप्रमाणें चौकशीनें ठरलें, याकरितां तिघींस मिथ्यापवाददोषपरिहारार्थ पंचगव्य देऊन पूर्ववत् व्यवहार चालवणें ह्मणोन, कृष्णराव अनंत यांस चिटणिसी. पत्र १.

येविशीं समस्त ब्राह्मण क्षेत्र माहुली यांस कीं, तिघींस पंचगव्य देऊन पूर्ववत् व्यवहार चालवावा असें चिटणिसी. पत्र १.

११२५ ( ७३४ )—बाळाजी महादेव मामलेदार तालुके शिवनेर यांस पत्र कीं, इसन्ने समानीन मया व अलफ मोहरम ८ जुन्नरांत तुमचे घरीं बटीक होती, ते पूर्वी जातीची परभूची स्त्री असतां, तिणें अंतेज्याशीं व्यभिचार केला होता, असें सांप्रत कळलें. तुमचे घरीं कमकसर अडीच वर्षे होती, घरांतील झाडणें, सारवणें, खरकटीं भांडीं घासणें, व भाज्या निसणें चिरणें, व बिछाने घालणें हीं सर्व कामें करीत असे, यास्तव नीचाभिगतयोषितूसंसर्गप्रायश्चित्त प्राजापत्यें एकूण रौप्य प्रत्याम्नाय.

रुपये.

२७० तुमची मातुश्री ठकूबाई प्राजापत्यें १३५ दर २ दोन रुपये प्रमाणें. रुपये.

१६२० तुह्मी व तुमची स्त्री.

१०८० तुम्हांस मुंडणपूर्वक प्राजापत्यें २७० दर प्राजापत्यास रुपये ४ प्रमाणें.

A. D. 1779-80. pected of having given roots of the *kanher* plant to Appáji Tamáji to eat. She as well as two other women, who were suspected of having had connection with their husbands after the latter had lost caste, were excommunicated by the Brahmins of Máhuli. Inquiry showed the suspicions in each case to be groundless. It was ordered however that cow's urine should be given to the three women to purify them from the false imputation that had been made against them, and that they should then be admitted into the caste.

(1125) It was discovered that a female slave who had lived in the house of Báláji Mahádeo, Mámlatdár of Shiwner, for about $2\frac{1}{2}$ years was originally a Parbhu woman

A. D. 1781-82.

५४० क्षीस प्राजापत्यें १३५ दर ४ प्रमाणें. रुपये.

१६२०

१३५ तुमचे चुलत बंधु उमर वर्षे १२ यांस प्राजापत्यें १३५ दर १ प्रमाणें. रुपये.

२७० तुमचे पुत्रास प्राजापत्यें १३५ दर २ प्रमाणें. रुपये.

४ तुमचे सुनेस प्राजापत्यें २ दर २ प्रमाणें. रुपये.

५०१ ब्राह्मणभोजन जुन्नरांत करावें, ब्राह्मण. असामी.

१००० खुद्द.

५०० क्षीस.

१०० सर्वास.

१६००

एकूण सोळाशें ब्राह्मणांस दर हजारीं उत्तम प्रतीचे भोजनास अजमासें रुपये ३०० तीनशें प्रमाणें व दक्षणा मिळोन. रुपये.

२०० पुर्वोत्तरांग एकूण. रुपये.

३०००

येणेंप्रमाणें प्रायश्चित्त ( त्ता ? ) र्थ प्राजापत्यांचे रौप्य प्रत्याम्नाय, व ब्राह्मणभोजन, व पूर्वोत्तरांग मिळोन तीन हजार रुपये करार केले असेत, त्यास प्रायश्चित्त नेमिलें आहे, त्या प्राजापत्यांची व्यवस्था. रुपये.

१३८० जुन्नरांत.

६७९ प्राजापत्यें एकूण रुपये.

५४४ प्राजापत्यें २७२, दर २ प्रमाणें.

१३५ प्राजापत्यें १३५, दर १ प्रमाणें.

६७९ ४०७

एकूण सहाशें एकुणऐंशी रुपये चारशें सात प्राजापत्यांचे, त्यां[illegible]दिक, व अग्निहोत्री व श्रौती, व पंडित, व तपस्वी असतील त्यांस दोन प्राजापत्यें दर दोन रुपयांचीं द्यावीं, व सामान्य वैदिकास एक प्राजापत्य दर दोन

---

and had previously committed adultery with a mahàr. The Màmlatdár and his family were therefore directed to undergo a penance costing Rs. 2,500 as Daxina and Rs. 500 as food-expenses. Penances were also prescribed for those who had dined with the Mámlatdár or had dealings with

रुपयांचें द्यावें व फिरकोळ भिक्षुकांस एकेक प्राजापत्य दर १ रुपयाचे दराचें द्यावें.

२०० पूर्वोत्तरांग.

५०१ ब्राह्मणभोजन असामी १६०० रुपये.

१३८०

२८० क्षेत्र नाशीक येथें प्राजापत्यें ७० दर ४ चार याचीं पाठवावीं. तीं वैदिक, व अग्निहोत्री, व श्रौती, व पंडित, व अध्यापक, व तपस्वी असतील त्यांस एक एक प्राजापत्य द्यावें; अग्निहोत्रें ज्यांचीं सिद्ध असतील त्यांस दोन दोन प्राजापत्यें द्यावीं.

१२० क्षेत्र पुणतांबें येथें प्राजापत्यें ३० तीस दर ४ प्रमाणें पाठवावीं. तीं वैदिक, अग्निहोत्री, व श्रौती, व पंडित, व अध्यापक असतील त्यांस एक एक प्राजापत्य द्यावें.

१२२० पुणीयांत वैदिक उत्तम, व श्रौती, व पंडित, व तपस्वी यांस योग्यतेनुरूप वाटावयासी आणावीं प्राजापत्यें ३०५ दर ४ प्रमाणें. रुपये.

३०००

याप्रमाणें प्रायश्चित्तांचा आकार करून जुन्नरांत, व क्षेत्र नाशीक, व पुण्यस्तंभ, व पुणें येथील ब्राह्मणांस वांटावयाचीं, व ब्राह्मणभोजन व पूर्वांग उत्तरांग करावयाची नेमणूक करून दिल्ही आहे, याप्रमाणें करणें; व तुमचे पंक्तीस जेवणार व संसर्गी वगैरे यांस प्रायश्चित्त द्यावयाची व्यवस्था व ग्र(गृ)ह शुद्धतेचीं. कलमें.

तुमचे अनुपनीत पुत्रांस पंचगव्य प्राशन करवणें. कलम १.

मांससंसर्गीयांस प्राजापत्यद्वय व पंचगव्य प्राशन. प्राजापत्य प्रत्याम्नाय दर प्राजापतीं व्याहृती होम दोन सहस्र अथवा दर प्राजापतीं एक रुपयाप्रमाणें दर असामीनें दोन दोन रुपये प्रमाणें द्यावे. कलम १.

एक दोन वेळ पंक्तीस भोजन घडलें असेल, त्यांस उपोषण ब्रह्मकूर्च विधि करून पंचगव्य प्राशन करावें. कलम १.

गृहांतून वस्त्रपात्र धान्यादिक बाहेर काढून ग्र(गृ)हभूमीचें खनन दहन करून संमार्जन करून गायीचें परिभ्रमणादिक करून प्रायश्चित्तोक्त ब्राह्मणभोजन करावें. कलम १.

---

him. The floor of the house was to be dug up and purified by a cow trampling it. The pots were to be purified by being put into the fire. The wooden-seats & the wooden-doors were to be scraped.

मांसादि संसर्गी यांस दोन प्राजापत्यें, व पंचगव्य प्राशन. प्राजापत्य प्रत्याम्नाय. व्याहृती होम एक हजार प्रमाणें दोन सहस्र अथवा द्रव्य दर एक रुपया प्रमाणें दर असामीनें दोन रुपये प्रमाणें द्यावें. कलम १.

निरंतर पंक्तीस भोजन करणार तुमचा भाचा व आणखी पांच असामी एकूण सहा असामी यांस दर असामीस प्राजापत्यें ९० नव्वद, प्रत्याम्नाय होम दर एक हजार प्रमाणें दर असामीनें ९०००० नव्वद हजार करावा, अगर श्रीत्रिंबकेश्वरीं ब्रह्मगिरीच्या प्रदक्षिणा ३६ छत्तीस कराव्या, अथवा दर असामीस प्राजापती एक रुपया प्रमाणें नव्वद रुपये. कलम १.

घरांतील मृत्तिकाभांडीं असतील तीं त्यागावीं, व पाकसंमंधीं लांकडाचीं पात्रें असतील तीं टाकावीं, व पाट असतील ते तासून घ्यावे. चौकटी, कवाडें, खांब सरवडून धुवावे. कलम १.

तांब्याचीं व पितळेचीं भांडीं वगैरे धातूचीं भांडीं असतील तीं ताऊन घ्यावीं. कथलाचीं असतील तीं आटवावीं. कलम १.

सर्व वस्तुमात्रांवर पंचगव्य प्रोक्षण करावें, व घरच्या देवांची अर्चा शुद्धी करावी. कलम १.

याप्रमाणें करावयाचा निश्चय करून समस्त ब्राह्मण कसबे जुन्नर यांस अलाहिदा पत्र लिहिलें आहे, तरी ते सांगतील त्याप्रमाणें वर्तणूक करून प्रायश्चित्त घेऊन शुद्ध होणें म्हणोन. पत्र १.

समस्त ब्राह्मण, वास्तव्य कसबे जुन्नर, यांस कीं, सदरहू लिहिल्यान्वयें करून प्रायश्चित्त करवावें म्हणोन. पत्र १.

चिटणिसी.

इसने समानीन मया व अलफ सफर ६

११२६ ( ७४१ )—वेदमूर्ति मुकुंद दीक्षित पुजारी क्षेत्र श्री सप्तशृंग यांणीं हुजूर विदित केलें कीं, मौजे चंडकापूर, परगणे वणी, हा गांव श्रीदेवीचे पूजेस सरकारांतून आहे, त्याचें उत्पन्न आनंदा गुरव श्रीचे पुजेस न लावतां मध्येंच खातो, त्याजपासून मागील हिशेब घेऊन देवीचे पूजेची नेमणूक पेशजीं सरकारांतून केली आहे, त्याप्रमाणें चालविली पाहिजे म्हणोन; त्याजवरून श्रीचे पूजेस मौजे मजकूर सरकारांतून आहे, त्याचें उत्पन्न आनंदा गुरव श्रीचे

A. D. 1781-82.

(1126) It was represented that the Gurava (worshipper) of the goddess at Saptashringa had misappropriated the proceeds of the *inām* village assigned for the expenses of the goddess. The officer of Dhodap was directed to inquire into the matter,

पूजेस न लावतां मध्येंच खातो त्याची चौकशी तुह्मीं करून, गुरवाकडे ऐवज निघेल तो त्याजपासून घेऊन सरकारांत समजावणें. आज्ञा होईल त्याप्रमाणें करणें. पुढें गांवचा ऐवज श्रीचे पूजेकडे नेमून देऊन श्रीची पूजा यथास्थित चालवणें. श्रीचे पूजेची नेमणूक कसकशी करून ध्याल तीही सरकारांत समजावणें. श्री देवीची वस्तभाव आज तागाईत शिलकेस गुरवाकडे किती आहे, तो झाडा काढून यादी श्रीचे जामदारखान्यांत ठेवणें, आणि सरकारांत समजावणें. ह्मणजे वस्तभावेचा बंदोबस्त पूर्वील चालीप्रमाणें करून दिल्हा जाईल ह्मणोन, बाजीराव आपाजी तालुके धोडप यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

११२७ ( २८ )—समस्त ब्राह्मण क्षेत्र वाई यांचे नांवें पत्र कीं, नीळकंठ नाईक रास्ते रोजगाराकरितां उठोन कर्नाटक प्रांतीं गेले, त्यास चौदा वर्षें जालीं. तिकडून आरकाटांत जाऊन राहिले, तेथें इंग्रजांची व हैदरखान यांची लढाई जाली, तेव्हां हैदरखान यांणीं या संबंदांत धरून नेऊन अटकेंत ठेविले. तेथेंही बहुत काल होते, ते सुटून प्रस्तुत वाईंत घरास आले आहेत, त्यास हे पूर्वीं गांवीं होते तेव्हां यांचें आचरण अगर यांचा स्नानसंधेचे जागां विश्वास कसा हें सर्वांस दखलच आहे. त्यांत बहुत काल यवनी राज्यांत व यवनांचे अटकेंत घालविला, तेव्हां तेथें स्नानसंध्या अगर आचरण घडावयाचें काय आहे, यास्तव यांस षडब्द प्रायश्चित्त नेमून तपशीलवार यादी अलाहिदा पाठविली आहे, त्याप्रमाणें प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून पंक्तिपावन करावें ह्मणोन चिटणिसी. पत्र १.

इसने समानीन मया व अलफ रबिलाखर १७

११२८ ( ८०२ )—वेदमूर्ति राजश्री अनंत ऋषी ब्रह्मचारी नारदसांप्रदायी पैठणकर

to recover from the Gurava the amount that he might be unable to account for and to report the result to Govt. He was further directed to make due arrangements for the expenses in connection with the idol and to send in a list of the ornaments belonging to the idol.

( 1127 ) Nilkanth Náik Ráste was for a long time in the Karnátik and Arcot and was afterwards taken prisoner by Haider Naik in the war between him and the English. He now returned to Wái. Having stayed for a long time under a Mahomedan Govt. and in a Mahomedan prison, it could not be expected that Nilkanth had regularly performed the religious observances enjoined on a Brahmin Having regard to his previous religious conduct, a penance was prescribed and the Brahmins of Wái were directed to administer it and purify the man.

A.D.1781-82.

( 1128 ) The people of the Mánbháv sect used to make converts from the Hindu religion. They got them shaved, both men and women, and induced them to discard thei

A. D. 1782-83.

सलास समानीन मया व अलफ रजब ३

यांणीं हुजूर विदित केलें कीं, सर्व प्रांतांतील मानभाव एकमतें मिळोन सांप्रत गैररीतीनें वर्तों लागले, चौहूं वर्णांत अबुद्धिजनांस वश्य करून आपले मतांत वर्तवितात, पुरुष व स्त्री यांचीं मुंडणें करून आपले वेश धरवितात, व शिष्य होतात त्यांजकडून त्यांचीं प्राचीन कुलदैवतें त्यागऊन खापऱ्या पुजवितात, व वाकी व मिरजगांव व पंचालेश्वर वगैरे जागां कोठें कोठें शिवालयें प्राचीन आहेत तीं अवरोधून देवला उच्छेद करून आपले वोटे घातले, इत्यादिक भ्रष्टाचार करूं लागले; त्याजवरून गुदस्तां पैठणास दसनाम गोसावी व मानभाव कजीया सांगत आले. मानभावाचें बोलणें कीं, आपण षड् दर्शनांत आहों. न्यायशास्त्र व मुंडी दर्शन आमचें आहे, ऐसें कितेक प्रकारें अमर्याद बोलों लागले; त्याजवरून समस्त क्षेत्रस्थ ब्राह्मण व अधिकारी व जमीदार वगैरे सर्व ग्रामस्त मिळोन शास्त्रान्वयें विचार करून निर्णय केला कीं, मानभाव अतिनिंद्य, सर्व धर्म बहिष्कृत, षड्दर्शनांत नाहींत, शास्त्रविरुद्ध अविधि मुंडित, ऐसे असतां आपले मताच्या नानाप्रकारें नवीन चाली पाडून चौहूं वर्णांमध्यें अबुद्धि जनांस आपले मतांत मेळऊन भ्रष्टाचार करवितात; मानभावाचा उपदेश कोणतेही निकृष्ट जातीमध्यें देखील घेणें योग्य नाहीं; यांचे मतांत जे अनुसरले असतील त्यांस राजदंड व ज्ञातीदंडपूर्वक प्रायश्चित्त जाहल्याविना त्याचे घरीं ब्राह्मणांनीं जाऊं नये, ऐसें ठराविलें; त्याजवरून मानभाव यांणीं गोसावी यासी खोटपत्र लिहून दिल्हें कीं, याउपरी आपलें मत कोणास शिकवणार नाहीं; व आपण षड्दर्शनांत नाहीं. आपले मर्यादेनें राहूं. अतःपर अमर्यादा वर्तों तरी दिवाणचे व षड्दर्शनाचे गुन्हेगार, ऐसें लिहून दिल्यावर मानभाव औरंगाबादेस जाऊन तेथें गैरवाका समजाऊन सुभ्याचें पत्र पैठणचे कमाविसदारास नेऊन खोटपत्र गोसावीयासी लेहून दिल्हें तें बलात्कारें माघारें घेतलें, आणि पुढें अमर्यादा वर्तों लागले. येविशीं त्यांस शिक्षा असावी, यास्तव करवीरवासी श्रीशंकराचार्य स्वामी यांस व क्षेत्रोक्षेत्रींचे समस्त ब्राह्मण यांस आपण विनंती करून त्यांचीं पत्रें आणिलीं आहेत, तीं मनास आणून आज्ञा जाहाली पाहिजे. म्हणोन विदित करून शंकराचार्य स्वामींचें पत्र

---

family gods and to worship pieces of burnt clay. They also desecrated some old Shiva temples and constructed raised grounds or platforms on the sites. Dasnám Gosávi therefore laid a complaint against the Mánbhávs at Paiṭhaṇ. The latter alleged that they were within the pale of the Hindu riligion, (*lit.* were referred to in the *Shad-darshan*) and that *Nyáya shástra* ( logic ) and *munḍidarshan* belonged to their sect. The officers and the jamidárs of Paiṭhaṇ, as also the Brahmins of the place met together and decided that the Mánbháv sect was not recognized by the Hindu religion, that its followers were detestable in every way and that it was improper on their part to convert to their faith a Hindu, even of the lowest caste. The Mánbhávs then acknow-

व क्षेत्रोक्षेत्रींचीं पत्रें आणून दाखविलीं, ऐसीयास पैठणास समस्त क्षेत्रस्त ब्राह्मण व अधिकारी वगैरे यांणीं शास्त्रान्वयें मनास आणिलें, तेथें मानभाव खोटे होऊन गोसावीयासीं खोटपत्र लिहून दिल्हें असतां औरंगाबादेचे सुभ्यास गैरवाका समजाऊन त्याचें पत्र पैठणचे कमावीसदारास आणून सदरहू खोटपत्र माघारें घेतलें हे बेकैदी केली. याजकरितां शंकराचार्य स्वामींचें पत्र व क्षेत्रोक्षेत्रींचीं पत्रें आलीं त्यांत मजकूर, मानभाव अति निंद्य, सर्व धर्मबहिष्कृत, चातुर्वर्णापासून निकृष्ट जातीपर्यंत कोणत्याही जातींत नाहींत, व षड्दर्शनांत नाहींत, अविधि मुंडित, नीलांबर, ऐसे यांचा उपदेश कोणत्याही जातीनें घेऊं नये, घेतला असेल त्यास बहिष्कार, व त्याचे घरीं ब्राह्मण लग्नमुहूर्तादिक कोणत्याही कार्यास जाईल त्यास बहिष्कार, या अन्वयें आहेत. त्याजवरून मानभावाचे उपदेशिक जे जाहाले असतील त्यांस बहिष्कार घालणें, पुढें राजदंड व ज्ञातीदंडपूर्वक प्रायश्चित्त जाहल्याविना त्यांचे घरीं ब्राह्मणांनीं जाऊं नये, येविशीं ताकीद करणें, व जागां जागां प्राचीन देवालयें उच्छिन्न करून आपले वोटे घातले असल्यास ते पाडणें, व त्यांचें पारिपत्य करून मानभाव आपले मर्यादेनें वर्तणूक करीत, फिरोन लवाडी करून कोणास उपदेश करूं न पावत, ऐसा पक्का बंदोबस्त करणें, आणि येथापूर्ववत् दैवतें स्थापून मानभावांपासून गुन्हेगारी घेणें, येविशीं पत्रें.

१९ मानभावांपासून गुन्हेगारी घेऊन सरकारहिशेबीं जमा करणें, म्हणून. पत्रें.

१ सरसुभा, निसबत सर्वोत्तम शंकर महाल बीतपशील.

१ परगणे वण दिंडोरी.
१ प्रांत बागलाण.
१ परगणे पिंपळनेर.
१ परगणे कान्हापूर.
१ परगणे कुंमारी.
१ परगणे खांडवें.
१ परगणे सिन्नर.
१ परगणे सांडस, व चोपाळें.

---

ledged their defeat and agreed in writing to abstain from propogating their creed on pain of punishment by the caste as well as by Government. They however subsequently went to Aurangábád and with the aid of the Subhá, took back their written agreement by force. Anant Rishi Brahmachári therefore procured the opinions of Shri Shankarácharya of Karvir and of the Brahmins of holy places and referred the matter to the Peshwá. The decision of the Paithan Brahmins was confirmed and fines were ordered to be levied from the Mánbhávs.

१ सरकार हांडे.
१ तालुके मुल्हेर.
१ तालुके घोडप.
१ तालुके पटा.
१ परगणे दहीवलें.
१ तालुके कावनई.
१ तर्फ देपूर.
१ परगणे वारसें उमरपाटें.

१६

१ सरसुभा प्रांत गंगथडी, निसबत नरसिंगराव बल्लाळ, महाल बी-तपशील.

१ परगणे संगमनेर.
१ तर्फ राहूरी.
१ परगणे पाटोदें.
१ परगणे आकोलें.
१ तर्फ बेलापूर.
१ परगणे धांधरफळ.
१ जागीर किल्ले माहूली.
१ परगणे बारागांव नांदूर.
१ परगणे वामोरी.
१ कसबे मुखेड.
१ कसबे राहातें.
१ परगणे मजकूर वगैरे.

१२

१ प्रांत जुन्नर, निसबत रामराव त्रिंबक.
१ प्रांत खानदेश, निसबत नारो कृष्ण.
१ तर्फ हवेली संगमनेर निसबत त्रिंबक कृष्ण, व जावजी हरी.
१ परगणे कर्डे रांजणगांव, निसबत बाबूराव माणकेश्वर.
१ तालुके नगर, निसबत विठ्ठल नारायण.
१ परगणे पारनेर, निसबत महादाजी नारायण.
१ परगणे इंदापूर, निसबत गणपतराव जिवाजी.

१ किल्ले सिंहीगड, निसबत नारो महादेव, यांस, तर्फ कर्यातमावळाविशीं.
१ बाबती प्रांत बाळाघाट, निसबत महिपतराव प्रल्हाद.
१ तालुके त्रिंबक, निसबत धोंडो महादेव.
१ परगणे नाशिक, निसबत पांडुरंग धोंडाजी.
१ प्रांत वाई, निसबत भवानीशंकर हैबतराव.
१ प्रांत कराड, निसबत श्रीनिवास शामराव.
१ कृष्णराव अनंत यांस तर्फ सातारा वगैरे येविशीं.
१ रामचंद्र नारायण यांस कीं, प्रांत पुणें व परगणे नेवासें वगैरे महाल येथील चौकशी करून पुण्याचे हिशेबीं जमा करणें म्हणोन.
२ वाकी व मिरजगांव व पंचाळेश्वर, व मढपिंपरी वगैरे जागांजागांचीं दैवतें उच्छिन्न करून आपले वोटे घातले आहेत ते काढून टाकणें येविशीं सदरहूप्रमाणें पत्रें.
    १ चिंतामणराव पांडुरंग.
    १ महादाजी शिंदे.

१९ (१७).

६ मानभावांपासून गुन्हेगारी घेऊन हुजूर पाठऊन देणें म्हणोन. पत्रें.

२ वाकी व मिरजगांव व पंचाळेश्वर व मढपिंपरी वगैरे जागांजागांचीं दैवतें उच्छिन्न करून आपले वोटे घातले आहेत, ते काढून टाकणें; आणि येथापूर्ववत् दैवतें स्थापणें येविशीं सदरहूप्रमाणें. पत्रें.
    १ आनंदराव भिकाजी.
    १ तुकोजी होळकर.

२.

१ आपाजीराव पाटणकर.
१ महादाजी नीळकंठ.
१ पांडुरंग बाबूराव.

१ सगुणाबाई निंबाळकर.

६

१ अनंतरावजी ब्रह्मचारी नारदसांप्रदायी, वास्तव्य क्षेत्र पैठण, यांस कीं, जागांजागांचे संस्थानी यांस व सरदारांस व महालोमहालींचे कमावीसदारांस वगैरे यांस पत्रें देऊन मानभाव यांणीं गैररहा चालों नये, व त्यांचे मतांत जे अनुसरले असतील त्यांणीं मानभावाचा पंथ सोडून आपलाले जातींचे स्वधर्मानें वर्तावें, याप्रमाणें बंदोबस्त करविला आहे; व औरंगाबादेचे सुभ्याचें पत्र पैठणचे कमावीसदारास देविलें आहे तें तुह्मीं पैठणास नेऊन तेथें मानभावांपासून खोटपत्र पुन्हां घेऊन, त्यांचे मतांत जे अनुसरले आहेत त्यांचा बंदोबस्त शंकराचार्य स्वामींचे, व क्षेत्रोक्षेत्रींचें पत्रांअन्वयें तुह्मीं मानभावांचें पारिपत्य करून व त्यांचे शिष्यांस बहिष्कार घालून तो पंथ सोडून आपलाले जातीचे स्वधर्मानें वर्तवावें म्हणोन. पत्र.

१ समस्त मानभाव महालानिहाय यांस कीं, तुह्मीं पैठणास खोटे होऊन गोसावी यांस खोटपत्र लिहून दिल्हें असतां, औरंगाबादेचे सुभ्यास गैरवाका समजाऊन खोटपत्र दसनाम गोसावी यांजपासून घेतलें आहे, तें माघारें अनंत ऋषी यांचे विद्यमानें गोसावी यांस देऊन आपले पायरीनें राहणें. या उपरीं चातुर्वर्णापासून इतर निकृष्ट जातीपर्यंत कोणासही उपदेश केल्यास पारपत्य केलें जाईल म्हणून. पत्र.

१ दलेलगिरी व उमेदपुरी व लवंगपुरी व चैनपुरी व मोनी महंत व नारायणगिरी प्रमुख पैठणकर, व मुनेंद्रपुरी व निर्वाणभारथी व मनोहरगिरी व रेवागिरी व सिद्धपुरी दौलताबादकर, व कामेश्वर भारथी माहुरकर, व समस्त सातारकर, व समस्त सौंदतीकर, व देशनिवासी व संस्थानिक गोसावी यांचे नांवें पत्र कीं, मानभाव यांणीं खोटपत्र तुम्हांस दिलें असतां औरंगाबादेस गैरवाका समजाऊन पत्र माघारें घेतलें आहे, तें तुमचें तुम्हांस देविलें असे; येविशीं औरंगाबादेचे सुभ्यास सरकारचें पत्र आहे, तरी खोटपत्र माघारें देवितील. या उपरीं मानभाव लबाडी करून अमर्यादा वर्तणार नाहींत. कदाचित् अमर्यादा वर्तले

तरी तुह्मीं अनंत ऋषीचे विद्यमानें सरकारांत समजावणें. पारपत्य केलें जाईल म्हणोन. पत्र.

२८

अठ्ठावीस पत्रें चिटणिसी दिल्हीं असेत.

## हरी बल्लाळ यांच्या कीर्दीपैकीं.

११२९ ( ८४१ )—श्री पांडुरंग क्षेत्र पंढरपूर येथें श्रीच्या देवालयांत मर्यादा येणेंप्रमाणें कलम. बीतपशील.

अर्बा समानीन मया व अलफ जमादिलावल ५

श्रीदेवाचे दर्शनास येतात त्यांणीं त्यांणीं देवास भेटों नये. पूजनें करून सिंहासनावर मस्तक ठेऊन नमस्कार मात्र करावा. कलम १.

देवापुढील तृतीय मंडपांत दक्षणेकडे द्वार आहे. परंतु यात्रेचे दाटीमुळें अंधःकार पडतो, त्यास उत्तरेकडे प्राचीन द्वार होतें तें बुजवोन, तेथें हणमंताची मुहूर्त [मूर्ति] ठेविली आहे ते काढून देवालयांत ठेऊन द्वार मोकळें करून, तेथें जाळी मातबार थोर भोकाची देवालयांत उजेड पडोन वाराही पुष्कळ येईल अशी नवी दगडाची करून लावावी. कलम १.

आषाढी कार्तिकेचे यात्रेंत दाटी बहुत माणसांची होते. एकाच द्वारानें जाण्या-गर्भागारापुढील दुसरे मंडपाचें द्वार आहे, तेथें बाहेरचे फरसापेक्षां उंबऱ्यांतील फरस नीच आहे, त्यास यात्रेचे दाटीमुळें अंधकार पडतो, याजमुळें बाहेरून आंत येणारास हिसका बसोन माणसें पडतात. यास्तव बाहेरील फरसाबरोबर आंतील फरस उंच, हिसका माणसास न बसे असा, करावा. कलम १.

देवाचे पुढील दुसऱ्या मंडपांत अंधःकार विशेष पडतो, याजमुळें यात्रेकराची वस्तभाव उचलोन नेतात, याजकरतां मंडपाचे वरील छतास हमचौरस अदगजाचें गवाक्षें पाडून, पर्जन्यकाळीं गवाक्षानें पावसाचें पाणी आंत न पडे असा बच्याव करून उजेड मंडपांत पडे असें करावें.

---

### FROM HARI BALLÁL'S DIARY.

( 1129 ) Certain regulations were framed for observance by persons going to the temple of Pándurang at Pandharpur, the principal of which were:—

A. D. 1783-84.

( 1 ) they should not embrace the idol;

( 2 ) the northern gate which was generally closed, should be opened in order to admit light and air;

येण्याचे दाटीमुळें माणसें दुखावतात, व मरतात. यास्तव यात्रेचे दिवसांत पूर्व द्वारानें दर्शनास जाणारानें जावें, देवदर्शन करून दक्षण द्वारानें बाहेर निघावें; पूर्व द्वारानें बाहेर जाऊं नये, दक्षण द्वारानें आंत जाऊं नये येणेंप्रमाणें. कलम १.

देवालयाचे बाहेर चोखामेळ्याचा दगड उत्तरेचे आंगें आहे, तेथें अतिशूद्र दर्शनास येतात. जागासंकोच गलीची आहे. तेथें जाणारां येणारांस स्पर्शास्पर्श होतो, हें ब्राह्मणांस विरुद्ध. यास्तव अतिशूद्रांनीं चोखामेळ्याचे दीपमाळेजवळ अथवा महार वाड्यांत स्थळ असेल तेथें पुजा करीत जावी. देवालयाजवळ अतिशूद्रांनीं येऊं नये. कोणी आला तरी पारिपत्य करावें. कलम १.

देवदर्शनास मातबर येतात त्यांजबरोबर यवन येतात ते प्राकारांत जातात, यांजमुळें अनाचार होतो तो अयोग्य. याजकरितां मुसलमानानें नामदेवाचे पायरीस स्पर्श करूं नये, व दुसऱ्याही प्रकारानें मुसलमान आंत जाऊं नये. कोणी गेला तर पारिपत्य करून गुन्हेगारी घ्यावी. येणेंप्रमाणें. कलम १.

येणेंप्रमाणें सात कलमें करार करून पाठविलीं आहेत, याप्रमाणें बंदोबस्त करावयास चिंतो रामचंद्र कमावीसदार क्षेत्र मजकूर, दिंमत परशराम रामचंद्र, यांस आज्ञा केली आहे, तरी सरकारचे खास बारदार पाठविले आहेत, त्यांचे गुजारतीनें सदरहू लिहिल्याप्रमाणें बंदोबस्त करणें ह्मणोन. जाबता १.

सदरहू अन्वयें कमावीसदार मजकूर यांस. सनद १.

२.

रसानगी यादी.

(3) at the Áshádhi and Kártiki fairs, when the crowd of pilgrims was very great, people should enter by the eastern and leave by the southern door:

(4) Mahárs should worship at the pillar erected in honor of Chokhá Meḷá or in the Mahár-wáḍá;

(5) no Musalman should enter the temple.

११३० ( ८५० )—तुम्हीं हुजूर विदित केलें कीं, आपला भ्रतार मृत्य पावला, आपण
खमस समानीन मया व अलफ साबान १६
दोघी स्त्रिया मिळोन तीन कन्या आहेत, पुत्रसंतान नाहीं, पुढें संतान चालोन आमचा कालक्षेप चालिला पाहिजे, त्यास आपले दादल्याचे जवळचे भाऊ रामजी, व मल्हारजी, व महादजी, व महादजी लाफणे याचा मूल घ्यावा, तरी त्यासी आह्मांशीं पडत नाहीं, याजमुळें यांचा मूल घ्यावयाचा नाहीं, सबब दुसरा भाऊ सदाशिव लाफणा पाटसकर याचा लेक निंबाजी यास दत्तपुत्र घेणार, येविशीं आह्मीं दोघी राजी होऊन जिवाजीस दत्तपुत्र घ्यावयाची आज्ञा करावी ह्मणोन; ऐशास विठोजी लाफणा याच्या तुह्मीं दोघी स्त्रिया, तुमचे पोटीं पुत्रसंतान नाहीं, तुमचा कालक्षेप चालिला पाहिजे, हें जाणून दत्तपुत्र घ्यावयाची आज्ञा करून हें पत्र सादर केलें असे, तरी जिवाजीस दत्तपुत्र घेऊन त्याचे हातून दुकान व वित्तविषय अनभऊन सुखरूप राहणें ह्मणोन, अहिल्या व मुक्ती शिंपी कोम विठोजी लाफणा शिंपी, वस्ती कसबे पुणें, यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

दत्तपुत्र घ्यावयाची आज्ञा करून सरकारची नजर दोन हजार रुपये करार केले यास हस्तेबंदी. रुपये.

१००० आषाढ शुद्ध १५
१००० श्रावण शुद्ध १५

२०००

दोन हजार रुपयांचा हवाला फिरंगोजी भुतकर याचा घेऊन पत्र दिल्हें असे.

११३१ ( ८५९ )—नारो महादेव व शिवाजी महादेव महाजन यांजकडे पूर्वीं तालुके
खमस समानीन मया व अलफ सवाल १९
वसई येथें श्रीविमल निर्मळ येथील देवालयाचा कारखाना होता, त्या बाबत तफावत सात हजार रुपये त्यांजकडे निघाली आहे, त्यास त्याचा शोध करितां ते मृत्य पावले, त्यांचे पुत्र कसबे नागोठणें, तालुके अवचितगड येथें राहतात, ह्मणोन हुजूर विदित जहालें; त्याजवरून त्यांचे घरीं चौकीस प्यादे हशमाकडील संभाजी केदार, व खुतुब वलद पीर महमद, दिंमत येशवंतराव वणजारे पाठविले असेत, तरी तुह्मीं त्यांचे पुत्रास धरून प्यादे यांचे हवालीं करणें. निकड करून सदरहू तफावतीचा ऐवज घेतील. तालुके मजकुरीं त्यांची असामी आहे, त्यास

---

(1130) A man of Poona, a tailor by caste, having died without
A. D. 1784-85.
any male issue, his two widows asked permission to adopt a son to carry on his business and to succeed to his property. The permission was granted on payment of a *nazar* of Rs. 2,000.

(1131) Nàro Mahádeo and Shiwáji Mahádeo were managers of
A. D. 1784-85.
the funds of the temple of Shri-Vimal Nirmaḷ in tálukà Bassein. Inquiry proved that they had misappropriated

सन अर्बा समानीन व सन खमस समानीन दुसाला वेतन पावलें आहे तें परिच्छिन्न माघारें घेऊन प्याद्याचे हवालीं करणें ह्मणोन, गणेश बल्लाळ व हरी गणेश यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

पुढें वेतन न देणें ह्मणोन पत्रांत लिहिलें असे.

११३२ ( ८९० )—रघुनाथ जोतिषी बिन त्रिंबक जोतिषी, व कृष्ण जोतिषी बिन दामोदर जोतिषी, मामले पाल पंचमहाल यांणीं हुजूर विदित केलें कीं, तर्फ कोरबरशें उर्फ पौडखोरें येथील जोतिष, उपाध्यपण, व धर्माधिकाऱ्याची वृत्ति पुरातन आमची आह्मांकडे चालत आहे, त्यांत महारांचीं लग्नें तर्फ मजकुरीं जोतिष्यांनीं लावण्याची चाल पुरातन नाहीं; व आजपर्यंत लाविलीं नसतां सन अर्बा समानीनांत आपाजी कृष्ण कमावीसदार, तर्फ मजकूर दिंमत आनंदराव भिकाजी, यांजकडे तर्फ मजकूरचे महार फिर्याद होऊन आपलीं लग्नें जोतिषी यांणीं लावावीं ते लावीत नाहींत ह्मणोन सांगितल्यावरून, पुर्ती चौकशी न करितां, पेशजीं रखमाजी वाकडे हवालदार कोरीगडास होते त्यांचे वेळेस किल्याचे चाकरमान्या महाराचें लग्न लावण्याचें होतें, ते समयीं लग्न लावणार मेव्हा महार हा हजर नव्हता, सबब किल्ले मजकूरचे हवालदार व सबनीस यांणीं आमचा बाप भाऊ विनायक जोतिषी दहा पंधरा वर्षांचा अज्ञान होता, त्याजवर निग्रह करून महाराचें लग्न लावविलें. त्यास अजमासें पंचावन वर्षें जाहलीं. तेवढ्याच दाखल्यावरून महारांचीं लग्नें जोतिषांनीं लावीत जावीं ह्मणोन कमावीसदारांनीं महारास भोगवटियास पत्र करून दिल्हें; त्याजवरून लग्न लावण्यास अतिशूद्र आह्मांजवळ ब्राह्मण मागों लागले तो न दिल्हा, याजकरितां कमावीसदारांनीं आह्मांस दहा रुपये मसाला करून महालीं नेऊन महारांचीं लग्नें करावयाविशीं निग्रह केला, त्यास अतिशूद्रांचें लग्नास आह्मीं मुहूर्त मात्र सांगत असतों, पूर्वापार लग्नें लाविलीं नसतां नवीन चाल होणार नाहीं, ऐसें आह्मीं उत्तर केलें. त्याचा कमावीसदारांनीं विषाद मानून पूर्वीं या प्रांतांत धनगर नव्हते, अलीकडे नवे वस्तीस आले आहेत त्यांचीं व इतर जात परदेशी व गुजराथी वगैरे नूतन येतील त्यांचींहीं लग्नें तुह्मीं लाऊं नयेत ह्मणोन कमावीसदारांनीं आक्षेप करून, जबरदस्ती करून आमचे वतनाची जप्ती करून, वृत्तीचे कामकाजास नवा गुमास्ता ठेविला आहे. येविशीं कमावीसदारांस ताकीद होऊन महारांस

सीत समानीन मया व अलफ साबान ६

---

Rs. 7,000 from the funds in their charge. They were now dead. The amount was ordered to be recovered from Nàro's son.

( **1132** ) The Joshis of Poudkhore in Mámle Pál Panchmahál, objected to officiate as priests at the marriages of Mahárs. The practice of other *mahàls* was ascertained, and it was found that marriages among Mahárs were ordinarily celebrated by the chief Mahárs. This practice had in the case of Junnar *mahàl* been

A. D. 1785-86.

मोगलाईमहारास पत्रें करून दिल्हीं आहेत, तीं माघारीं घेऊन आमच्या वृत्ती आह्मांकडे चालवावयाविशीं आज्ञा होऊन, जफ्तीमुळें वृत्तींचा ऐवज व मसाला महालीं घेतला आहे, तो माघारा देविला पाहिजे ह्मणोन; त्याजवरून येविशींची चौकशी करून दाखले मनास आणतां महारांचीं लग्नें जोतिष्यांनीं लावावयाची चाल फार करून नाहीं, कोठें कोठें लावीतही असतील, परंतु कोंकण प्रांतीं महारांचीं लग्नें जोतिषी लावीत नाहीं, त्यांचे जातीमध्यें मेढे महार आहेत तेच लावितात, याप्रमाणें तळकोंकणचे जमीदार व जोतिषी हुजूर आहेत त्यांणीं विदित केलें; व वेदमूर्ति रंग जोशी जुन्नरकर यांणींही लिहून दिल्हें कीं, शहर जुन्नर बरहुकूम पेठा सुद्धां व तर्फेचे गांव पाऊणशें व शिवनेर वगैरे किल्ले पांच या ठिकाणीं जोतिषपणाची वृत्ति परंपरागत आपली आहे, परंतु आपले वृत्तींत अतिशूद्रांचीं लग्नें आह्मीं लावीत नाहीं, अतिशूद्रांचे जातींत ढेगोमेगो आहेत तेच त्यांचीं लग्नें लावीत आले असतां, पूर्वीं एक वेळ किल्ल्याचे चाकरमाने व प्रांतांतील दोन चार हजारपर्यंत महार मिळोन गवगवा करोन जोतिष्यांनीं आपलीं लग्नें लावावीं ह्मणोन, आवरंगजेब पादशाहा याजवळ फिर्याद केली, तेव्हां त्यांणीं पुरातन चाल मनास आणून, जोतिषीयांणीं महारांचीं लग्नें लाऊं नयेत असा ठराव केला, त्याप्रमाणें हा कालवर चालतें. ह्मणोन याप्रमाणें दो प्रांतींचे दाखले गुजरलेल्याप्रमाणें तर्फ मजकुरींही जोतिष्यांनीं महारांचीं लग्नें लावावयाची चाल पुरातन नसतां, मागें कोरीगडचे हवालदारानें जोतिष्याचे मुलापासून बलात्कारें एक वेळ महाराचें लग्न लाविलें असल्यास तेव्हढ्याच दाखल्यावरून महारांचीं लग्नें जोतिष्यांनीं लावीत जावीं ह्मणोन तुह्मीं महारांस नवीं पत्रें करून देऊन जोतिषी यांजवर लग्नें लावावयाविशीं निग्रह करून त्यांजपासून मसाला घेऊन त्यांच्या वृत्ती जप्त केल्या, हें ठीक न केलें. मागें मोगलाई अमलांत ही पुरातन चाल मोडून नवें केलें नसतां स्वराज्यांत तुह्मीं आग्रह करून नवीन चाल करणें अनुचित. यास्तव तर्फ मजकुरीं महारांचीं लग्नें पुरातन जोतिषी लावीत नाहीं, त्याप्रमाणें पुढेंही लाऊं नयेत, याप्रमाणें ठराव करून हें पत्र तुह्मांस सादर केलें असे. तरी तुह्मीं महारांस नूतन पत्रें करून दिल्हीं असतील तीं माघारीं घेऊन जोतिषीयांजवळ देणें, आणि जोतिषी यांचें वतन जप्त केलें आहे तें मोकळें करून जप्तीमुळें ऐवज जमा जाहला असेल तो, व यांजपासून मसाला घेतला आहे तो माघारा देणें. अतिशूद्र खेरीज करून सर्व जातींचीं लग्नें पुरातन जोतिषी लावीत आल्याप्रमाणें लावितील. तुह्मीं नवीन आक्षेप न करणें. या पत्राची नकल घेऊन हें अस्सल पत्र दाखल्यास जोतिषी यांजवळ परतोन देणें ह्मणोन, आपाजी कृष्ण कमावीसदार, तर्फ पौडखोरें दिमत अनंदराव भिकाजी, यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

actually recognized by Emperor Aurangzeb on a former occasion. The objection of the Joshis was therefore held to be valid, and the Mahárs were informed accordingly.

सदरहूअन्वयें समस्त महार तर्फ कोरबारसें उर्फ पौडखोरें यांस आपाजी कृष्ण यांज-पासून पत्र करून घेतलें आहे, तें जोतिषी यांजवळ माघारां देणें. तुमचे जातीमध्यें मेढे महार लग्नें लावीत आल्याप्रमाणें लावितील. याउपरी जोतिषी यांशीं खटला केल्यास मुलाहिजा होणार नाहीं ह्मणोन. पत्र १.

२.

दोन पत्रें चिटणिसी दिलीं असेत.

११३३ ( )—निंबाजी कुळकर्णी मौजे शहरटाकळी परमणे नेवासें याणें पैठणचे तटांतील ब्राह्मणांशीं शरीरसंबंध करूं नये असें असतां महादेव लक्ष्मण पैठणकर याशीं शरीरसंबंध केला, त्याचे सं(व)सर्ग दोषाचें प्रायश्चित्त घेत नाहीं, ह्मणोन शंकराजी राम यांणीं विदित केलें, त्याजवरून हे सनद सादर केली असे, तरी कुळकर्णी मजकूर यासी कुटुंबसुद्धां पैठणास पाठऊन राजश्री चिमाजी नाईक भाकरे यांचे विद्यमानें संवसर्ग दोषाचें प्रायश्चित्त देवणें. प्रायश्चित्त घेऊन शुद्ध न होय, तरी त्याचे मौजे मजकूर येथील कुळकर्णाचे वतनाची जफ्ती करून वतन-संबंधें उत्पन्न होईल तें सरकारहिशेबीं जमा करणें; आणि कुळकर्णी मजकूर यास हुजूर पाठऊन देणें ह्मणोन, रामचंद्र नारायण यांस. सनद १.

सीत समानीन मया व अलफ सफर २६

रसामगी यादी.

११३४ ( ९१९ )—जमा जामदारखाना.

सीत समानीन मया व अलफ जमादिलावल ४

कमावीसभेट सौभाग्यवती रमाबाई यांसी, बाबत सौभाग्यवती कृष्णा-बाई रघुनाथ सदाशिव गद्रे यांची स्त्री सहगमन केलें ते समयीं प्रसाद पाठविला तो गुजारत केदारजी येवला खिजमतगार; स्नगें एकूण किंमत. रुपये.

१५ पातळ साधें १
३ चोळखण चोळी तयार १

१८

(1133) Nimbáji kulkarṇi of Tákḷi in parganá Newáse became connected by marriage with a family of an excommunicated Brahmin of Paiṭhaṇ. He refused to undergo any penance for what he had done. His watan was ordered to be attached, should he persist in his refusal.

A. D. 1785-86.

(1134) A present of clothes was sent to Ramábái, the Peshwá's wife, by Krishṇábái, wife of Raghunáth Sadáshiv Gadre, when the latter was going to be burnt on her husband's funeral pyre.

A. D. 1785-86.

११३५ ( ९२५ )—जमा जामदारखाना.

सीत समानीन मया व अलफ रजब १५

कमावीसभेट सौभाग्यवती रमाबाई यांसी, बाबत सगुणाबाई अंताजी मल्हार वाकनीस यांची स्त्री सहगमन गेली, सबब प्रसाद पाठविला तो, गुजारत केदारजी येवला खिजमतगार. सनगें एकूण किंमत. रुपये.

५ शालू साधा १

·।।।· चोळखण $\frac{1}{2}$

५।।।

११३६ ( ९३६ ) शामाचार्य वगैरे आठ असामी, पेशर्जी ब्राह्मण भ्रष्ट होऊन यवन

सबा समानीन मया व अलफ जिल्हेज १७

जाहला, त्याशीं अन्नव्यवहारादिक पैठणीं घडलें, त्याचा निश्चय शास्त्रमतें हुजूर होऊन सर्व क्षेत्रास वगैरे प्रायश्चित्त देऊन शुद्ध केलें, तें समयीं हे आठ असामी आग्रही, प्रायश्चित्त न घेत, सबब अपंक्त राहिले, त्यांपैकीं शामाचार्य श्रीविद्यारण्य भारथी स्वामी सन्निध क्षेत्र पैठण येथें येऊन प्रायश्चित्त घेतों ह्मणोन बोलून क्षौर केलें, पुढें यथाविधि प्रायश्चित्त ध्यावयाविशीं जामीन दिल्हा असतां बाहेर जाऊन औरंगाबाद येथील सुभ्यास गैरवाका समजावून स्वामींची अमर्यादा बहुत केली, ह्मणोन स्वामींचें पत्र आलें, व क्षेत्रस्थ ब्राह्मणांनीं हुजूर विदित केलें; त्याजवरून शामाचार्य याजकडे मौजे आनंदपूर व मौजे पंथेवाडी, परगणे पैठण, येथील मोकासा व जमीन इनाम आहे ते जफ्त करावयाचा करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी हरदूगांवचे मोकाशाचा अंमल व जमीन इनाम आहे ते जफ्त करून आकार होईल तो परगणें नेवासें येथील हिशेबीं जमा करीत जाणें, ह्मणोन, रामचंद्र नारायण यांस. सनद १.

सदरहूअन्वयें हरदूगांवचे मोकदम व जमीदार परगणे मजकूर, यांस सनदा व पत्र कीं, मशारनिल्हे यासी रुजू होऊन अंमल सुरळीत देणें ह्मणोन. ३.

२ मोकदमास सनदा.

१ मौजे आनंदपुरी.

---

( 1135 ) A present of clothes was sent to Lady Ramábái by Saguṇábái, wife of Antáji Malhár Wáknis, when the latter was going to be burnt on her husband's funeral pyre.

A. D. 1785-86.

( 1136 ) The Brahmins of Paiṭhaṇ having dined with a Brahmin who had been converted to Mahomedanism, penance was therefore administered to the whole community. Eight persons however, refused to undergo the penance. One of them, Shámácharya, agreed before Shri Vidyáraṇya Bhárathi Swámi to undergo the penance, and as a preliminary step had himself shaved. He subse-

A. D. 1786-87.

१ मौजे पंथेवाडी.

---

२

१ जमीदार परगणे मजकूर यांस चिटणिसी पत्र.

---

३ ४

एकूण तीन सनदा व एक पत्र दिल्हें असे. रसानगी याद.

११३७ ( ९६० ) मोकदम मौजे संवदगांव, परगणे खंडाळें यास सनद कीं, दिगंबर भयतारक जैनांचा गुरु मठ दिल्ली हा दक्षिण देशास फिरत येत होता. तो मौजे मजकुरीं राहिला. तेथें दरवडा येऊन चोरांनीं पालखी व तट्टू वगैरे दरोबस्त वस्तभाव नेली, त्याचे चौकशीस सरकारांतून विनायक गोपाळ कारकून शिलेदार पाठविले आहेत, यांस व बराबर खिजमतगार वगैरे दिल्हे आहेत त्यांस रोजमरा. रुपये.

समान समानीन मया व अलफ मोहरम १२.

५७ रोजमरा दुमाही. रुपये.

५० खुद्द विनायक गोपाळ यांस छ. १ सफरचा.

७ भिवजी जगताप खिजमतगार यास छ. १ जिल्हेजचा. रुपये.

---

५७

१३ जासूद जथे आणाजी नाईक यास रोजमरा दीड माही छ. १ मोहरमचा. रुपये.

६॥ शिदोजी कुऱ्हाडा.

६॥ मालजी वालूज.

---

१३

७०

quently changed his mind, and having secured the support of the subhá of Aurangábád, behaved disrespectfully to the Swàmi. His inám lands were therefore attached.

( 1137 ) Digamber Bhayatárak, the Jain priest of the monastery at Delhi while travelling in the southern country halted one day at Sawandgáum in parganà Khandáḷe. While there, his palanquin, his pony &c. were stolen. A kárkun was sent from the Huzur to investigate.

A. D. 1787-88.

एकूण सत्तर रुपये रोजमरा दुमाही दीडमाही सरकारजमेशिवाय देविला असे, तरी देणें, व पुढें दरवाडियाचे चौकशीस तेथें राहतील तोंपर्यंत सदरीलप्रमाणें रोजमरा तेरीख भरलियावर मौजे मजकूरचे ऐवजीं देत जाणें म्हणून. सनद १.

रसानगी यादी.

११३८ ( ९७५ )—जमा जामदारखाना.

तिसा समानीन मया व अलफ मोहरम ७ — कमावीसभेट सौभाग्यवती रमाबाई यांसी, बाबंत सौभाग्यवती मथुराबाई बाबूजी नाईक ओंकार यांची स्त्री सहगमन गेली, तें समयीं प्रसाद पाठविला, तो गुजारत जिवाजी काटकर खिजमतगार, सनगें

एकूण. रुपये.

| | |
|---|---|
| १० पातळ साधें केशरी रंगाचें | १ |
| ·।· चोळी केशरी शेल्याची | १ |
| १०। | २ |

११३९ ( ९८० )—जमा जामदारखाना.

तिसा समानीन मया व अलफ राबिलावल ७ — कमावीसभेट सौभाग्यवती रमाबाई यांसी, बाबत सौभाग्यवती अन्नपूर्णाबाई बाळाजी शंकर आंबेकर यांची स्त्री सहगमन गेली, ते समयीं प्रसाद पाठविला तो, गुजारत भिवजी संकपाळ खिजमतगार, सनगें

एकूण. रुपये.

| | |
|---|---|
| १० लुगडें. | १ |
| -।- चोळखण तपशिल्याचा. | १ |
| १०। | २ |

११४० ( ९८४ )—ताठे व थिटे व आराध्ये क्षेत्र पंढरपूर यांणीं हुजूर पुण्याचे

तिसा समानीन मया व अलफ जमादिलाखर २५ — मुक्कामीं येऊन विदित केलें कीं, क्षेत्र मजकूरच्या आपल्या वृत्ती विनदिकती चालत असतां, बडवे यांणीं नवीन वेणुनादीं विष्णुपदें पूजोन गयाविधि श्राद्धें करावयाची चाल पंचवीस तीस वर्षें पाडली.

---

( 1138 ) A present was sent to the Peshwá's wife by Mathurábái, wife of Bábuji Náik Onkar, at the time the latter was about to burn herself on her husband's pyre.
A. D. 1788-89.

( 1139 ) Presents were sent to the Peshwá's wife by Anpurnábái, wife of Báláji Shankar Ambekar, when she was preparing to burn herself on her husband's pyre.
A. D. 1788-89.

( 1140 ) It was brought to the notice of Government, that the

त्या दिवसापासून आमचे जोतिषसंबंधें मयाविधि श्राद्धीं आमंत्रण चालत असतां, अलीकडे आक्षेप करितात, व होळीची पोळी बहुत वर्षें सरकारांत जप्त असतां राडीचा खेळ चालत आहे, परंतु राडीचा मान आमचा, महारानें राड खणावी, ही चाल सुदामत असतां बडवेच खणूं लागले, आणि आधीं पूजा आम्हीं करूं, मग सर्वांनीं खेळावें, याप्रमाणें नव्या दिकती करितात, येविशीं मनास आणून आज्ञा करावी म्हणोन; त्याजवरून बडवे यांस हुजूर आणून मनास आणितां सदरहू दोन कलमांसंबंधें येणेंप्रमाणें हरदू वादी यांचेच लिहिल्यावरून ठरलें. कलमें बीतपशील.

विष्णुपदाची पूजा व गयाविधि श्राद्धें करावयाची चाल सुदामत नाहीं, पंचवीस तीस वर्षें नवीन करूं लागले, त्यास विष्णुपदपूजा व गयाविधि श्राद्धें श्रीगयास्थानींच व्हावीं, इतर स्थळीं करावयाची चाल ठीक नव्हे, शास्त्रास विरुद्ध, सबब विष्णुपदपूजा वेणुनादीं तेथें गयाश्राद्धें करितील व जे करवितील त्यांस ताकीद करून करूं न देणें. कोण्हीं केल्यास व करविल्यास दोघांपासून गुन्हेगारी घेणें. कलम १.

राडीचा खेळ, होळीची पोळी जप्त असतां चालत आहे, त्यास राडीची खाच महारानें खणावी ऐसी चाल सुदामत असतां अलीकडे बडवेच राड खणून आधीं पूजा करून मग सर्वांनीं खेळावें येविशीं दिकत पडली. ऐसीयास राड सुदामतप्रमाणें वतनदार महाराकडून खणऊन महाद्वारीं सर्वांनीं खेळ खेळावा. राडीची पूजा आग्रहानें कोण्हींच करूं नये. खेळांत हरएकविशीं आपला कायदा कोणी सांगूं लागेल त्याजपासून गुन्हेगारी घेणें. कलम १.

सदरहू दोन कलमें लिहिल्याप्रमाणें हरकूजणांस ताकीद करून करवणें, म्हणोन, चिंतो रामचंद्र कमावीसदार क्षेत्र मजकूर दिंमत परशराम रामचंद्र यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

११४१ ( ९८६ )—परगणे खटाव येथील काजी व मुलाण्याची कुतबा पढावयाविशीं

तिसा समानीन मया व अलफ साबान ४

कलागत होऊन मारामारी जाहली, मुलाण्याचा खून जाहला, सबब जिल्हेकडून मसाला होऊन काजी कराडास गेले, त्याजवर परगणे मजकूरचे काजीचे वतनाची जप्ती करून, मनास आणावयाची आज्ञा

---

A. D. 1788-89. Badwes of Pandharpur had newly introduced the practice of worshipping Vishṇupad at the place, and of performing certain Shráddhás, which according to the Shástrás were to be performed at Gayá. The practice was ordered to be discontinued, and fines to be levied from any one continuing the practice.

( 1141 ) A quarrel took place between the Kàzi and Mulàṇá of Khaṭáv in regard to preaching the Kutbá, in which the Muláṇá was killed. The Kázi's watan was therefore attached.

A. D. 1788-89.

तुह्मांस करून, काजी तीन असामी जिल्हेकडे कैदेंत आहेत, ते सदारतीकडील कारकुनांचे हवालीं करावे, ह्मणजे ते मनास आणितील, ह्मणोन राजश्री पंतप्रतिनिधी यांस सरकारांतून सनद पाठविली होती, त्यास हल्लीं जिल्हेकडेच जफ्ती असावी येविशीं राजश्री कृष्णराव नारायण यांणीं विनंती केली, त्याजवरून त्यांजकडे जिल्हेसच जफ्ती करून मनास आणावयास सांगितलें असे, तरी तुह्मीं जफ्ती उठवून कारकून व प्यादे पाठविले आहेत, ते माघारे आणणें ह्मणोन, तिमाराव भिकाजी यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

११४२ ( ९९० )—मौजे कात्रज तर्फ कर्यातमावळ, येथें गांवालगती महार व मांग व चांभार यांचीं घरें होतीं, तीं मोडून दुसरे ठिकाणीं घातलीं, तीं घरें बांधावयाबद्दल. रुपये.

तिसैन मया व अलफ रमजान १०

| | | |
|---|---|---|
| २०७ | महार असामी | २२ |
| १४ | मांग असामी | २ |
| ३० | चांभार असामी | २ |
| २५१ | | |

एकूण दोनशें एकावन रुपये देविले असेत, तरी शहर पुणें येथील नहराचे खर्चाबद्दल तुमचे तसलमातीस ऐवज खर्च पडला आहे त्यांपैकीं देणें ह्मणोन, रामचंद्र नारायण यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

मौजे कात्रज, तर्फ कर्यातमावळ, येथें गांवालगतीं महार व मांग व चांभार यांचीं घरें होतीं, तीं मोडून दुसरे ठिकाणीं घातलीं. तीं घरें बांधावयाबद्दल वासे सुमार ३०० तीनशें देविले असेत, तरी मौजे नांदेड येथील जाहालीचें बेट पैकीं महार वगैरे तोडून नेतील त्यांस नेऊं देणें ह्मणोन, जोत्याजी जाधवराव यांचे नांवें. सनद १.

रसानगी याद.

११४३ ( ९९६ )—जमा जामदारखाना.

तिसैन मया व अलफ जिल्काद २७

कमावीसभेट राजश्री राव यांस, बाबद अया(य्या)शास्त्री यांचे घरीं यज्ञ जाहला, सबब खासा स्वारी गेली. ते समयीं पोषाख दिल्हा तो, गुजारत जानोजी जाबक खिजमतगार सनगें एकूण, किंमत. रुपये.

---

( 1142 ) The houses of Mahàrs, Mángs and Chàmbhárs at Kátraj in tarf Karyát Máwal, being too near the village, were removed to another site. The expense of rebuilding the houses was given by Government, and timber was given free of cost for the purpose.

A. D. 1789-90.

( 1143 ) A sacrifice was performed by Ayyá Shástri. The Peshwá

३० तिवट गुलनार १
५० दुपटा गुलनार ½

८०

११४४ ( १०१० )—कसबे पेण परगणे साकर्से येथील समस्त ब्राह्मण हुजूर येऊन निवेदन केलें कीं, श्रीमंत कैलासवासी नारायणरावसाहेब यांचे कारकीर्दींत परभूंचे कर्माचरणाविशीं सरकारांतून ठराव करून दिल्हा, त्याप्रमाणें त्यांणीं वर्तावें, तें न करितां आपला धर्म सोडून मनस्वी वर्तणूक करून चोरून ब्रह्मकर्मे करितात, येविशीं त्यांस ताकीद होऊन बंदोबस्त जाहला पाहिजे म्हणोन; त्याजवरून मनास आणितां पेशजीं कैलासवासी तीर्थरूप रावसाहेब यांचे वेळेस चौकशी होऊन परभूंचे वर्तणुकेविशीं कलमांचा ठराव जाहला, त्याप्रमाणें त्यांणीं सरकारांत कतबा लिहून दिल्हा, त्यांतील कलमें, बीतपशील.

तिसैन मया व अलफ रमजान २०

१ वैदिक मंत्रेंकरून कांहींच कर्म करणार नाहीं.
१ वैदिक मंत्र जे येत असतील त्यांचा उच्चार करणार नाहीं.
१ भाताचे पिंड करणार नाहीं.
१ देवपूजादिक विहित कर्मे पुराणोक्त मंत्रेंकरूनच करूं. व ब्राह्मणभोजन आपले घरीं करणार नाहीं.
१ शालग्राम पूजा करणार नाहीं.
१ ज्या देवास शूद्र जातात त्या देवास आम्हीं जाऊं.
१ ब्राह्मणांस दंडवत मोठ्यानें म्हणत जाऊं, व आपले जातींतही दंडवतच म्हणत जाऊं.
१ वैदिक ब्राह्मण व आचारी व पाणक्ये व शागिर्द ब्राह्मण व ब्राह्मण बायका चाकरीस ठेवणार नाहीं, व आपले घरींही ठेवणार नाहीं.
१ आमचे जातीमध्यें आपले संतोषें पाट लावतील त्यांस आम्हीं अडथळा करणार नाहीं.

A. D. 1789-90. attended on the occasion and gave the Shástri a robe of honour.

**( 1144 )** An order was passed in the reign of Peshwá Náráyanráo regulating the religious conduct of Parbhus, and an agreement, binding them to the following terms was, at that time, taken from them:—

A. D. 1789-90.

येणेंप्रमाणें नव कलमें लिहून दिल्हीं असतां, परभू आपले घरीं चोरून ब्रह्मकर्में करतात, यामुळें पेणकर ब्राह्मणांचा व त्यांचा कजिया वाढोन परभूंचीं घरचीं सर्व कर्में बंद जाहालीं, त्यास येविशींचा हल्लींचा विचार करितां, परभूंचे कर्माचरणाविशीं पेशजीं चौकशी होऊन कर्में ठराऊन दिल्हीं आहेत त्याप्रमाणें त्यांणीं वर्तावें, तें न करितां आपला धर्म सोडून मनस्वी वर्तणूक करितात हें अनुचित, पेशजीं कर्में ठराऊन दिल्हीं आहेत तींच योग्य, असें शिष्टसंमतें ठरोन पुणियांत परभूंचीं घरें आहेत त्यांस हुजूर ताकीद करून पत्रें सादर केलीं असेत, तरी महालानिहाय येथें परभूंचीं घरें असतील त्यांस निक्षून ताकीद करून सदरहू कलमांप्रमाणें वर्तवीत जाणें. यांत जो कोणी अन्यथा वर्तेल त्याचें बरें वजेनें पारपत्य करून गुन्हेगारी घेत जाणें ह्मणोन चिटणिसी. पत्रें.

सदरहूअन्वयें समस्त ब्राह्मण व धर्माधिकारी उपाध्ये जोतिष्यांस पत्रें पारपत्य व गुन्हेगारी खेरीज करून, बाकी मजकूर वर लिहिल्याप्रमाणें. पत्रें.

यासी तपशील—

| | अजपत्रें. | मामलेदारांस | ब्राह्मणांस. |
|---|---|---|---|
| निसबत रामचंद्र नारायण. | ४ | १ | ३ |
| तालुके सुवर्णदुर्ग, निसबत मोरो बापूजी. | २ | १ | १ |
| तालुके विजयदुर्ग, निसबत गंगाधर गोविंद. | २ | १ | १ |
| तालुके रत्नागिरी, निसबत महिपतराव कृष्ण. | २ | १ | १ |
| तालुके अंजणवेल, निसबत त्रिंबक कृष्ण. | २ | १ | १ |
| तालुके रेवदंडा, निसबत महादाजी बल्लाळ. | २ | १ | १ |
| तालुके उंदेरी, निसबत जगदीश गणेश. | २ | १ | १ |
| तालुके अवचितगड व बीरवाडी, निसबत बाबूराव पासलकर. | २ | १ | १ |
| तालुके रायगड, निसबत सदाशिव रघुनाथ. | २ | १ | १ |
| प्रांत राजपुरी, निसबत चिमाजी माणकर. | २ | १ | १ |
| मामले कोहोज, निसबत पांडुरंग जिवाजी. | २ | १ | १ |
| किल्ले माहुली, निसबत भगवंतराव शिंदे देखील जहागीर | २ | १ | १ |
| परगणे साकसें, निसबत भास्कर लक्ष्मण. | २ | १ | १ |
| प्रांत कल्याण भिवंडी व तालुके नेरळ, निसबत सदाशिव केशव. | ३ | १ | २ |

(1) that they would perform no religious rite accompanied by a recital of Vedic hymns;

(2) that they would not use cooked rice in offering oblations to the dead;

| | | | |
|---|---|---|---|
| तुकोजी पवार व सदाशिव पवार सरंजामी यांजकडील महालानिहाय यांस. | २ | २ | १ |
| महालानिहाय, निसबत महादाजी निळकंठ पुरंदरे. | २ | १ | १ |
| महालानिहाय, निसबत मालोजी घोरपडे. | २ | १ | १ |
| महालानिहाय, निसबत खंडेराव त्रिंबक ओढेकर. | २ | १ | १ |
| महालानिहाय, निसबत रघुनाथराव बळवंत. | २ | १ | १ |
| महालानिहाय, निसबत पांडुरंग बाबूराव जोशी. | २ | १ | १ |
| परगणे सुपे, निसबत आनंदराव त्रिंबक. | २ | १ | १ |
| परगणे कंकणवाडी, निसबत नागो शामजी. | २ | १ | १ |
| महालानिहाय, निसबत राणोजी पवार विश्वासराव. | २ | १ | १ |
| किल्ले वंदन, निसबत विश्वासराव नारायण. | २ | १ | १ |
| महालानिहाय, निसबत परशराम रामचंद्र. | २ | १ | १ |
| प्रांत मिरज वगैरे महाल, निसबत चिंतामणराव पांडुरंग. | २ | १ | १ |
| तालुके घोडप, निसबत बाबूराव आपाजी. | २ | १ | १ |
| महालानिहाय, निसबत जयवंतराव रघुनाथ मंत्री. | २ | १ | १ |
| परगणे उमरखेड, निसबत बळवंतराव लक्ष्मण. | २ | १ | १ |
| तालुके झांशी, निसबत रघुनाथ हरी. | २ | १ | १ |
| प्रांत चऊल, निसबत राघोजी आंग्रे वजारतमहा सरखेल. | २ | १ | १ |
| तालुके अमदाबाद, निसबत महिपतराव भवानी. | २ | १ | १ |
| प्रांत खानदेश, निसबत नारो कृष्ण. | २ | १ | १ |
| गणेश हरी, दिंमत सरसुभा प्रांत गुजराथ. | २ | १ | १ |
| परगणे वाळूज वगैरे महाल, निसबत पांडुरंग बल्लाळ. | २ | १ | १ |
| प्रांत गंगथडी, निसबत मल्हारराव नरसी. | २ | १ | १ |
| परगणे गांडापूर वगैरे महाल, निसबत व्यंकटराव महादेव. | २ | १ | १ |
| परगणे शेवगांव, निसबत खंडेराव नरहर. | २ | १ | १ |
| क्षेत्र पंढरपूर, निसबत चिंतो रामचंद्र कमावीसदार दिंमत परशराम रामचंद्र. | २ | १ | १ |

(3) that in performing the daily observances such as worship &c. they would recite the hymns of Puráṇs only;

(4) that they would not feed any Brahmins at their houses;

(5) that they would not worship the Sháligrám deity;

(6) that they would visit only the temples frequented by Shudrás;

| | | | |
|---|---|---|---|
| तालुके त्रिंबक रतनगड, निसबत धोंडो महादेव. | २ | १ | १ |
| तालुके कावनई, निसबत गोपाळ बल्लाळ. | २ | १ | १ |
| किल्ले दातेगड, निसबत माधवराव रामचंद्र. | २ | १ | १ |
| किल्ले सातारा, निसबत बाबूराव कृष्ण. | २ | १ | १ |
| तालुके शिवनेर, निसबत बाळाजी महादेव. | २ | १ | १ |
| प्रांत बुंदेलखंड व कालपी वगैरे महाल, निसबत बाळाजी गोविंद. | २ | १ | १ |
| महालानिहाय, निसबत सिद्धेश्वर महिपतराव. | २ | १ | १ |
| निसबत महादाजी नारायण. | ३ | १ | २ |
| किल्ले सिंहीगड, निसबत केशवराव जगन्नाथ देखील कर्यातमावळ. | २ | १ | १ |
| परगणे कर्डे रांजणगांव, निसबत बाबूराव माणकेश्वर. | २ | १ | १ |
| तालुके मोल्हेर, निसबत रामचंद्र कृष्ण. | २ | १ | १ |
| तालुके वसई, निसबत गणपतराव जिवाजी. | २ | १ | १ |
| प्रांत जुन्नर, निसबत आनंदराव विश्वनाथ. | २ | १ | १ |
| महालानिहाय, निसबत महादजी शिंदे. | २ | १ | १ |
| तर्फ पौडखोरें व तालुके बागलकोट वगैरे महाल, निसबत आनंदराव भिकाजी रास्ते. | ३ | १ | २ |
| महालानिहाय, निसबत तुकोजी होळकर. | २ | १ | १ |
| किल्ले नांदगिरी व चंदनगड, निसबत रंगो शामराव. | २ | १ | १ |
| महालानिहाय, निसबत हैबतराव औळे धुरंधर समशेरबहादर. | २ | १ | १ |
| महालानिहाय, निसबत माधवराव कृष्ण. | २ | १ | १ |
| परशराम पंडित प्रतिनिधी. | २ | १ | १ |
| तालुके सरसगड उर्फ मामले पाल, निसबत गोविंदराव बाजी. | २ | १ | १ |
| महालानिहाय, निसबत खंडेराव दरेकर सरलष्कर. | २ | १ | १ |

(7) that they would salute Brahmins by calling out the word *dandavat* and would use the same word in saluting men of their own caste;

(8) that they would not employ or keep at their houses any Brahmin versed in the Vedás, any Brahmin cook or water bearer, or any Brahmin woman;

तुह्मांस तैनात सालीना पेशजीप्रमाणें.

रुपये.

५०० जातीस.

६६ अफ्तागीऱ्या.

५५ दिवट्या देखील तेल.

६२१

एकूण साहाशें एकवीस रुपये तैनात करार केली असे, तरी कोतवालीचे ऐवजीं घेणें, मजुरा पडतील. कलम १.

तुह्मांकडे पूर्वीं कोतवाली होती, ते वेळेचें फाजील तुमचें देणें निघालें तें आनंदराव काशी यांणीं तिहीं वर्षांत हप्त्यांनीं द्यावयाचा पेशजीं करार केला असतां झाडून ऐवजाचा निकाल कराराप्रमाणें करून दिल्हा नाहीं. दहा हजार रुपये अजमासें देणें राहिलें, सबब तुह्मांकडे कोतवालीची कमावीस सांगोन रसदेचा ऐवज सरकारांत ध्यावयाचा रुपये ५००० पांच हजार रुपये करार केले असेत, तरी छ. ९ मोहरमापासून एका महिन्यानें सदरील ऐवज सरकारांत पावता करून पावलियाचा जाब घेणें. कलम १.

अनंदराव काशी यांचे फाजील सरकारांत हिशेब होऊन ठरले त्याची निशा पेस्तर सालापासून तिहीं हप्त्यांनीं तिहीं सालांत झाडा तुह्मीं करून द्यावा याप्रमाणें निशा देणे. कलम १.

अनंदराव काशी यांचे फाजिलाचा ऐवज देविला आहे, हा व तुमचे फाजील आनंदराव काशीकडून गैरअदा होऊन देणें राहिले आहे तो ऐवज व हल्लीं रसदेचे पांच हजार रुपये ध्यावयाचे केले आहेत, एकूण एकंदर ऐवज कोतवालीवर तुमचा फिटेतों कोतवालीची घालमेल तुमची होणार नाहीं. कदाचित् घालमेल करणें जाहल्यास तुमचा ऐवज देणें त्यांत उत्पन्न मिना होऊन बाकीची निशा नव्याकडून घेतल्याखेरीज होणार नाहीं. कलम १.

पांडुरंग कृष्ण यांस सरकारांतून सरअमीनीं सांगितली असे, तरी कोतवालीसंबंधें कुल कारभार मशारनिल्हे यांचे इतल्याखेरीज करूं नये; ज कर्तव्य तें तुह्मी व सरअमीन उभयतां एकविचारें करीत जाणें. कलम १.

A. D. 1781-82. Anandrao Kāshi and given to Ghāshirām Sāwaḷdās. His salary was fixed at Rs. 500 besides Rs. 66 for an attendant to hold an *aftagir* and Rs. 55 for a torchbearer. The following instructions were issued to him:—

( 1 ) the clerks and peons employed at the kotwal's office should not be removed without the consent of Pāndurang Krishṇa, the Sar Amin who was appointed by Government;

( 2 ) two new police posts should be built in Nārāyaṇpeṭh and Shanwārpeṭh, as owing to the want of enough police posts, offences in those parts were not detected;

कोतवालीच्या चावड्यांचे वगैरे कोतवाली सबंधें ठेवणुकी कारकून व प्यादे यांची तहगीरी व बाहाली करणें ते पांडुरंग कृष्ण सरअमीन यांचे इतल्याशिवाय न करणें; मशारनिल्हे व तुह्मीं मिळोन करीत जाणें. कलम १.

दरकदाराचे हातें दरकाचें कामकाज घेत जाणें. कलम १.

कोतवालीचा अंमल सुदामत चालीप्रमाणें करणें. इमानें इतबारें वर्तत जाऊन रयत आबाद राखत जाणें गैर वाजबी परिछिन्न न करणें. कलम १.

पेठ नारायण, व पेठ शनवार या दोहों पेठांत कोतवालीची चावडी नाहीं, याजमुळें फंद फितुरी व हाली हरामी समजण्यांत येत नाहीं, याजकरितां दोहों पेठांत दोन चावड्या घालावयाचा करार केला असे, तरी निवारसी जागा पाहून दोन चावड्या घालणें, आणि हाली हरामीची पैदास्त होईल त्यापैकीं चावड्यांच्या खर्चाची नेमणूक होईल त्याप्रमाणें खर्च जाऊन बाकी रद्द कर्जी घेत जाणें. फंद फितुरी याची बातमी यथास्थित राखून सरकारांत समजावीत जाणें. कलम १.

कमाविसीचे कलम पांच हजार रुपये पावेतों होईल तें कोतवालीचे हिशेबीं जमेस धरून रद्द कर्जी घेणें. पाच हजारांवर जाहल्यास सरकारांत पोता भरणा करणें. कलम १.

महाल मजकूर शिबंदी प्यादे, बाजेलोकसुद्धां असामी ७८ अठ्याहत्तर यांस तैनात दरमहा रुपये ३१० तीनशें दहा रुपये अकरमाही पेशजींचे नेमणुकेबद्दल शिरस्तेप्रमाणें ठेवणें, व कारकून व खेरीज मुशाहिरा मागील त्रिंबक हरी याची व हल्लींची वहिवाट मजुरा पडत आली तें मनास आणून नेमणूक करून दिल्ही जाईल, त्याप्रमाणें खर्च करीत जाणें. जाजती करूं नये. कलम १.

शहरांतील रस्ते चांगले राखावे, पडवी, वोटे पुणें जळाल्यावर नवे परवानगीशिवाय जाले असतील ते मोडून टाकणे पुढें होऊं देऊं नये. कलम १.

कोतवालीचा मागील वहिवाटीचा हिशेब पाहून, व नव्या दोन चावड्या हल्लीं करावयाच्या सांगितल्या आहेत त्यासुद्धां सरकारांतून बेहडा करून देऊं, त्याप्रमाणें चालावें. कलम १.

(3) the duties of the office should be carried on honestly and in conformity with established practice: the rayats should be kept happy: improper conduct would not be tolerated;

(4) the roads should be kept in good order: no new verandas or sheds should be allowed: all verandas and sheds unauthorizedly constructed after the great fire at Poona city should be pulled down;

(5) information should be regularly collected in each peth regarding conspirators coming into the city, and should be communicated to Government from time to time;

शहरांत फंद फितुरी वगैरे येऊन राहतात, त्यांची चवकशी पेठां. पेठांतून कोतवालीचे कारकून वगैरे आहेत त्यांजकडून बारकाईनें बातमी राखीत जाऊन वरचेवर सरकारांत कळवीत जाणें.

कलम १.

पेठकरी अमलास खलेल करतील, त्यास सरकारांतून ताकीद केली जाईल.

कलम १.

शहरांत रात्रींची गस्त कोतवालीकडील फिरत्ये त्याजबराबर कारकून व प्यादे चौकस देत जाऊन रात्रींच्या गस्ती नेहमीं फिरऊन बंदोबस्त राखीत जाणें, व बारकाईनें चोरांचा पत्ता लाऊन चोर धरून आणून सरकारांत देत जाणें.

कलम १.

प्यादे बाजेलोकसुद्धां अठ्याहत्तर असामी नेमणुकी आहेत, त्यांजपासून चाकरी तुम्हीं व पांडुरंग कृष्ण सरअमीन उभयतां घेत जाणें. दरकदाराकडे निसबत माणूस एकंदर न देणें. कलम १.

कोतवालीचा हिशेब महिनेमहाल सरकारांत महिना गुदरताच पडलें पान तफावत न करितां देत जाणें. कलम १.

रसदेस व्याज एकोत्रा शिरस्तेप्रमाणें व फाजिलास सरकाराचे शिरस्तेप्रमाणें व्याज कोतवालीचे ऐवजीं मजुरा पडेल. कलम १.

गरती बायकांस शिनळकीची परवानगी देऊं नये. कलम १.

एकूण वीस कलमें करार करून कोतवालीचा अंमल छ. ९ मोहरमापासून सांगितला असे तरी सदरील लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें म्हणोन, घाशीराम सावळदास यांस.

सनद १.

रसानगी यादी.

११५९ (७५५)—सरकारांत नहराचें काम लाविलें आहे, त्याची पट्टी सर्वांप्रमाणें तुम्हांकडे पांच हजार रुपयांची करून सरकार खिजमतगार वसुलास पाठविले होते; त्याजवरून तुम्हीं सदाशिव नीळकंठ भावे यांजवर पुणियाची हुंडी पाठविली, ते रुपये ४००० चार हजार रुपये हुंडीप्रमाणें पोतेचाल सरकारांत जवाहीरखान्याकडे जमा झाले असेत म्हणोन, रघुनाथ हरि यांचे नांवें.

इसन्ने समानीन मया व अलफ जमादिलाखर ९

जाब १.

परवानगीरूबरू.

---

(6) efficient kárkuns and peons should be sent on patrol every night and thieves should be arrested and sent to Government;

(7) married women should not be given permission to become prostitutes;

(8) 78 peons at monthly cost of Rs. 310 were attached to the office.

(1159) Contributions were levied from the people for the con-

११६० ( ८१६ )—मौजे कात्रज, तर्फ हवेली, प्रांत पुणें येथील जमीन सरकारचे
अर्बा समानीन मया व अलफ साबान २९ — नळाचे कारखान्याखालीं, व तळ्याखालीं, व नहराखालीं पडली आहे. त्याचा आकार खेरीज गल्ला, व कडबा, व तूप वगैरे करून गांवचे चालीप्रमाणें मजुरा द्यावा म्हणोन, मौजे मजकूरचे गांवकरी यांणीं अर्ज केला; त्याजवरून गोपाळ वैजनाथ कारकून व रघोजी सोरटे नाईकवाडी दिंमत सुभा प्रांत मजकूर यास जमीनीचे चौकशीस पाठविले, त्यांणीं अडोसीपडोसीं शेतें होतीं त्यांचे रुक्याची चाल पाहून जमीन पडली ते. रुके.

·।।· थळ कचालमळ्याचे रुके.

८४।। गोडवीर थळपैकीं रुके. ३ व अवळीथळपैकीं रुके ८१।। एकूण रुके.

---

·।।४।।

एकूण साडेअठ्ठावीस रुके जमीन नळाचे कारखान्याखालीं, व तळ्याखालीं, व नहराखालीं पडली आहे, त्याचा आकार खेरीज गल्ला, व कडबा, व तूप वगैरे करून दर सजगाणीस नक्त रुपये ४० प्रमाणें रुपये १९० एकशें नव्वद जहाले, ते गांवास सन इसन्ने समानीनापासून मजुरा द्यावयाचे करार करून हे सनद तुम्हांस सादर केली असे, तरी सदरहूप्रमाणें एकशें नव्वद रुपये नहराकडे खर्च लिहून गांवास दरसाल मजुरा देत जाणें म्हणोन, नारो महादेव किल्ले सिंहगड यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

११६१ ( ९१० )—बापूजी आनंदराव कमावीसदार कसबे पुणें यांचे नांवें सनद कीं,
सीत समानीन मया व अलफ सफर ४ — राजश्री आनंदराव भिकाजी रास्ते यांणीं नवी पेठ वसवावयाकरितां जागा देविली पाहिजे म्हणून विनंति केली; त्याजवरून मशारनिल्हे यांस पेठ वसवावयास जमीन. बिघे.

८७।।१ मोरो बल्लाळ जोशी यांजकडे दहा बिघे जमीन चालत होती ते हल्लीं मोजणीमुळें भरली ते.

८२।। कबीर फकीर यांजकडे जमीन आहे त्यापैकीं.

---

A. D. 1781-82. construction of an aqueduct at Poona: the sum to be paid by Sadáshiv Nilkanth Bhàve was Rs. 5,000.

( 1160 ) Land measuring 28½ *rukas* at Kátraj having been taken up for the tank, pipes, and the works connected therewith, its assessment viz. Rs. 190 was ordered to be remitted.
A. D. 1783-84.

( 1161 ) Land measuring 24¾ bighás and 1 pand was given to Anandrao Bhikáji Ráste to found a *peth*.
A. D. 1785-86.

८१०॥। त्रिंबक महिपतराव चिटणीस यांजकडे सोळा बिघे जमीन चालत होती ते हाल्लीं मोजणीमुळें भरली ते.

८४ सटवाजी पारखी याचे थळपैकीं.

८२४॥।१

एकुण पावणे पंचवीस बिघे एक पांड जमीन नेमून देविली असे, तरी सदरहूप्रमाणें जागा मशारनिल्हेचे हवालीं करणें ह्मणून. सनद १.

११६२ ( ९१६ )–जीवनराम घाशीराम यांचे नांवें सनद कीं, शहर पुणें येथें भवानी पेठेचे पूर्वेस नवापुरा पेठ वसवावयाची आज्ञा जाल्यास वसाहत करीन ह्मणोन तुह्मी विनंति केली; त्याजवरून सदरहू जाग्यावर पेठ वसवावयाची आज्ञा तुह्मांस केली असे येविशींचीं. कलमें.

सीत समानीन मया व अलफ रबिलोवल २२

नवीं कुळें पेठ मजकुरीं येऊन राहतील, त्यांस सालमजकुरापासून सात साला मोहोतर्फा, व वेठ बेगार माफ केली असे, वस्ती करणें. कौल भरल्यावर मोहोतर्फा व वेठ बेगार वगैरे घेतली जाईल. कलम १.

कोतवालीकडील व बट छपाईचा उपद्रव कुळांस कौल भरेतोपर्यंत लागणार नाहीं. कलम १.

सरकारची खरीदी व मातबर लोकांची खरेदी कौल भरेतोंपर्यंत पेठ मजकुरीं होऊं नये येणेंप्रमाणें. कलम १.

पेठ मजकुरीं कुळें येऊन वसाहत करितील, त्यांस मागील देणेंदारांचा उपद्रव लागला तर देणें घेणें मनास आणून जीवन पाहून पैका घ्यावा. कलम १.

शिबंदी, प्यादे, व कारकून पेठ संबंध व चावडी बांधावयास वगैरे लागवड लागेल त्याचा चौकशीनें खर्च करून हिशेब सरकारांत समजावणें. कौल भरल्यावर पेठेचे ऐवजीं देविला जाईल. कलम १.

एकुण पांच कलमें करार करून हे सनद सादर केली असे, तरी सदरहू लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें; आणि पेठेची वसाहत करणें म्हणोन. सनद १.

येविशीं सनद, व कौल मिळोन २.

१ बापूजी आनंदराव कमाविसदार कसबे पुणें यांस कीं, रस्त्याचे उत्तरेस सरकारचीं झाडें आहेत, त्याचे लगते बाग, व मळे असतील त्यांपैकीं दुकानापुरती जागा साठ हात लांबीची, जीं दुकानें होतील त्यांस देविली असे, तरी बागमळ्यापैकीं सदरहूप्रमाणें दर दुकानास साठ हात लांबीची जागा देऊन बाकी बाग, व मळे राखणें ह्मणोन. सनद.

( 1162 ) Jiwanrám Ghásirám was permitted to found a new suburb called Nawápurá, to the east of Bhawánipeth at Poona.
A. D. 1785-86.

१ वाणी, उदमी, बेपारी, व रयत वगैरे यांस कौल कीं, इस्तकबील सन सीत समानीन तागाईत सन इसन्ने तिसैन सात साला माफीचा कौल देऊन जीवनराम घासीराम यास पेठेचे वसाहतीची आज्ञा केली असे, तरी तुह्मीं बेवसवसपणें पेठ मजकुरीं येऊन वसाहत करून उदीम व्यवसाय करीत जाणें कौल सात साला भरेतों मोहोतर्फा, व वेठ बेगार यांचा आजार लागणार नाहीं. कौल भरल्यावर वरकड पेठांचे शिरस्तेप्रमाणें मोहोतर्फा वगैरे देत जाऊन सुखरूप राहणें ह्मणोन.

२ कौल.

---

तीन पैकीं दोन सनदा, व एक कौल. रसानगी यादी. ३

११६३ ( ९१७ )–सखाराम बिन घासीराम याणें हुजूर कसबे पुणें येथील मुक्कामीं

सीत समानीन
मया व अलफ
रबिलावल २२

येऊन अर्ज केला कीं शहर पुणें येथें भवानी पेठचे पूर्वेस जीवनराम घासीराम हे नवापुरा पेठ वसवीत आहेत, त्यास साहेबीं मेहेरबान होऊन पेठ मजकूर येथील शेट्येपण कांहीं जीवनमाफक नजर घेऊन मजकडे करार करून दिल्यास पेठेची वसाहत करीन. पेठ वसवायास सात साला कौल दिल्हा आहे, तो भरल्यावर शिरस्तेप्रमाणें हक्क देवऊन भोगवटियास पत्र करून दिल्हें पाहिजे ह्मणोन; त्याजवरून पेठेचे वसाहतीवर नजर देऊन तुजवर मेहेरबान होऊन तुजला पेठ मजकूर येथील शेटेपणाचें वतन करार करून दिल्हें असे, तरी कोणे गोष्टीचा अंदेशा न धरितां पेठेची वसाहत करणें. शेटेपणाचा हक्क सालमजकुरापासून सात साला कौल भरल्यावर वरकड पेठांत चाल असेल त्याप्रमाणें घेऊन तूं व तुझे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें शेटेपणाचें वतन अनुभऊन सुखरूप राहणें. सदरहु वतनसंबंधें तुजकडे सरकारची नजर रुपये ५०० पांचशें करार केले ते सरकारांत पोता जमा असेत ह्मणोन, सखाराम मजकूर याचे नांवें. सनद १.

रसानगी यादी, पठेचे कलमाचे करारांची.

११६४ ( ९९२ )–कोतवालीकडे नवद प्यादे असामींची नेमणूक आहे तितक्यानें

तिसैन
मया व अलफ
रमजान १८

कोतवालीचे कामकाजाचा बंदोबस्त होत नाहीं. शहर मोठें, व नव्या पेठांची वसाहत जाहली त्यामुळें बंदोबस्तास गस्तीस वगैरे मिळोन जदीद प्यादे असामी पंचवीस ठेवावयाविशीं तुह्मीं सरकारांत विनंति

---

**( 1163 )** The Shet's watan of the above new suburb was given to Sakhárám bin Ghásirám.
A. D. 1785-86.

**( 1164 )** The establishment of 90 peons, entertained under the kotwál of Poona, was owing to the extent of the city and the creation of new suburbs found insufficient for
A. D. 1789-90.

केली; त्याजवरून छ. १ साबान गुदस्तां सन तिसा समानीनापासून जदीद असामी २५ पंचवीस दरमहा दर असामीस रुपये ४ चार अकरमाही शिरस्तेप्रमाणें करार करून दिल्हे असेत, तरी चाकरी घेऊन शहरचा बंदोबस्त करीत जाणें. चाकरी बमोजीब ऐवज मजुरा पडेल. दरवडे पडतात त्यांचेही ठिकाण बारकाईनें लावणें ह्मणोन, घासीराम सांवळदास कमावीसदार कोतवाली शहर पुणें यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

११६५ ( ९९८ )–सरकारचे जागे शहरांत आहेत, त्यांचे रस्तेयांतील मोऱ्या जागा

तिसेन मया व अलफ रबिलोवल २१

जागा बांधिल्या, त्यास खर्च जाहला तो, गुजारत गणेश रंगनाथ कारकून व गंवडे आकार. रुपये.

२०१ गुजारत सदाराम गंवडा. रुपये.

११८॥ पागा पेठ बुधवार येथील पश्चिमेकडील रस्तेयाची मोरी तीन तोंडीची बांधली. दक्षिण उत्तर लांब गज १५८ पैकीं निमे शेजारीं समोरील याची हद्द गज ७९ बाकी निमे सरकारची गज ७९ दर १॥ प्रमाणें. रुपये.

५१॥ खबुद (त?)र खान्याचे उत्तरेकडील बाजू पूर्व पश्चिम रस्तेयांतील मोरी तीन तोंडीची लांब गज ६९ पैकीं निमे शेजारीं समोरील याची गज ३४॥ बाकी निमे सरकारची गज ३४॥ दर गजीं १॥ प्रमाणें. रुपये.

३०॥ जुन्या कोटांत रस्ता पूर्व पश्चिम जातो, तेथील मोरी तीन तोंडीची गज एकूण. रुपये.

८। दारुखान्याची हद्द मोरी गज ११ पैकीं निमे शेजारीं समोरील याची हद्द गज ५॥ बाकी निमे सरकारची गज ५॥ दर १॥ प्रमाणें.

२२॥ बंदीखान्याचे जाग्याची मोरी गज ३० पैकीं निमे शेजारीं

the duties of patrol and for other police duties. The fact being represented by GhásHirám Sáwaldás, kotwál to Government, 25 additional men were given and he was directed to detect the dacoities that were being committed in the city.

( 1165 ) The drains on Government sites in Poona were constructed

A. D. 1789-90. at a cost of Rs. 226.

समोरील याची हद्द गज १५ बाकी निमे सरकारची गज १५ दर गजी रुपया १॥ प्रमाणें. रुपये.

३०। २०।

२०१ . १३४

२५ गुजारत पंचम गंवडा याजकडून पेठ शुक्रवार थेथील मोरी बांधविली त्याचा आकार. रुपये.

६। आपाजी शिंदा याचे हद्देची मोरी दगडाची पूर्व पश्चिम गल्लीची लांब गज १० पैकीं निमे शेजारीं समोरील याची हद्द गज ५ बाकी निमे सरकारची गज ५ दर १। प्रमाणें. रुपये.

१८॥। हैबतजी शिंदा याचे हद्देची मोरी दगडाची पूर्व पश्चिम लांब गज ३० पैकीं निमे शेजारीं समोरील याची हद्द गज १५ बाकी निमे सरकारची गज १५ दर गजी रुपया १। प्रमाणें. रुपये.

२५ २०

२२६ १५४ .

एकूण दोनशें सवीस रुपये मोरीचे कामास लागले ते कोतवालीचे हिशेबीं खर्च लिहिणें, मजुरा पडतील ह्मणोन, घासीराम सांवळदास कमावीसदार कोतवाली शहर पुणें यांचे नांवें. सनद १.

रसानंगी याद.

११६६ ( १००६ ) फिरंगोजी खाडे निसबत राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस याणें हुजूर येऊन अर्ज केला कीं, शहर पुणें येथें बाजार मजकूरचे वाणी, उदमी, बेपारी वगैरे आहेत, त्यांपैकीं कांहीं उदमीयांचीं घरें पुणियांत आहेत, कांहींचीं नाहींत; दरसाल दरएक जागा छपरें घा-

तिसैन गया व अलफ जमादिलाखर १९

( 1166 ) Traders being put to inconvenience for want of land to build houses for their residence, a new suburb was permitted to be established to the east of Ganeshpeth to the north of Bhawánipeth and upto the limits of the stream to the south of the Ráste's peth.

A. D. 1789-90.

लूनं राहतात. नेहमीं घराची सोय नाहीं; याजकरितां साहेबीं कृपाळू होऊन गणेश पेठेचे पूर्वेस नवी पेठ वसवावयास जागा नेमून देऊन सात साला माफीचा कौल दिल्हास वसाहत करीन ह्मणून; त्याजवरून नवी पेठ होऊन माहामुरी होते हें जाणून पेठेस जागा, गणेश पेठेचे पूर्वेस, भवानी पेठेचे उत्तरेस, रास्ते यांचे पेठेचे दक्षिणेस, वोढा आहे तेथपर्यंत, रुंदी गज ४५० चारशें पन्नास, व लांबी पूर्व पश्चिम नागझरीपासून गज ६०० सहाशें खुली आहे ती पेठ वसवावयास नेमून देऊन इस्तकबील सैन तिसैन सालमजकूर तागाईत सन सीत तिसैन सात साला माफीचा कौल सादर करून पेठ वसवावयाची आज्ञा केली असे, तरी तुह्मीं कोण्हे गोष्टीचा अंदेशा न धरितां पेठेची वसाहत करणें. सात सालां कौल भरल्यावर सरकार महसूल शिरस्तेप्रमाणें देत जाणें. पेठ मजकूरचें शेट्येपण फिरंगोजी मजकर यास करार करून दिल्हें असे. कौल भरल्यावर शेटेपणाचा हकदक करार करून दिल्हा जाईल ह्मणोन, वाणी, उदमी, बेपारी वगैरे यांचे नांवें. कौल १.

सदरील अन्वयें बापूजी आनंदराव कमावीसदार कसबे पुणें यांचे नांवें सनद कीं, सदरहूप्रमाणें जागा नेमून देणें ह्मणोन. सनद १.

——
२

एकूण कौल व सनद मिळोन दोन दिल्ह्या असेत.

रसानगी याद.

सदरील कौल, व सनद दिल्ही त्यांत फिरंगोजीनें अर्ज केला असी मालुमांत लिहिली ती नसावी, याजकरितां दुसरी याद देण्याची जाहाली आहे, त्याप्रमाणें छ. २ रमजानीं कौल, व सनद दिल्ही असे, सबब दूर. रसानगी, मोरो महादेव कुंटे.

# माधवराव नारायण ऊर्फ सवाई माधवराव पेशवे यांची रोजनिशी.

## LIST OF PLACES AT WHICH THE PESHWA RESIDED DURING THE YEAR.

| इंग्रजी साल व मुसलमानी साल, महिना | मुसलमानी तारीख. | मुक्काम. | शेरा. |
|---|---|---|---|
| अर्बा सबैन मया व अलफ | १ ते ७ | कसबा पुणें. | |
| १७७३–७४ | ८ ते ९ | मु. दाखल नाहीं. | |
| माहे रजब. | १० | कोरेगांव प्रांत, जुन्नर. | |
| | ११ ते १८ | जुन्नर. | |
| | १९ | मौजे नायगांव, तर्फ सांडस, प्रांत पुणें. | |
| | २० ते २२ | मौजे कोथलें, तर्फ करेपठार, प्रांत पुणें. | |
| | २३ | मौजे मोरगांव, प्रांत पुणें. | |
| | २४ | मौजे कुरकुंब, तर्फ पाटस, प्रांत पुणें. | |
| | २५ ते २९ | मौजे पेडगांव, तर्फ पाटस, प्रांत पुणें. | |
| साबान, रमजान. | | मु. दाखल नाहीं. | |
| माहे सवाल. | ३ | मौजे तोंडर, परगणे कलंबुर्गे. | |
| | ९ | मौजे भुरखेड, परगणे चितापूर. | |

| इंग्रजी साल व मुसलमानी साल, महिना | मुसलमानी तारीख. | मुक्काम. | शेरा. |
|---|---|---|---|
| | १० | मौजे कोटगिरें, परगणे यतेगिर. | |
| | १९ | मौजे कोडदूर, परगणे रायचूर. | |
| | २२ | मौजे मंचाल, परगणे आदवानी. | |
| | २३ | सदर. | |
| | २४ | मौजे कनकुरी, परगणे आदवानी. | |
| | २५ | मौ. आंचोली, परगणे आदवानी. | |
| | २६ | मौ. नागनहळ्ळी, पर० लोचागुड | |
| | २७ | सदर. | |
| | २८ | सदर. | |
| | २९ | सदर. | |
| माहे जिल्काद. | | माची, किल्ले पुरंदर. | |
| माहे जिल्हेज. | | माची, किल्ले पुरंदर. | |
| माहे मोहरम. | | माची, किल्ले पुरंदर. | |
| माहे सफर. | १ ते १५ | माची, किल्ले पुरंदर. | |
| | १६ ते २४ | पुरंदर, माची. | § |

§ पेशवे यांचे नांव ठेवलें त्याजबद्दल आहेर जमा आहे. ता. २१ चे कीर्दीत.

| | | |
|---|---|---|
| (माहे सफर) | २५ | वटेश्वर, कसबे सासवड. |
| | २६ | मौजे पिंपरें, कसबें सिरवळ. |
| | २७ | मौजे दहिगांव, प्रांत वांई. |
| | २८ | मौजे आरळें, प्रांत वांई, कृष्णा दक्षिणतीर. |
| | २९ | सदर. |
| | ३० | सदर. |
| माहे रबिलावल | १ ते ७ | मौजे आरळें, प्रांत वांई. |
| | ८ | मौजे किकली, प्रांत वांई. |
| | ९ | कसबे सिरवळ, नीरा उत्तरतीर. |
| | १० | पट्टे पुरंदर. |
| | ११ ते २२ | माची, किल्ले पुरंदर. |
| खमस सबैन मया व अलफ १७७४–७५ | | |
| माहे रबिलावल. | २३ ते २९ | माची, किल्ले पुरंदर. |
| माहे रबिलाखर. | १ते३० | माची, किल्ले पुरंदर. |
| माहे जमादिलावल. | १ते३० | माची, किल्ले पुरंदर. |
| माहे जमादिलाखर. | १ते२९ | माची, किल्ले पुरंदर. |
| माहे रजब. | | माची, किल्ले पुरंदर. |
| माहे साबान. | | माची, किल्ले पुरंदर. |
| माहे रमजान. | १ते१८ | माची, किल्ले पुरंदर. |
| | १९ | पट्टे पुरंदर नजीक. |
| | २० ते २३ | मौजे यखतपूर, प्रांत पुणें. |
| | २४ | मौजे वलती, प्रांत पुणें. |
| | २५ | कसबे तळेगांव, तर्फ पाबळ. |
| | २६ | मौजे काडापुरी, तर्फ पाबळ, प्रांत जुन्नर. |
| | २७ | मौजे कोकडी, तर्फ कर्डे, प्रांत जुन्नर. |
| | २८ | मौजे रुई, तर्फ रांजणगांव. |
| | २९ | मौजे चास, परगणे पारनेर. |
| माहे सवाल. | १ | मौजे चास, परगणे पारनेर. |
| | २ | मौजे जेऊर, परगणे कडेवलींत. |
| | ३ | सदर. |
| | ४ | मौजे हिंगोणी, परगणे नेवासें. |
| | ५ ते ७ | मौ. आंबगांव, पर० गांडापूर. |
| | ८ | मौजे काठीपिंपळगांव, परगणे गांडापूर. |
| | ९ | मौजे पारोळें, परगणे खंडाळे. |
| | १० | कसबे नसरतपूर, परगणे देहरें. |
| | ११ | मौजे उंबरखेड, प्रांत खानदेश. |

‡ स्वारीस सखाराम भगवंत व बाळाजी जनार्दन निघाले.

| | | | |
|---|---|---|---|
| ( माहे सवाल. ) | १२ | सदर | |
| | १३ | मौजे बोरकुंड, परगणे धुळें प्रांत खानदेश. | |
| | १४ व १५ | कसबे धुळें, परगणे मजकूर प्रांत खानदेश. | |
| | १६ | मौजे डाफरी, परगणे सोनगीर, प्रांत खानदेश. | |
| | १७ व १८ | कसबे थालनेर, परगणे मजकर. | |
| | १९ | सिगवें, परगणे थालनेर. | |
| | २० ते २३ | मौजे तारखेडें, परगणे सुलतानपूर. | |
| | २४ | मौजे खरदें, परगणे थालनेर प्रांत खानदेश. | |
| | २५ | मौजे दगडी, परगणे चोपडें. | |
| | २६ | मौजे नमणें, परगणे आडावंद प्रांत खानदेश. | |
| | २७ व २८ | मौ. दाबुरडी, परगणे आडावंद. | |
| | २९ | कसबे याघल, परगणे मजकूर. | |
| | ३० | मौजे पिंपरुड, परगणे सावदें. | |
| माहे जिल्काद. | १ व २ | मौजे पिंपरुड परगणे सावदें. | |
| | ३ ते ५ | मौजे भोकरी, परगणे रावेर, प्रांत खानदेश. | |
| | ६ ते १० | काळाचौतरा नजीक बऱ्हाणपूर. | |
| | ११ ते १७ | मौजे सारोळें, परगणे जैमाबाद. | |
| | १८ | मौजे अंतोरली, परगणे येदलाबाद. | |
| | १९ | मौ. हात्याले, परगणे येदलाबाद | |
| | २० | मौजे साकेगांव, परगणे येदलाबाद. | § |
| | २२ | मौजे हणमंतखेड, परगणे उत्राण. | |
| | २३ | मौजे हिंगोणें, परगणे बाहाल. | |
| | २४ | मौजे करजगांव, परगणे देहेरें. | |
| | २५ | मौजे कासाठी, परगणे पाटोदें. | |
| | २६ | मौजे रोठेगांव, परगणे वैजापूर | |
| | २७ व २८ | मौजे मातुलठाण, परगणे वजापूर, गोदा दक्षिणतीर. | |
| | २९ | कसबे राहुरी, परगणे मजकूर. | |
| माहे जिल्हेज. | १ | मौजे जांबगांव, परगणे पारनेर | |
| | २ | मौजे गणेगांव, तर्फ कर्डे. | |
| | ३ | मौजे वडकी प्रांत पुणें. | |
| | ४ त ३० | माची किल्ले पुरंदर. | * |

§ आज रोजीं सखाराम भगवंत व बाळाजी जनार्दन यांस निरोपाचीं वस्त्रें नबाव निजामअल्लीखान यांणीं छ. १७ जिल्काद रोजीं दिलीं तीं जमा आहेत.

* नानाफडणीस व सखाराम भगवंत स्वारीस गेले होते, ते माचीस दाखल झाले

| | | |
|---|---|---|
| माहे मोहरम, सफर, रविलावल. | | माची किल्ले पुरंदर. |
| माहे रविलाखर. | १ ते ५ | माची किल्ले पुरंदर. |
| **सित सबैन मया व अलफ १७७५–७६** | | |
| माहे रविलाखर. | ६ ते ३० | माची किल्ले पुरंदर. |
| माहे जमादिलावल, जमादिलाखर, रजब, साबान, रमजान, सवाल, जिल्काद, जिल्हेज. | | माची किल्ले पुरंदर. |
| माहे मोहरम. | १ ते ५ | मौजे कोढीत तर्फ करेपठार. |
| | ६ ते ३० | माची किल्ले पुरंदर. |
| माहे सफर, रविलावल. | | माची किल्ले पुरंदर. |
| माहे रविलाखर. | १ ते १५ | माची किल्ले पुरंदर. |
| **सबासबैन मया व अलफ १७७६–७७** | | |
| माहे रविलाखर. | १६ ते २९ | माची किल्ले पुरंदर |
| साल अखेर. | | माची किल्ले पुरंदर. |
| **समान सबैन मया व अलफ १७७७–७८** | | |
| माहे रबिलाखर | १७ ते ३० | माची किल्ले पुरंदर. |
| साल अखेर. | | माची किल्ले पुरंदर. |
| **तिसासबैन मया व अलफ १७७८–७९** | | |
| माहे जमादिलावल. | ९ ते ३० | माची किल्ले पुरंदर. |
| माहे जमादिलावल–ते–जिल्हेज. | | माची किल्ले पुरंदर. |
| माहे सफर. | १ ते १० | पट्टे किल्ले पुरंदर. |
| | ११ ते ३० | सासवड. |
| माहे रबिलावल. | १ ते २० | सासवड. |
| | २१ | मौजे आंबी, परगणे सपें. |
| | २२ | मौजे वळती, प्रांत पुण. |
| | २३ | मौजे थेऊर, प्रांत पुणें. |
| | २४ ते २९ | मौजे पर्वती, प्रांत पुणें. |
| माहे रविलाखर. | १ ते ९ | मुक्काम पर्वती, प्रांत पुणें. |
| | १० ते ३० | पुणें. |
| माहे जमादिलावल. | १ ते १८ | मुक्काम दाखल नाहीं. |

| | | |
|---|---|---|
| समानीन मया व अलफ १७७९–८० | | |
| माहे जमादिलावल. | १९ ते २९ | पुणें. |
| माहे जमादिलाखर ते जमादिलावल. | | पुणें. |
| माहे सवाल. | १ ते २१ | पुणें. |
| | २२ ते २९ | खडकी प्रांत पुणें. |
| इहिदे समानीन मया व अलफ १७८०–८१ | | |
| माहे रविलावल. | १ ते १० | मौजे कार्ले, तर्फ नाणेमावळ. |
| | ११ ते २९ | मौजे मुडवरें, तर्फ नाणेमावळ. |
| | ३० | मौजे खडकाळें, तर्फ नाणेमावळ. |
| माहे रबिलाखर | १ ते २४ | कसबे नाणे, तर्फ मजकूर. |
| | २५ | मौजे मढ तर्फ बोराटी. |
| | २६ व २७ | मौजे खालापूर, तर्फ बोराटी. |
| | २८ ते ३० | मौजे कांबे तर्फ तुंगारतन. |
| माहे जमादिलावल | १ ते ४ | मौजे कांबे तर्फ तुंगारतन. |
| | ५ ते ७ | मौजे वयाल. |

| | | |
|---|---|---|
| | ८ ते १८ | मौजे मढ, तर्फ बोरेटी. |
| | १९ ते २४ | मौजे सिरसे तर्फ बोरेटी. |
| | २५ | मौजे मढ. |
| | २६ ते २८ | मौजे जांबलें. |
| | २९ | मौजे शेलारवाडी. |
| इसन्ने समानीन मया व अलफ १७८१–८२ | | |
| माहे जमादिलाखर | १ ते ३० | पुणें. |
| माहे रजब | १ ते २९ | पुणें. |
| माहे साबान ते माहे जमादिलावल | | पुणें. |
| माहे जमादिलाखर | १ ते २१ | पुणें. |
| सल्लास समानीन मया व अलफ १७८२–८३ | | |
| माहे जमादिलाखर | २२ ते ३० | पुणें. |
| माहे रजब ते माहे जमादिलाखर | | पुणें. |
| माहे रजब | १ ते ३ | पुणें. |

| | | | |
|---|---|---|---|
| अर्बा समानीन मया व अलफ १७८३-८४ | | | |
| माहे रजब | ४ ते ३० | पुणें. | |
| माहे साबान ते जमादिलाखर | | पुणें. | |
| माहे रजब | १ ते १४ | पुणें. | |
| खमस समानीन मया व अलफ १७८४-८५ | | | |
| माहे रजब. | १५ ते ३० | मुक्काम पुणें. | |
| माहे साबान ते जिल्काद | | मुक्काम पुणें. | |
| माहे जिल्हेज | १ ते ९ | मुक्काम पुणें. | † |
| | १० | मुक्काम पुणें. | § |
| | ११ ते १७ | मौजे भांबुर्डे, तर्फ हवेली. | |
| | १८ | कसबे खेड, तर्फ मजकूर प्रांत जुन्नर. | |
| | १९ | नारायणगांव, प्रांत जुन्नर. | |
| | २० | कसबे ओतूर, प्रांत जुन्नर. | |
| | २१ | मौजे कुंभफळ, परगणे, आकोलें | |
| | २२ | कसबे सिन्नर, परगणे मजकूर. | |
| | २३ ते २९ | क्षेत्र पंचवटी, परगणे नाशिक. | |
| माहे मोहरम | १ ते १३ | क्षेत्र पंचवटी, परगणे नाशिक. | |
| | १४ | मौजे जागेली, परगणे नाशिक. | |
| | १५ | मौजे फदीपूर, तर्फ देपूर. | |
| | १६ | मौजे निलवाडी, तर्फ हवेली परगणे संगमनेर. | |
| | १७ | मौजे मांडवे, परगणे पारनेर. | |
| | १८ | मौजे टाकळी, परगणे पारनेर. | |
| | १९ | मौजे देवीभोईरे, तर्फ निघोज प्रांत जुन्नर. | |
| | २० | मौजे वरुडे, तर्फ पाबळ, प्रांत जुन्नर. | |
| | २१ | मौजे वडुखुर्द, तर्फ सांडस, प्रांत पुणें. | |
| | २२ ते २९ | कसबे पुणें. | |
| माहे सफर, रबिलाखर व जमादिलोवल | | मुक्काम पुणें. | |
| माहे जमादिलाखर | | मुक्काम दाखल नाहीं. | |
| माहे रजब | १ ते २५ | मुक्काम दाखल नाहीं. | |

† तारीख ९ रोजी पेशव्यांची स्वारी गंगापुरास जाण्यास मुहूर्त करून रात्री सत्तावीसावे घटकेस वाड्यांतून निघाली सबब घटकास्थापनास वगैरे खर्च ४६।.

§ रावसाहेब रोज गुदस्त खासा स्वारी मुहूर्तकरून डेऱ्यास दाखल जाली.

| | | |
|---|---|---|
| सीत समानीन मया व अलफ १७८५–८६ | | |
| माहे रजब | २६ ते ३० | मुक्काम पुणें. |
| माहे साबान ते जमादिलाखर | | मुक्काम पुणें. |
| माहे रजब | १ ते २९ | मुक्काम पुणें. |
| माहे साबान | १ ते ७ | मुक्काम दाखल नाहीं. |
| सबा समानीन मया व अलफ १७८६–८७ | | |
| माहे साबान | ८ ते ३० | मुक्काम पुणें. |
| माहे रमजान ते माहे सफर | | मुक्काम पुणें. |
| माहे रविलोवल | | मुक्काम दाखल नाहीं. |
| माहे रविलाखर | १ ते १५ | मुक्काम पुणें. |
| | १६ ते ३० | मुक्काम दाखल नाहीं. |
| माहे जमादिलोवल | १ ते २९ | मुक्काम पुणें. |
| माहे जमादिलाखर व माहे रजब | | मुक्काम पुणें. |
| माहे साबान | १ ते १२ | मुक्काम दाखल नाहीं. |
| | १३ | मुक्काम पुणें. |
| | १४ ते १७ | मुक्काम दाखल नाहीं. |

| | | |
|---|---|---|
| समान समानीन मया व अलफ १७८७–८८ | | |
| माहे साबान | १८ त २९ | मुक्काम पुणें. |
| माहे रमजान ते माहे रजब | | मुक्काम पुणें. |
| माहे साबान | १ ते २७ | मुक्काम पुणें. |
| तिसा समानीन मया व अलफ १७८८–८९ | | |
| माहे साबान | २८ ते २९ | मुक्काम पुणें. |
| माहे रमजान ते माहे साबान | | मुक्काम पुणें. |
| माहे रमजान | १ ते ८ | मुक्काम पुणें. |
| तिसैन मया व अलफ १७८९–९० | | |
| माहे रमजान | ९ ते २९ | मुक्काम पुणें. |
| माहे सवाल ते माहे साबान | | मुक्काम पुणें. |
| माह रमजान | १ ते २० | मुक्काम पुणें. |
| इहिदे तिसैन मया व अलफ १७९०–९१ | | |
| माहे रमजान | २१ ते २९ | मुक्काम पुणें. |

| | | |
|---|---|---|
| माहे सवाल ते माहे रमजान | | मुक्काम पुणें. |
| माहे सवाल | १ | मुक्काम पुणें. |
| इसन्ने तिसैन मया व अलफ १७९१–९२ | | |
| माहे सवाल | २ ते २९ | मुक्काम पुणें. |
| माहे जिलकाद व जिल्हेज | | मुक्काम पुणें. |
| माहे मोहरम | १ ते १८ | मुक्काम पुणें. |
| | १९ ते २९ | मुक्काम वानवडी, प्रांत पुणें. |
| माहे सफर | १ ते ३ | मुक्काम वानवाडी, प्रांत पुणें. |
| | ४ | मौजे लोणी, प्रांत पुणें. |
| | ५ | मौजे जेजुरी, तर्फ करेपठार, प्रांत पुणें. |
| | ६ ते ७ | मौजे पिंपरें बुद्रुख, परगणे सिराळें. |
| | ८ | मौजे जेऊर, तर्फ वंदन, प्रांत वाई. |
| | ९ | मौजे पांडें, समत हवेली, प्रांत वाई. |
| | १० ते १४ | कसबे वाई. |
| | १५ | मौ. महाबळेश्वर, प्रांत जावली. |
| | १६ ते २९ | मुक्काम वाई. |
| माहे रविलावल | १ ते १४ | मुक्काम वाई. |
| | १५ | मौजे पळसी, समत वाघोली, प्रांत वाई, |
| | १६ | मौजे निबेद तर्फ निरथडी. |
| | १७ | कसबे सुपें, परगणे मजकूर. |
| | १८ | मौजे आंबळे, प्रांत पुणें. |
| | १९ ते २९ | कसबे पुणें. |
| माहे रविलाखर ते रमजान | | मुक्काम पुणें. |
| माहे सवाल | १ ते १२ | मुक्काम पुणें. |
| सलास तिसन मया व अलफ १७९२–९३ | | |
| माहे सवाल | १३ ते २९ | मुक्काम पुणें. |
| माहे जिलकाद ते रमजान | | मुक्काम पुणें. |
| माहे सवाल | १ ते २३ | मुक्काम पुणें. |
| अर्बा तिसैन मया व अलफ १७९३–९४ | | |
| माहे सवाल | २४ ते २९ | मुक्काम पुणें. |
| माहे जिलकाद ते माहे सवाल | | मुक्काम पुणें. |
| माहे जिलकाद | १ ते ५ | मुक्काम पुणें. |

| | | |
|---|---|---|
| खमस तिसैन मया व अलफ. १७९४–९५ | | |
| माहे जिलकाद | ६ ते २९ | मुक्काम पुणें. |
| माह जिल्हेज ते रविलाखर | | मुक्काम पुणें. |
| जमादिलावल. | १ ते १९ | मुक्काम पुणें. |
| | २० ते २९ | मुक्काम गारपीर. |
| जमादिलाखर. | १ ते १३ | गारपीर, कसबे पुणें. |
| | १४ ते २३ | मौजे खराडी, प्रांत पुणें. |
| | २४ ते २६ | मौजे कोरेगांव, तर्फ पावळ, प्रांत जुन्नर. |
| | २७ ते ३० | मौजे मीरगव्हाण, तर्फ पावळ, प्रांत जुन्नर. |
| रजब | १ | मौजे आलेगांव, परगणे कर्डे रांजणगांव. |
| | ३ ते ६ | मौजे काष्टीतांदळी, परगणे कर्डे रांजणगांव. |
| | ७ ते १५ | मौजे वेलवडी, परगणे कर्डे. |
| | १६ | मौजे आडळगांव, परगणे कर्डे |
| | १७ | मौ.खांडवी, परगणे मिरजगांव. |
| | १८ ते २९ | मौजे हिंगणगांव, परगणे कर्डे. |
| साबान. | १ ते २० | मौजे हिंगणगांव, परगणे कर्डे. |
| | २१ ते ३० | मौजे धानोरे, परगणे कडेवलीत. |
| रमजान. | १ ते १० | मौजे धानोरे, परगणे कडेवलीत. |
| | ११ ते १५ | मौजे जवळे, परगणे कडेवलीत. |
| | १६ ते २८ | मौ.शेलगांव, परगणे कडेवलीत. |
| | २९ | मौजे कर्जे, परगणे कडेवलीत. |
| सवाल. | १ | मौजे कर्जे, परगणे कडेवलीत. |
| | २ ते ३ | मौ. सोगांव, परगणे कडेवलीत. |
| | ४ ते ६ | मौजे सिरापूर, प्रांत पुणें. |
| | ७ | मौजे कानगांव प्रांत पुणें. |
| | ८ | मौजे खामगाव, प्रांत पुणें. |
| | ९ ते ११ | मौजे लोणी, प्रांत पुणें. |
| | १२ ते २९ | कसबे पुणें. |
| जिलकाद. | १ ते १६ | मुक्काम पुणें. |
| सित तिसैन मया व अलफ १७९५–९६ | | |
| जिलकाद. | १७ ते ३० | मुक्काम पुणें. |
| जिल्हेज. | | मुक्काम पुणें. |
| माहरम. | | मुक्काम पुणें. |
| सफर. | | मुक्काम पुणें. |
| रविलोवल. | | मुक्काम पुणें. |
| रविलाखर. | १ ते १३ | मुक्काम पुणें. § |

§ छ १३ रोजीं माधवराव नारायण उडी टाकून अस्तमानीं मयत जाले. छ. १४ पासून चिमणाजी माधव यांची कारकीर्द सुरू.

# ERRATA.

| Number | Page | Line | Incorrect | Correct |
|---|---|---|---|---|
| 881 | 83 | 4 | Ápajis | Apaji's |
| 891 | 88 | 10 | in | on |
| 897 | 92 | 6 | Châdak | Chândak |
| 900 | 93 | 8 | Ápâjis | Ápâji's |
| 911 | 102 | 2 | Apâjis | Apaji's |
| 913 | 103 | 2 | Ápajis | Apaji's |
| 918 | 108 | 5 | adultry | adultery |
| 951 | 129 | 8 | sucessful | successful |
| " | " | " | details | debts |
| 999 | 158 | 12 | only; it | only: It |
| 1005 | 166 | 4 | term | tenure |
| 1030 | 188 | 3 | 1015 | 1013 |
| | 188 | | 690...each | 690; 2 offerred to four deities at 8 annas each. |
| 1032 | 194 | 10 | villaged | village |
| 1034 | 195 | 3 | details | debits |
| 1042 | 205 | 7 | amount...Government | amount was to be levied for Government from the holder as nazar |
| 1045 | 208 | 5 | âftâgir bearer | âftâgir & bearer |
| 1047 | 209 | 11 | other person | other |
| 1088 | 245 | 3 | owing to | during |
| 1089 | 246 | 1 | labour' | labour. |
| 1129 | 277 | 4 | honor | honour |
| 1156 | 349 | 1 | Dairy | Diary |

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध. | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४ | १० | रकदर्जी | रदकर्जी |
| २ | १७ | बाजीराऊ | बाजीराव |
| ३ | ९ | फडनीस | फडणीस |
| ५ | १८ | मृत्य | मृत्यु |
| ७ | २ | दरकसंमंधें | दरकसंबंधें |
| २२ | २९ | बल्लाल | बल्लाळ |
| ४१ | २ | गागू | गानू |
| ५७ | १० | नासिककर | नाशिककर |
| ५९ | १४ | बाजीराऊ | बाजीराव |
| ६१ | ४ | जोसी | जोशी |
| ६२ | १२ | आमचेव | आमचे |
| ६३ | १० | वृत्ति | वृत्ति |
| ६५ | २७ | किली | किल्ली |
| ८२ | ९ | रामगिरधर | रामगिरिधर |
| ८९ | २० | नीलकंठ | नीळकंठ |
| ९७ | २३ | हेळवांकला | हेळवांक |
| ९७ | २८ | हेलवांक | हेळवाक |
| १०९ | १३ | कीर्दीपेका | कीर्दीपैकीं |
| १३४ | ५ | एकशएक | एकशेएक |
| १४५ | १ | दुसर | दुसरे |
| १६६ | १४ | सबंधें | संबंधें |
| १६९ | २ | मौज | मौजे |
| १७५ | २३ | सितेनांव | सितैनांत |
| १९३ | १२ | बालोजी | बाळोजी |
| १९९ | १८ | यथुराभट | मथुराभट |
| २०२ | १९ | म्हणून | म्हणोन |
| २०७ | ११ | देहेबि | देहेबी |
| २०९ | ८ | मजकर | मजकूर |
| २९० | ८ | निसब | निसबत |
| ३२१ | ११ | कमळजा बाई | कमळजाबाई |
| ३५० | ५ | देण. | देणें. |
| ,, | २१ | ज | जे. |
| ३५५ | ६ | रणें | रहाणें |
| ३५८ | १० | मजकर | मजकूर |

# सवाई माधवराव पेशवे यांचे रोजनिशातील अपरिचित् शब्दांचा कोश.

| पृष्ठ सं. | ओळ. | कठिण शब्द. | कठिण शब्दांचे अर्थ. |
|---|---|---|---|
| २८८ | १३ | अजपत्रें. | शेरेपत्र ? |
| २२१ | ६ | अजुरा. | मजुरी. |
| ५७ | ५ | अडशेरी. | अडीच शेरी. अर्धी पायली. |
| २३५ | १४ | अदगज. | अर्धागज. |
| ७९ | १४ | अन्वयें. | प्रमाणें. |
| ७० | २० | अफलाद. | कन्यासंतति. |
| २२४ | ११ | अमदरफ्ती. | ये, जा. |
| २५७ | १९ | अमीन. | हुद्दाविशेष. अधिकारी—न्यायाचे वगैरे. |
| १६५ | १ | आकस. | द्वेष. |
| २१९ | २३ | आजुरदार. | मजुरदार. |
| ५२ | ८ | आदा. | दिलेले, देण्यांत आलेले. |
| २८ | ९ | आफ्तागिरी. | अबदागीर. |
| २२४ | ११ | आफ्ती. | दुष्काळ. |
| १८४ | २६ | आक्षेप. | मागणें, तक्रार, आशंका. |
| १६३ | २५ | इजमाहाल. (इजमायली?) | चालू, तातपुरत्या, कामचलाऊ. |
| २१७ | २१ | इजाफा. | पगाराची बहडती, वाढ. |
| ७६ | २२ | इतबारी. | विश्वासू. |
| ६ | ९ | इतल्यानें. | सल्ल्यानें. |
| ४ | ४ | इस्तकबील. | ह्यापासून. |
| २३९ | १८ | इस्तंबोल. | नांव ( कान्स्टांटीनोपल ). |
| १८ | १ | इस्ताव्याचे. | दरसालचे चढाचे. |
| १६९ | १० | उच्छेद. | नाश, उपटून टाकणें. |
| १७९ | १५ | उजूर ( करणें ). | वाट पाहात बसणें; हरकत करणें. |
| २९९ | २६ | उष्ट्रखाना. | उंट बांधण्याची जागा ( उंटखाना ) |
| १६४ | २२ | उफाल ( ळ ). | जास्तीबाकी, जास्त शिलक. |
| १८९ | १ | उलफा. | विन शिजविलेलें धान्य. |
| १२३ | ६ | एकजदी. | एके ठिकाणीं असलेले, एकत्र. |
| १५४ | १४ | एख्तीयार. | जबाबदारी, अखत्यार. |

| पृष्ठ सं. | ओळ. | कठिण शब्द. | कठिण शब्दांचे अर्थ. |
|---|---|---|---|
| ११३ | २० | ऐन तैनांत. | मुख्य तैनात. |
| १०१ | २६ | कतबा. | जबाबदारीचा कागद. |
| १०७ | ९ | कमच्या. | वेताच्या छड्या. |
| ४ | ८ | कमावीस. | वसूली, सारा वसूली. |
| २४२ | १४ | कमोद. | तांदुळाची जात. |
| २४६ | १९ | कर्यात. | पोट महाल. |
| ६२ | १७ | करीने ( करिणा ). | लेखी म्हणणें. |
| २४८ | १३ | कस. | इसम. |
| १५२ | ११ | कारखानीस. | कारभारी, हिशेबनवीस, कोठीवाला. |
| १८ | १० | कारसाई. | तगाई. |
| २२६ | १४ | काराणी. | कामगार, खलासी. |
| २२० | १ | कासीद. | टपाल घेऊन जाणारा गडी. |
| १५९ | ४ | काळीची. | शेतांतील जमीन. |
| १६९ | ६ | कुफराणा. | आगळीक. |
| ६९ | २६ | कौल. | अभयपत्र. |
| २१२ | ३० | खाजण. | समुद्रकिनाऱ्यावरील लागवडीची जमीन, खार. |
| २४३ | १ | खारेभात. | खाऱ्या जमीनींत तयार झालेलें |
| ६ | १२ | खासबरदार. | खासगीचे नोकर. |
| २४६ | १३ | खिलार. | गाई, म्हशी वगैरे. |
| ६९ | १३ | खिसा. | राखून ठेवलेला भाग. |
| २३६ | ९ | खुटवा. | जहाजावरील जकात. |
| २०५ | ८ | खुमाचे. | समुदायाचे, जमावाचे, गटाचे. |
| ५८ | १८ | खोजेदायम. | विशेषनाम. |
| ३ | १९ | खोतीस. | मक्त्यास. |
| २९३ | १३ | गरत. | गृहस्थीण, घरातील बायका. |
| १४७ | १४ | गुजारतीनें. | मार्फतीनें, हस्तें. |
| ५ | १९ | गैरवाका. | निष्काळजीपणानें. |
| ८२ | २ | घरवंद. | पडीक घराची जागा. |
| ५ | १७ | घालघसर. | टाळाटाळी, लांबवालांबवी. |
| १६९ | १३ | घासदाणा. | कर. |
| २७९. | १३ | चाकरमान्या ( ने ). | चाकरीचे. |
| १८४ | २५ | चाटी. | शिंपी. |
| २२५ | १० | चारण. | धान्य नेणारे आणणारे व्यापारी, तांडेवाले. |

| पृष्ठ सं. | ओळ. | कठिण शब्द. | कठिण शब्दांचे अर्थ. |
|---|---|---|---|
| २१० | १५ | चिगर. | किरकोळ. |
| १४ | ८ | जकीऱ्या ( स ). | सामान. |
| १७२ | २ | जथे. | जासूदांची टोळी. |
| १६६ | १७ | जराबाजरा. | किरकोळ सामानसुमान. |
| १४ | ७ | जदीद. | नवीन. |
| २३३ | २७ | जाबता. | पत्रक. |
| २२० | १ | जाबसाल. | बोलणें चालणें. |
| १२ | १६ | झाडीयानसी. | झाड्यानिसी. |
| २१४ | ४ | ठिकीं. | ठिकाणें, जमिनीचे तुकडे. |
| २२६ | ११ | डंगी. | होडी, बोट फताडी, ढाण. |
| २८० | १० | ढेगोमेगो ( ढेंगोमेंगो ). | महारांचे गुरु. |
| १८५ | २२ | तकिया. | बसण्याची जागा, फकीराची उभी राहण्याची जागा. |
| २६ | ७ | तर्पे. | तर्फे. |
| १२३ | २० | तालीक. | नक्कल. |
| १६१ | ६ | तेजकरी. | सावकार वगैरे. |
| १९३ | २४ | तैवज. | पानसुपारी. |
| १४० | ११ | तोतया. | सादृश्यावरून दुसऱ्याचें नांव सांगणारा. |
| २२४ | १३ | थळभरीत. | माल भरण्याचे ठिकाणचा कर. |
| २२४ | १२ | थळमोड. | माल विकण्याचे ठिकाणाचा कर. |
| ६७ | २२ | दखलगिरी. | मध्यें पडणें. |
| ३ | १९ | दरकदार. | सरकारनें नेमलेला मनुष्य. |
| ७ | २० | दरसदे. | दरशेंकडा. |
| २४ | १९ | दस्तक. | परवाना. |
| ६२ | २ | दायाद. | नातेवाईक, वारस. |
| १० | ५ | दास्तान. | कोठार. |
| १०७ | ९ | द्वाहिदुराई. | आरडाओरडा. |
| १४ | ९ | दिगर. | अधिक, जास्त, इनाम सरंजाम वगैरे. |
| ११ | २३ | दिंमत. | निसबत, तर्फेचा. |
| ६२ | २१ | दिव्य. | खरे, दाखविणारें अद्भुत. |
| २२६ | १६ | दिवसगत. | जास्तदिवस. |
| २ | १२ | दिवाणदस्तुरी. | सरकारी कर. |
| १८६ | ६ | दुवा. | आशिरवाद. |

| पृष्ठ सं. | ओळ. | कठिण शब्द. | कठिण शब्दांचे अर्थ. |
|---|---|---|---|
| ७० | २५ | देहाय. | गांवगन्ना. |
| ६२ | ७ | दौहित्र. | मुलीचा मुलगा. |
| १६४ | ९ | नाकारे. | वाईट, गहाळ. |
| ७४ | २ | नामजाद. | कीर्तिमान, एक पदवी, मान्यतेनें. |
| २५९ | १ | निका. | लग्न दुसरें, पाट. |
| २४२ | १३ | निरख. | भाव. |
| २६६ | १७ | नीचाभिगतयोषित्संसर्गप्रायश्चित्त. | हलक्या जातीच्या माणसाशीं सहवास असणाऱ्या बाईच्या संसर्ग दोषाचें प्रायश्चित्त. |
| २७२ | ७ | नीलांबर. | निळें वस्त्र नेसणारे. |
| १३३ | ११ | पथक. | सरदारांच्या हाताखालील फौजेचा भाग. |
| ११२ | ५ | पडथळे. | अंगांतील देव अगर भुतें. |
| २३६ | १० | पटणी. | पाटण येथील. |
| १२८ | १५ | परनिष्ठ. | सत्यवादी, केव्हांही खोटें न बोलणारे. |
| ६५ | २ | परिचारक. | नौकर, हुजऱ्या. |
| ६७ | ६ | पांढरीनें. | समस्त खेडे गांवांतील मंडळीनें. |
| २९९ | १४ | पीलखाना. | हत्ती बांधण्याची जागा ( हत्तीखाना ). |
| ६२ | १८ | पुरशसि. | अर्ज. |
| ७० | १५ | पुस्त दर पुस्त. | पिढीनपिढी. |
| २ | ११ | पेशकसी. | इनामावरील कर, नजराणा. |
| ५४ | १४ | पोता. | पिशवी, खजिना. |
| २६६ | १७ | प्रत्याम्नाय. | वैदिक. |
| ६४ | २६ | प्रथकोंकोर. | पृथक् पृथक्. |
| २७७ | २ | प्राकार. | हद्दीची भिंत. |
| २६६ | १७ | प्राजापत्य. | गोप्रदान, प्रायश्चित्ताचें गोप्रदान. |
| ९ | २५ | फडफर्म. | ऐनजिनसी नजर. |
| ४ | ५ | फरोक्त. | विक्री, विकलेला. |
| १५५ | ३ | फुटखोत. | फुटकळ खोत, थोड्याभागाचे जमीन साऱ्याचे मक्तेदार. |
| १२८ | ८ | फेरिस्त. | याद. |
| २३३ | २१ | बटछपाई. | शिक्का मारण्याबद्दल वार्षिक कर. |
| ९४ | ११ | बदफैली. | गैरवर्तन. |
| २२५ | ३ | बमय. | सहित. |
| ११३ | ११ | बमोजीब. | प्रमाणें, बरहुकूम. |

| पृष्ठ सं. | ओळ. | कठिण शब्द. | कठिण शब्दांचे अर्थ. |
| --- | --- | --- | --- |
| १९२ | २७ | बारदार. | हुजऱ्या. |
| १७७ | २२ | बालपर्वेशी. | मुलांचें पोषण. |
| १४४ | १२ | बेकार. | बिनरोजगारी, बिनधंद्याचे लोक. |
| १६४ | ३० | बेहडे. | अंदाज पत्रकें. |
| ३ | ८ | मखलासी. | पसंतीचा शेरा. |
| २१२ | ३० | मच्छीमार. | मासे मारणारे, कोळी. |
| ६ | ५ | मजमू. | वसुलीचें काम. |
| २४६ | १९ | मजरें. | लहान खेडें. |
| २२० | १० | मचवा. | लहान जहाज. |
| १२३ | ७ | मनसुफी. | न्याय. |
| १५ | ५ | मरामत. | दुरुस्ती. |
| १२० | ८ | मलई. | गर्दी. |
| ६९ | २७ | महचर. | सनदलेख. |
| १६ | २ | महागिरी. | गलबत. |
| २५ | १३ | माली. | वसूल संबंधीं. |
| २४२ | १९ | माहासरखेल. | राजे रजवाड्यांचा किताब. |
| १९० | ३ | मिनहु. | चालू सदरहू. |
| २४८ | १६ | मुशाहिरा. | पगार, रोजमुरा. |
| २६१ | ५ | मेटा. | टोंक. |
| २ | ३ | मोकासा. | लष्करी नोकरीबद्दल वसूलापैकीं वांटा. |
| ३ | १ | मोईन. | कायम नेमणूक. |
| २०५ | ११ | मोईतसबी. | मुकरर वस्ती करणारे ( ? ) |
| १० | ७ | मोर्तब. | राजशिक्का. |
| ५९ | ७ | यजीतपत्र. | अजिंक्य पत्र, शरण पत्र. |
| ३ | ६ | रजातलबेत. | हुकुमांत. |
| ७३ | १० | रयते. | रयत. |
| ६७ | १७ | रयान. | रयत. |
| २८ | ३ | रवासुदगी. | रोखे पत्राचे रजिस्टर. |
| ४ | ७ | रसद. | रसीद, भरणा. |
| १ | १० | रसानगी. | रवानगी. |
| २३४ | २१ | राजीरजावदीने. | राजीखुषीनें. |
| १२४ | १४ | रुईनें. | रिवाजानें, सीध्या रस्त्यानें. |
| ७० | ५ | रुसूम. | दरसाल मिळणारी नक्त नेमणूक. |

| पृष्ठ सं. | ओळ. | कठिण शब्द. | कठिण शब्दांचे अर्थ. |
|---|---|---|---|
| ६० | | रूबरू. | समक्ष. |
| १८५ | १६ | लवणशाकेस. | लोणच्याकरितां. |
| ८१ | ११ | लाजा. | संबंध. |
| ६४ | १२ | लिख्या. | हिशेबाच्या, नोंदीच्या. |
| २४२ | १९ | वजारत महासरखेल. | एक किताब. |
| १५८ | ५ | वरात. | हुंडी. |
| ६४ | ९ | वस्तवानी. | चीजवस्त. |
| २४७ | २ | वळवटा. | वहिवाट, पद्धत, क्रम. |
| ६९ | २९ | शाहिदीनामा. | साक्षिदारांचालेख–जबान्या. |
| २७१ | ८ | षड्दर्शन. | योग, सांख्य, पूर्व व उत्तर मीमांसा, न्याय व वैशेषिक हीं सहा दर्शनें, सामान्यतः सहा शास्त्रें. |
| २७० | १६ | षडब्द. | सहा दिवसाचें प्रायश्चित्त. |
| ६४ | २६ | सड्या. | एकट्या, नुसत्या. |
| १६० | ११ | सतेल. | एक प्रकारचें भांडें. |
| २०५ | ८ | सदारत. | ऐपतदार ? |
| ६५ | २० | समापत्र. | संमतिपत्र. |
| १५५ | ३ | सरखोत. | मुख्य खोत. |
| २५ | २० | सरदेसगत. | मुख्य देशमुखी. |
| २५ | १२ | सरसुभा. | मुख्य तालुकदार. |
| १७ | २१ | सरहवाला. | मुख्य हवालेदार. |
| ८२ | ७ | हटकरी. | बाजारकरी. |
| २६५ | १८ | हरकी. | नजराणा, हरल्याबद्दल दंड, बक्षिसी. |
| १७० | ६ | हरद्र. | आशय. |
| ५७ | १५ | हरदू. | दोन्ही. |
| १० | १९ | हशम. | तैनातीचे लोक. |
| १२ | ५ | हशमनिसी. | हशमनिसाचा, हशमनीस–हजीरीपट ठेवणारा अधिकारी. |